सटीक

# हिंदुस्थानचा करारविषयीं आक्ट

सन १८७२ चा आक्ट ९



किंमत रुपये ३ टपालखर्च शिवाय.

सन १९२५ ते सन १९३२ अखेर सन १९३० चा आक्ट ४ था या एकच आक्टावरून सुधारणा झाली आहे.

## कलम १७८ ची सुधारणा

सन १८७२ चा आक्ट ९ वा याच्या १७८ व्या कलमाची सुधारणा:— सन १८७२ चा इंडियाचा करारांविषयीं आक्ट याच्या १७८ व्या कलमाच्या बदला खालील कलमें दाखल करण्यांत यावीं. तीं येणेंप्रमाणें:—

" १७८. व्यापारी अडत्यानें गहाण ठेवणें:—जेव्हां मालकाच्या संमतीनें माल किंवा मालाबाबत हक्क दाखविणारे दस्तऐवज व्यापारी अडत्याच्या कबजांत असतील, तेव्हां व्यापारी अडत्याचें नेहमींचें काम करीत असतांना, त्यानें केलेलें कोणतेंहि गहाण, जणूं, सदरहू मालाच्या मालकानें तें करण्याबाबत त्यास स्पष्टपणें अधिकार दिलेला असल्याप्रमाणें, तितकेच कायदेशीर असेल; मात्र गहाणदार इमानानें वागत असून, गहाणाच्या वेळीं सदरहू गहाण देणारास गहाण ठेवण्याचा अधिकार नाहीं अशा अर्थाची खबर त्यास मिळालेली असतां कामा नये.

खुलासा:—या कलमांत " व्यापारी अडत्या " व " हक्काचे दस्तऐवज " या संज्ञांचे सन १९३० च्या हिंदुस्थानच्या मालाच्या विक्रीबाबत आक्टांत जे अर्थ दिलेले आहेत तेच अर्थ असतील.

१७८-अ. निरर्थक ठरण्याजोग्या कराराअन्वयें ( माल ) कबजांत असलेल्या मनुष्यानें ठेविलेलें गहाण:—जेव्हां गहाण देणारानें, कलम १९ किंवा कलम १९-अ याअन्वयें निरर्थक ठरण्याजोग्या कराराअन्वयें त्यानें गहाण ठेविलेल्या मालाचा कबजा मिळविलेला असेल, परंतु तो करार गहाण ठेविते वेळीं रद्द करण्यांत आला नसेल, तेव्हां गहाणदारास सदरहू मालाबाबत, जर तो इमानानें व गहाण देणाराच्या हक्कांतील अपुरेपणा न कळतां वागत असेल तर, चांगला हक्क प्राप्त होतो."

---

सटीक

# हिंदुस्थानचा करारांविषयींचा आक्ट.

## सन १८७२ चा आक्ट ९.

( सन १८८६ चा आक्ट ४, सन १८९१ चा १२,
सन १८९९ चा ६, सन १९१४ चा आक्ट १० व
सन १९१७ चा आक्ट १४ ).
वरून सुधारलेला.

विशेष समजुतीच्या टिपा व मुंबई, मद्रास, कलकत्ता, अलाहाबाद, लाहोर व पाटणा येथील हायकोर्टांचे निवाडे ( सन १९२४ अखेर ).
यांसह,

नरहरराव त्र्यंबक राजमाचीकर बी. ए.

न्यायाश्रयकर्ते,

यांनीं तयार करून
पुणें, शनवार ५०४ येथें
आपल्या ' न्यायाश्रय ' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला असे.

आवृत्ति ६ वी.

माहे आगष्ट सन १९२५.

किंमत रुपये ३, टपालखर्च शिवाय.

# हिंदुस्थानचा करारांविषयीं आक्ट.

## प्रस्तावना.

( आवृत्ति ६ वी ).

या आक्टाच्या आजपावेतों आम्हीं पांच आवृत्ति छापून प्रसिद्ध केल्या व त्या खपून गेल्या कारणानें ही सहावी आवृत्ति आम्हीं छापून प्रसिद्ध केली आहे.

हा आक्ट, सन १८८६ चा आक्ट ४, सन १८९१ चा आक्ट १२, सन १८९९ चा आक्ट ६, सन १९१४ चा आक्ट १० व सन १९१७ चा आक्ट १४ अशा पांच आक्टांवरून आजपावेतों दुरुस्त झाला आहे. सदर पांच आक्टांवरून ही आवृत्ति दुरुस्त करण्यांत आली आहे व सर्व दुरुस्त्या ज्या त्या ठिकाणीं टिपेंत दाखविल्या आहेत.

नामदार चारी हायकोर्टांनीं गेल्या वीस वर्षांत व पाटणा आणि लाहोर येथील हायकोर्टांनीं गेल्या चार वर्षांत सन १९२४ अखेर जे निवाडे केले व जे इंडियन लॉ रिपोर्टांत छापून प्रसिद्ध झाले आहेत त्यांतील महत्वाचे निवाडे या सहाव्या आवृत्तींत विशेष समजुतीच्या टिपेंत दाखल केले आहेत. सर्व निवाडे दाखल केले असते तर पुस्तक मोठें होऊन त्यामानानें पुस्तकाची किंमतही पुष्कळ वाढली असती; सबब सदर्हूप्रमाणें निवाड्यांची निवड करणें भाग पडलें. शिवाय अपेंडिक्समध्यें कांहीं साधारण स्वरूपाचे निवाडे दिले आहेत.

याप्रमाणें या आक्टाची लोकांस जेणेंकरून विशेष उपयुक्तता होईल असें वाटलें तें सर्व करून हीं सहावी आवृत्ति आम्हीं तयार केली आहे.

पुणें न्यायाश्रय ऑफिस.
ता. १५ आगष्ट सन १९२५

न्यायाश्रयकर्ते,

इंडियाचे गव्हर्नर जनरल इन् कौन्सिल ह्यांचा खालीं लिहिलेला आक्ट, तारीख २५ एप्रिल सन १८७२ रोजीं गव्हर्नर जनरल साहेबांनीं मंजूर केला तो सर्व लोकांस जाहीर होण्यासाठीं इंडियाच्या गॅझेटांत तारीख २७ एप्रिल सन १८७२ रोजीं प्रसिद्ध केला.

# सन १८७२ चा आक्ट ९.

## इंडियाच्या करारांविषयीं आक्ट.

---

अनुक्रमणिका.

कलमें.

१९. राजीखुषीनें नसलेल्या कबुलायती निरर्थक करितां येतात.

१९ अ. गैरवाजवी दाबाच्या योगानें करून घेतलेला करार रद्द करण्यास अधिकार.

२०. झालेल्या किंवा असलेल्या गोष्टीविषयीं उभयपक्षीं चूक झाल्यास कबुलायत निरर्थक.

२१. कायद्याविषयींच्या चुकीचा परिणाम.

२२. कराराच्या एका पक्षकाराचे गोष्टीविषयीं चूक आहे इतक्याच वरून करार निरर्थक करण्याजोगा होत नाहीं.

२३. कोणकोणते मोबदले व विषय कायदेशीर व कोणकोणते गैरकायदेशीर होत.

निरर्थक कबुलायती.

२४. मोबदले आणि विषय हे अंशतः गैरकायदेशीर असल्यास कबुलायती निरर्थक.

२५. मोबदल्याशिवाय कबुलायत निरर्थक.

ती लेखी असून नोंदली असेल तर मात्र नाहीं.

अथवा कांहीं केलेलें असल्यास त्याबद्दल उतराई होण्याचें वचन असेल, तर नाहीं.

अथवा मुदतीनें रद्द झालेलें कर्ज देण्याचें वचन असेल तर नाहीं.

२६. लग्नाच्या अटकावा विषयींच्या

कलमें.

कबुलायती निरर्थक.

२७. व्यापाराच्या अटकावाविषयींच्या कबुलायती निरर्थक.

ज्याची गुडविल विकली आहे त्या व्यापाराविषयीं मात्र अपवाद आहे.

सरकत मोडण्यापूर्वीं सरकतदारांनीं आपसांत केलेल्या कबुलायतीविषयीं अपवाद.

अथवा सरकत चालू असेंपर्यंत ई.

२८. न्यायाचे कामास मनाई आणणाऱ्या कबुलायती निरर्थक.

वाद उत्पन्न झाल्यास तो पंचाकडे घालू नये असे कबुलायतीविषयीं अपवाद.

अशा करारांनीं दाव्यास बाध येतो.

जे वाद पूर्वींच उत्पन्न झाले असतील ते पंचांकडे सोपण्याविषयींच्या कराराबद्दल अपवाद.

२९. मोघमपणामुळें कबुलायती निरर्थक होत.

३०. पैजेवरच्या कबुलायती निरर्थक होत.

घोड्याचे शर्यतीबद्दल कित्येक बक्षिसासाठीं अपवाद.

या कलमावरून इंडियन पिनलकोड कलम २९४ अ याला व्यत्यय येत नाहीं.

कलमें.

## बाब ३.

### अवलंबी करारांविषयीं.



---

## बाब ४.

### करारांच्या पूर्ततेविषयीं.

पुरे केले पाहिजेत ते करार.



करार कोणी पुरे केले पाहिजेत.



पुरें करण्याची वेळ आणि ठिकाण.

कलमें.

४९. विनंती करावयाची नसेल आणि ठिकाण नेमलेलें नसेल तेव्हां वचन पुरें करण्याची जागा.

५०. वचन घेणारानें नेमलेल्या अथवा पसंत केलेल्या प्रकारानें किंवा वेळीं पुरें करणें.

परस्पर वचनांच्या पूर्ततेविषयीं.

५१. परस्पर वचन घेणारा आपलें वचन पुरें करण्यास तयार आणि कबूल नसल्यास वचन देणारास आपलें वचन पुरें करण्यास भाग नाहीं.

५२. परस्पर वचनें पुरी करण्याचा क्रम.

५३. ज्या गोष्टींच्या घडण्यावरून करार पुरा व्हावयाचा तिला कोणी पक्षकारानें हरकत केल्यास त्याची जबाबदारी.

५४. परस्पर वचनाबद्दलचा करार असून जें वचन अगोदर पुरें झालें पाहिजे तें पुरें न झाल्याचा परिणाम.

५५. ज्यांत वेळ न चुकणें हें तात्विक आहे असा करार नेमलेल्या वेळेवर पुरा न केल्याचा परिणाम. वेळ न चुकणें हें तात्विक नसेल तर, नेमलेल्या वेळेवर करार पुरा न झाल्याचा परिणाम.

नेमलेल्या वेळेहून अन्य वेळेस वचन पुरें केल्यास आपणास चालेल असें मान्य केलें तर त्याचा परिणाम.

कलमें.

५६. अशक्य कृत्य करण्याविषयींची कबुलायत निरर्थक.

जें कृत्य मागाहून अशक्य अगर गैर कायदेशीर झालें तसें कृत्य करण्याचा करार केव्हां निरर्थक होतो.

जें कृत्य करणें अशक्य अगर गैर कायदेशीर आहे असें समजलें होतें तें न केल्यानें तोटा झाल्यास तो भरून देणें.

५७. कायदेशीर गोष्टी करण्याची वचनें जर प्रथम आहेत आणि मग गैरकायदेशीर गोष्टी करण्याची वचनें आहेत तर प्रथमची करारादाखल, आणि दुसरीं निरर्थक कबुलीदाखल होत.

५८. विकल्पी वचन असून एक पक्ष गैरकायदेशीर आहे तर कायदेशीर पक्ष मात्र अमलांत आणतां येईल.

दिलेल्या पैशाचा विनियोग.

५९. अमूक कर्ज फेडण्याकरितां ही रक्कम देतों असें ठरविलें असल्यास त्या रकमेचा विनियोग.

६०. कोणत्या कर्जाच्या फेडण्याकडेस लावावी असें कळविलें नसल्यास दिलेल्या रकमेचा विनियोग.

६१. जर दोहोंतून एकाहीं पक्षकाराकडून विनियोग झाला नसेल तर दिलेली रक्कम कशी योजावी.

कलमें.

## जे करार पुरे करण्याचें जरूर नाहीं त्यांविषयीं.



---

## बाब ५.

## करारामुळें उत्पन्न झालेल्या संबंधासारखे जे कित्येक संबंध त्यांविषयीं.



---

## बाब ६.

## करार मोडण्याच्या परिणामाविषयीं.



---

कलमें.

## बाब ७.

### मालाची विक्री.

#### विकलेल्या मालावरचे स्वामित्व स्थलांतर केव्हां पावतें.

७६. ' माल ' या शब्दाचें लक्षण.

७७. ' विक्री ' या शब्दाचें लक्षण.

७८. विक्री कशानें घडते.

७९. अजून निश्चित करावयाची, करावयाची, अथवा संपन्नावयाची आहे, अशी वस्तु विकल्यास तिचें स्वामित्व केव्हां येतें.

८०. विकत घेणारा ज्या स्थितींत असलेला माल घेणार त्या स्थितीला तो विकणारानें आणावयाचा आहे अशा मालाचे विक्रीची पूर्णता.

८१. जेव्हां मालाची किंमत किती होते तें ठरविण्याकरितां विकणारानें त्या मालाला कांहीं तरी करावयाचें असतें तेव्हां विक्री पूर्ण केव्हां होते.

८२. करार होते वेळीं माल कोणता तो निश्चित केला नसेल तर विक्री केव्हां पूर्ण होते.

८३. मागाहून मालाचा विनियोग केल्यानें माल अमूक असा निश्चित केला जातो.

८४. विकणारानें निवड केली तर माल निश्चित केलेला असा होतो.

८५. जंगम जिंदगी स्थावर जिंदगीबरोबर विकली असेल तेव्हा जंगम जिंदगीचें स्वामित्व स्थलांतर केव्हां पावतें.

कलमें.

८६. मालावर विकत घेणाराचें स्वामित्व आल्यावर तोटा झाल्यास तो खरीददारानें सोसला पाहिजे.

८७. जो माल अद्यापि उत्पन्न झाला नाहीं तो विकण्याविषयीं करार झाल्यास त्या मालाचें स्वामित्व कसें येतें.

८८. करार करते वेळीं विकणाराच्या ताब्यांत नाहीं असा माल विकण्याविषयीं आणि भविष्य काळीं एकादे दिवशीं स्वाधीन करण्याविषयीं करार.

८९. करारानें किंमत ठरली नसल्यास ती कशी ठरवावी.

#### स्वाधीन करणें.

९०. स्वाधीन करण्याचा प्रकार.

९१. धक्केवाल्याचे अथवा हुंडेकऱ्याचे स्वाधीन केल्यास त्याचें फळ.

९२. कांहीं माल स्वाधीन करून दिला असतां त्याचा परिणाम.

९३. खरीददार स्वाधीन करून मागे तोंपर्यंत विकणारानें स्वाधीन केला पाहिजे असें नाहीं.

९४. स्वाधीन करून देण्याची जागा.

#### विकणाराचा लियन.

९५. विकणाराचा लियन.

९६. किंमत पुढें द्यावयाची, पण स्वाधीन करून देण्याची, वेळ नेमली नसेल तर लियन.

' नादारी ' या शब्दाचें लक्षण.

कलमें.

१२१. खरीददारानें नेमलेल्या वेळीं किंमत न दिल्यास करार रहित करण्याचा विकणारास हक्क.

१२२. लिलांवानें विकलेल्या जुळ्या व त्यांजवरील स्वामित्व.

१२३. विकणारानें किंमत वाढविण्यासाठीं खोटी मागणीं वापरल्याचा परिणाम.

---

## बाब ८.

### हमी आणि जिम्मा.

१२४. ' हमीचा करार ' याचें लक्षण.

१२५. हमीदारावर दावा झाल्यास त्याचे हक्क आणि जबाबदारी.

१२६. ' जिम्मेचा करार ' ' जामीन ' ' मुख्य रिणको, ' आणि ' धनको. '

१२७. जिम्मेचा मोबदला.

१२८. जामिनाची जबाबदारी.

१२९. अखंड जिम्मा.

१३०. अखंड जिम्मा रद्द करणें.

१३१. जामीन मेल्यावर अखंड जिम्मा रद्द.

१३२. दोन मनुष्य प्रथमतः जबाबदार असले आणि त्यांनीं आपसांत अमूक जामीन आणि अमुक मालक असा बंदोबस्त केल्यास त्यांच्या जबाबदारीस व्यत्यय येत नाहीं.

१३३. करारांतील संकेतास फेरफार झाल्यास जामीन मोकळा होतो.

कलमें.

१३४. मुख्य रिणको सुटला अथवा मोकळा झाला तर जामीन मुक्त होतो.

१३५. धनको मुख्य रिणकोबरोबर तोडजोड करील, त्याला मुदत देईल, अथवा दावा न आणण्याचें कबूल करील, तर जामीन मुक्त होईल.

१३६. मुख्य रिणकोला मुदत देण्याकरितां तिसऱ्या मनुष्याशीं कबुलायत केल्यास जामीन मुक्त होत नाहीं.

१३७. धनकोनें दावा न आणिला म्हणून जामीन मुक्त होत नाहीं.

१३८. कित्येक सहजामिनांपैकीं एकाच्या सुटकेनें दुसरे मुक्त होत नाहींत.

१३९. जें कृत्य धनकोनें केल्यानें अगर कारण वर्जिल्यानें जामिनाचा शेवटील उपाय बिघडेल तेणेंकरून जामिनाची मोकळीक.

१४०. जामिनानें रुपये दिल्यावर अथवा काम पुरें केल्यावर जामिनाचे हक्क.

१४१. धनको जवळ तारणें असतील त्यांचा फायदा जामिनास मिळाला पाहिजे.

१४२. गैरसमजाविशीनें मिळविलेली जिम्मा व्यर्थ होय.

१४३. छपवून ठेविल्यानें मिळविलेली जिम्मा व्यर्थ होय.

१४४. दुसरा मनुष्य सहजामीन होण्या-

कलमें.

रून दिल्याबद्दल निक्षेपी जबाबदार होत नाहीं.

१६७. निक्षिप्त मालावर तिसरे माणसाचा हक्क.

१६८. ज्याला माल सांपडेल त्याचा हक्क. अमूक एक बक्षीस दिलें जाईल असें म्हटलेलें असल्यास तशा बक्षिसाबद्दल दावा आणतां येईल.

१६९. जी बहुशा विक्रीत असतात अशी वस्तु सांपडल्यास ज्याला सांपडली ती त्यानें केव्हां विकावी.

१७०. निक्षेपीचा विशेष लियन.

१७१. पेढीवाले, फ्याक्टरलोक, धक्केवाले, अटर्नी लोक, आणि विमेदलाल यांचा साधारण लियन.

गहाणांचे निक्षेप.

१७२. ‘ गहाण ’ ‘ गहाण देणारा ’ आणि ‘ गहाणदार ’ यांचें लक्षण.

१७३. अटकावून ठेवण्याचा गहाणदाराला हक्क.

१७४. ज्याकरितां माल गहाण दिला त्या शिवाय अन्य कर्जाकरितां किंवा वचनाकरितां गहाणदारानें माल अटकावून ठेवूं नये.

मागाहून दिलेल्या रकमा असल्यास करार गर्भित समजणें.

१७५. गहाणदाराला जे असाधारण खर्च आले असतील ते भरून घेण्याचा त्याला अधिकार.

१७६. गहाण देणारा कसुरी करील तर गहाणाचा हक्क.

कलमें.

१७७. गहाण देणारा कर्ज न फेडील किंवा वचन पुरें न करील तर सोडवून घेण्याविषयीं त्याचा हक्क.

१७८. ज्याच्या ताब्यांत माल अथवा मालावरील हक्काचे दस्तऐवज असतील त्यानें ते गहाण ठेवणें.

१७९. जेव्हां गहाण देणाराचा संबंध नियत आहे तेव्हां गहाण दिल्यास कसें.

निक्षेपींनीं आणि निक्षेप्त्यांनीं अन्याय करणाराविरुद्ध दावे आणणें.

१८०. निक्षेप्त्यानें अथवा निक्षेपीनें अन्याय करणारावर दावा आणणें.

१८१. अशा दाव्यांनीं समाधानाबद्दल अथवा नुकसानीबद्दल म्हणून जे मिळेल त्याची हिस्सेरसी.

---

बाब १०.

अडत.

गुमास्त्यांची नेमणूक आणि त्यांचा अधिकार.

१८२. ‘ गुमास्ता ’ आणि ‘ मुख्य ’ यांचें लक्षण.

१८३. गुमास्ता कोण नेमूं शकेल.

१८४. गुमास्ता कोणास होतां येईल.

१८५. मोबदला अवश्य नाहीं.

१८६. गुमास्त्याचा अधिकार स्पष्ट किंवा गर्भित असेल.

१८७. स्पष्ट किंवा गर्भित अधिकारांचीं लक्षणें.

कलमें.

२०९. मुख्य मेल्यानें अथवा वेडा झाल्यानें अडत अमाप्त झाल्यास गुमास्त्याचें कर्तव्य.

२१०. पोट गुमास्त्यांच्या अधिकारांची समाप्ति.

गुमास्त्याचें मुख्याशीं कर्तव्य.

२११. मुख्याचें काम चालवितांना गुमास्त्याचें कर्तव्य.

२१२. गुमास्त्यानें चातुर्य आणि हुषारी खर्च केली पाहिजे.

२१३. गुमास्त्याचें हिशोब.

२१४. गुमास्त्यानें आपले मुख्याला कळविण्याविषयीं त्याचें कर्तव्य.

२१५. जेव्हां गुमास्ता मुख्याची राजी न घेतां अडतीच्या कामीं आपल्या स्वतःकरितां लेवादेवी करील तेव्हां मुख्याचा हक्क.

२१६. गुमास्त्यानें अडतीच्या कामांत आपल्या स्वतःसाठीं व्यवहार केल्यानें नफा होईल त्याजवर मुख्याचा हक्क.

२१७. मुख्याकरितां आलेल्या रकमांतून पैसा ठेऊन घेण्याचा गुमास्त्याचा हक्क.

२१८. मुख्याचा जमा झालेला पैसा गुमास्त्यानें आपल्या मुख्यास दिला पाहिजे.

२१९. गुमास्त्याची दस्तुरी केव्हां देणें होते.

२२०. ज्या कामांत गुमास्त्यानें गैरवर्तणूक केली असेल त्याजबद्दल त्याला दस्तुरी मागण्याचा हक्क नाहीं.

२२१. मुख्याच्या मालावर आणि कागदपत्रांवर गुमास्त्याचा लियन.

मुख्याचें गुमास्त्याशीं कर्तव्य.

२२२. गुमास्त्यानें केलेल्या कायदेशीर कृत्यांच्या परिणामापासून त्याला तोटा होऊं नये असा बंदोबस्त ठेविला पाहिजे.

२२३. गुमास्त्यानें इमानानें केलेल्या कृत्यांच्या परिणामापासून त्याचा तोटा न व्हावा असें केलें पाहिजे.

२२४. गुन्ह्याचें कृत्य करण्यास नेमलेल्या गुमास्त्याला नेमणारा तोट्याबद्दल जबाबदार नाहीं.

२२५. मुख्याच्या हयगईनें गुमास्त्याला झालेल्या हानीबद्दल नुकसानी भरून देणें.

तिसऱ्या मनुष्याशीं केलेल्या करारांवर अडतीचा परिणाम.

२२६. गुमास्त्यानें केलेले जें करार तें अमलांत आणणें आणि त्यांचे परिणाम.

२२७. जर गुमास्ता आपलें अधिकाराचे बाहेर जाईल तर त्याचा मुख्य कोठपर्यंत जबाबदार समजावयाचा.

२२८. जर गुमास्त्यानें आपल्या अधिकाराबाहेर केलें तें निराळें करितां येत नसेल, तर मुख्य जबाबदार नाहीं.

---

## बाब ११.

### भागीदारी याविषयीं.

कलमें.

२४५. आपण भागीदार आहे अशी कोणी मनुष्य दुसऱ्याची समजूत करून देईल तर त्याची जबाबदारी.

२४६. कोणी मनुष्य आपण भागीदार आहे अशी दुसऱ्यानें समजूत करून दिली जाण्यास आपली संमत्ति देईल तर त्याची जबाबदारी.

२४७. भागीदार अल्पवयस्क असेल तर तो स्वतः जबाबदार नाहीं, परंतु त्याच्या हिश्शावर जबाबदारी आहे

२४८. अल्पवयस्क भागीदार वयांत आला म्हणजे त्याची जबाबदारी.

२४९. भागिदारीच्या कर्जाबद्दल भागिदाराची जबाबदारी.

२५०. सहभागिदाराच्या हयगईबद्दल अथवा कपटाबद्दल भागिदारावर तिसऱ्या मनुष्याजवळ जबाबदारी.

२५१. सहभागिदारास जबाबदारीनें बांधण्याचा भागिदारास अधिकार.

२५२. ज्यांजवरून भागिदारांचे हक्क आणि त्यांच्या जबाबदाऱ्या ठरविल्या आहेत असा करार बातल करणें.

२५३. अन्यथा करार नसल्यास भागिदाराचे परस्परांशीं संबंध ठेवण्याविषयींचे नियम.

२५४. कोर्टानें भागिदारी केव्हां मोडून टाकावी.

कलमें.

२५५. उद्योग मना झाल्यास भागिदारी मोडते.

२५६. ज्या मुदतीकरितां भागिदारी आरंभिली ती मुदत संपल्यावर भागिदारी चालू ठेवल्यास भागिदारांचे हक्क आणि त्यांच्या जबाबदाऱ्या.

२५७. भागिदारांचीं साधारण कर्तव्यें.

२५८. भागिदारीसंबंधीं कामापासून झालेल्या लाभाबद्दल हिशेब मंडळीस देणें.

२५९. भागिदारानें प्रतिस्पर्धी उद्योग चालविल्यास त्याजबद्दल मंडळीजवळ त्याची जबाबदारी.

२६०. मंडळींत फेरफार झाल्यानें अखंड जिम्मा रद्द होते.

२६१. कोणी भागीदार मेल्यानंतर जबाबदारी उत्पन्न झाली तर त्या मयताची इस्टेट तिजविषयीं पात्र नाहीं.

२६२. भागिदारीचीं कर्जें आणि स्वतःचीं कर्जें फेडणें.

२६३. भागिदारी मोडल्यावर भागिदारांचे हक्क आणि त्यांच्या जबाबदाऱ्या हीं कायम राहणें.

२६४. भागिदारी मोडल्याबद्दल खबर.

२६५. मोडल्यावर किंवा समाप्त झाल्यानंतर कोर्टानें काम आटपून बंद करणें.

२६६. नियमित जबाबदारीच्या भागिदाऱ्या, इन्कार्पोरेटेड भागिदाऱ्या आणि ज्याइंट स्टाक कंपन्या.

# सन १८७२ चा आक्ट ९.

## इंडियाचा करारांविषयीं आक्ट.

प्रस्तावना. ज्यापेक्षां करारांविषयींच्या कायद्याचे कांहीं भाग लक्षणसिद्ध करणें व सुधारणें अवश्य आहे त्यापेक्षां खालीं लिहिल्याप्रमाणें या आक्टावरून फर्माविण्यांत आलें आहे.

संक्षिप्त नांव. १. या आक्टास " सन १८७२ चा इंडियाचा करारांविषयीं आक्ट " असें नांव दिलें आहे.

व्याप्ति आणि आरंभ. हा सर्व ब्रिटिश इंडियास लागू आहे व तो सन १८७२ चे सप्टेंबरचे पहिले तारखेस अमलांत येईल.

कायदे रद्द केले ते. कोणत्याही स्टाटूटांतील, आक्टांतील अथवा कायद्यांतील ठराव या आक्टावरून स्पष्ट रीतीनें रद्द केले नसतील तर या आक्टांत असलेल्या कोणत्याही मजकुरानें त्यांस व्यत्यय येणार नाहीं; आणि व्यापाराची कोणतीही चाल किंवा रिवाज, किंवा एखाद्या कराराची कोणतीही अनुषंगिक गोष्ट, ही जर या आक्टाच्या ठरावांस विरोधी नसतील, तर त्यांस या आक्टांतील कोणत्याही मजकुरानें व्यत्यय येणार नाहीं. (हें कलम सन १९१४ चा आक्ट १० परिशिष्ट १ अन्वयें दुरुस्त केलें).

---

* १. हा आक्ट सन १८६६ चा ४, सन १८९१ चा १२, सन १८९९ चा ६, सन १९१४ चा १० व सन १९१७ चा २४ वरून दुरुस्त केला आहे व यांत गेलें वीस वर्षांत सन १९२४ अखेर साही हायकोर्टांनीं केलेले निवाडे दाखल केले आहेत.

२. ज्या इसमाच्या एखाद्या करारांत संबंध नाहीं अशा इसमास सदर करारासंबंधानें दावा लावतां येतो असें दाखविणारी कोणतीही गोष्ट कराराच्या आक्टांत (सन १८७२ चा आक्ट ९) नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३७ पृ. ४७१; न्या. पु. ४८ मुं. दि. नि. पृ. २८७).

३. साधारण वहातूक करणारे यांची कर्तव्यें व जबाबदारी यासंबंधानें हिंदुस्थानांत त्याबद्दलचा इंग्लिश कॉमन लॉ (कॅरियर्स आक्टाअन्वयें [सन १८६५] अथवा सन १८७८ व सन १८९० च्या रेलवेज आक्टाअन्वयें वहातुक करणारांच्या कांहीं वर्गाच्या बाबतींत इंग्लिश कॉमन लॉ मधील ठरावाविरुद्ध जेथें ठराव करण्यांत आले असतील तेवढ्या बाबी वगळून) लागू पडतो; व निक्षेपाबद्दल कराराच्या आक्टांतील प्रकरणांत कांहीं सर्वसाधारण अशीं विधानें आलीं असलीं तरी सार्वजनिक वहातुक करणाराच्या जबाबदारीस करारांचा आक्ट (सन १८७२) लागू पडत नाहीं. (इं. ला. री. म. सी. व्हा. ३८ पृ. ९४१; न्या. पु. ५० म. दि. नि. पृ. ७४).

## विशेष समजुतींच्या टिपा.

१. या आक्टाचें प्रोसिडिंगावरून असें दिसून येतें कीं, तारवासंबंधीं, ट्रस्टीसंबंधीं, विम्यासंबंधीं, हुंडेकऱ्यासंबंधीं, हुंड्यासंबंधीं, गहाणासंबंधीं आणि इक्विटीसंबंधीं करार याविषयीं या आक्टांत सांगितलेलें नाहीं; सबब त्या करारांसंबंधीं जे आक्ट, वहिवाटी व व्यापाराच्या चाली चालू आहेत, त्या सर्व कायमच आहेत, असें समजलें पाहिजे.

२. " ब्रिटिश इंडिया " ह्मणजे प्रिन्सआफवेल्स आयलंड या नांवाचें बेट व सिंगापूर व मलाका हीं संस्थानें खेरीज करून जो इतर मुलुख हिंदुस्थानचा राज्यकारभार अधिक चांगले रीतीनें चालविण्याविषयीं आक्ट या नांवाचा व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दीतल्या २१ व्या व २२ व्या वर्षांतील १०६ वा चाप्टर म्हणून आक्ट आहे, त्याच्या आधारानें मलिका माआझमा यांच्या अमलांत आला असेल तो मुलूख. ( सन १८६८ चा आक्ट १ कलम २ रकम ८ पहा ).

२. पूर्वापारसंबंधानें अन्य अर्थाचा संभव असेल ते प्रसंग खेरीज करून, या आक्टांत खालीं लिहिलेले शब्द व संज्ञा खालीं लिहिलेल्या अर्थी योजिलेल्या आहेत असें समजावें:—

परिभाषार्थ वाक्य.

( अ. ) जेव्हां कांहीं एक कृत्य करण्याविषयीं अथवा वर्जिण्याविषयीं दुसऱ्या मनुष्याचें संमत मिळविण्याच्या हेतूनें एखादा मनुष्य तें कृत्य करण्यास किंवा वर्जण्यास आपण खुषी आहों असें त्या दुसऱ्या मनुष्यास कळवितो, तेव्हां तो सूचना करितो असें म्हणावें:

" सूचना. "

### विशेष समजुतीची टीप.

कांहीं रकम कर्जाऊ देण्यावद्दल विनंती करून, ती रकम हें पत्र घेऊन येणारास द्यावी, असें मजकुराचें पत्र एका मनुष्यानें दुसरे मनुष्यास पाठविलें असेल आणि त्यांत असा मजकूर असेल कीं, " या रकमेची व्याजासुद्धां मी फेड करीन आणि मग हें पत्र परत देईन; या पत्राचे आधारावर सदहू रकम देण्यास तुम्हीं हयगय करणार नाहीं अशी माझी विनंती आहे. " तर तें पत्र, कर्ज घेण्यावद्दलची नुसती सूचना नसून प्रामिसरी नोट आहे असें होईल. ( इं. ला. री. म. सी. व्हा. १६ पृ. २८३; न्या. पु. २८ म. दि. नि. पृ. २२ व २३ ).

( ब. ) ज्या मनुष्याला सूचना केली असेल तो जेव्हां तिजविषयीं आपली मान्यता कळवितो तेव्हां ती सूचना स्वीकारली गेली असें म्हणावें. सूचना स्वीकारिली गेली, म्हणजे तिला वचन ही संज्ञा प्राप्त होते.

" वचन. "

( क. ) जो मनुष्य सूचना करितो त्यास ' वचन देणारा ' असें म्हणावें, आणि जो सूचना स्वीकारितो त्याला ' वचन घेणारा ' असें म्हणावें:

" वचन देणारा. "
" वचन घेणारा. "

( ड ) जेव्हां वचन देणाऱ्याच्या इच्छेवरून, वचन घेणाऱ्यानें किंवा दुसऱ्या कोणत्याही मनुष्यानें एखादी गोष्ट केली असेल किंवा करणें वर्जिली असेल, अथवा तो वचन घेणारा अथवा दुसरा कोणीही मनुष्य करितो किंवा करणें वर्जितो किंवा करण्याचें अथवा न करण्याचें

" मोबदला. "

वचन देतो, तें जें केलेलें कृत्य किंवा वर्जन किंवा वचन त्यास वचनाचा मोबदला असें नांव दिलें आहे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. अल्पवयी मनुष्यानें आपल्या अल्पवयांत प्रदर्शित केलेल्या इच्छे अन्वयें त्याची नोकरी करण्यांत आली असेल व त्याच प्रमाणें तो वयांत आल्यावर त्याचे इच्छेवरून पुढें नोकरी चालू ठेविली असेल आणि अशा प्रकारें नोकरी करणारे मनुष्यास त्या अल्पवयी मनुष्यानें त्या नोकरीबद्दल पैसे देण्याविषयीं करार लिहून दिला असेल तर त्या करारास पूर्वीची व नंतरची नोकरी ही योग्य मोबदला होईल. कराराच्या आक्टाचें कलम २ रकम (ड) वरून पाहतां वचन देणाराच्या इच्छेवरून वचन घेणारानें नोकरी केली असेल तर त्याची ती नोकरी नियमित प्रकारच्या करारास योग्य मोबदला होतो. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २० पृ. ७५५; न्या. पु. ३१ मुं. दि. नि. पृ. ३०३).

२. हिंदुस्थानच्या कराराच्या आक्टांत ' मोबदल्याची ' दिलेली व्याख्या इंग्लंडांतील कायद्यांतील व्याख्येपेक्षां विस्तृत आहे. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४१ पृ. १३७; न्या. पु. ४९ क. दि. नि. पृ. ५).

"कबुलायत." (ई.) प्रत्येक वचन आणि प्रत्येक वचनसमूह हे जेव्हां एकमेकांचा मोबदला असतात तेव्हां त्या प्रत्येक वचनास आणि प्रत्येक वचनसमूहास कबुलायत अशी संज्ञा आहे:

## विशेष समजुतीची टीप.

डिस्ट्रिक्ट म्युनिसिपालिटीची विशेष साधारण सभा योग्य रीतीनें बोलाविण्यांत आली होती, असें होण्यास ती, डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल आक्टाचें (सन १८८४ चा मुंबई आक्ट २) कलम २७ रकम (२) अन्वयें अध्यक्षानें ती बोलावली असली पाहिजे. त्याप्रमाणें ती बोलावण्यांत आली नसल्यास तें व्यंग त्याच आक्टाचें कलम २७ रकम १७ वरून नाहींसें होणार नाहीं.

कराराच्या आक्टाचें कलम १० वरून पाहतां, प्रत्येक कराराला मोबदला असणें अवश्य आहे असें नाहीं. त्या आक्टांत " कबुलायत " (करार) असा जो शब्द आहे तो " प्रत्येक वचन आणि प्रत्येक वचनसमूह हे जेव्हां एकमेकांचा मोबदला असतात तेव्हां त्या प्रत्येक वचनास व त्या प्रत्येक वचनसमुहास " लागू पडतो.

म्युनिसिपालिटीनें केलेल्या करारावर म्युनिसिपालिटीचा शिक्का नेहमीं असावा लागतो, असें जरी आहे तरी, तसा शिक्का न होतां त्या करारावरून जर कांहीं कामें होऊन गेलीं असलीं तर त्या कराराचे आधारें दावा केला असतां तो चालेल. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २८ पृ. ६६; न्या. पु. ३९ मुं. दि. नि. पृ. ४०).

(फ.) जीं वचनें एकमेकांचा मोबदला किंवा एकमेकांच्या मोबदल्याचा भाग असतात त्यांस परस्पर वचनें असें नांव दिलें आहे:

"निरर्थक कबुलायत." (ग.) जी कबुलायत कायद्यावरून अमलांत आणतां येत नाहीं तिला निरर्थक कबुलायत हें नांव दिलें आहे:

## विशेष समजुतीची टीप.

एन. जी. या नांवाचे इसमानें गहाण सोडवून घेण्यासाठीं दावा केला होता. गहाणरोख्याचा जो मोबदला ठरला होता त्यामध्यें एका हुकुमनाम्यावरून देणें असलेली रकम दाखल केलेली होती. हुकुमनाम्यांत व्याजाबद्दल ठराव नव्हता, परंतु गहाणरोख्यांत जी हुकुमनाम्याची रकम लावून देण्यांत आली होती त्यावर व्याज देण्याचें ठरलें होतें. सदर व्यवहारास सि. प्रो. को. कलम २५७ अ अन्वयें मंजुरी कोर्टानें दिली नसल्यामुळें एकंदर गहाणाचा रोखा निरर्थक झाला आहे, असें कनिष्ठ अपील कोर्टानें ठरविलें.

ठरावः—( कनिष्ठ कोर्टाचा हुकुमनामा रद्द करून ):—हुकुमनाम्यांतील रकमेबद्दलचा महाणरोख्यांतील ठराव जरी अमलांत येण्यासारखा नसला तथापि, बाकीचे ठराव निरर्थक नसून कायद्याप्रमाणें अमलांत आणण्याजोगे आहेत. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३१ पृ. ५५२; न्या. पु. ४२ मुं. फौ. नि. पृ. २६३ ).

" करार." ( ह. ) जी कबुलायत कायद्यावरून अमलांत आणतां येते तिचें नांव " करार ".

## विशेष समजुतीची टीप.

कोणताही करार होण्यास तरः झालें म्हणजे, ( स्पष्ट रीतीनें किंवा गर्भित अर्थानें ) एकादी सूचना झाली असली पाहिजे आणि तीस निश्चित मान्यता मिळाली असली पाहिजे; तशा मान्यतेवांचून करार मुळींच होत नाहीं: करार करणाऱ्या पक्षकारांचीं मनें एकवट झालेलीं असतात. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २८ पृ. ४२०; न्या. पु. ३९ मु. दि. नि. पृ. २८२ ).

" निरर्थक करण्याजोगा करार." ( ऐ. ) जी कोणतीही कबुलायत तींतील एक किंवा अधिक पक्षकारांच्या इच्छेवरून कायद्याप्रमाणें अमलांत आणतां येईल, पण बाकी राहिलेला जो किंवा जे पक्षकार त्यांच्या इच्छेवरून अमलांत आणतां येणार नाहीं, तिचें नांव ' निरर्थक करण्याजोगा करार. '

" निरर्थक करार." ( ज. ) जो एखादा करार कायद्यावरून अमलांत आणण्याचा बंद होतो तो अमलांत आणण्याचा बंद होतो तेव्हां निरर्थक होतो.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. उदाहरणः—अ हा आपला घोडा रु. २५ यांस विकत घेण्याविषयीं ब यास विचारतो व ब अचें म्हणणें कबूल करतो. तर यांत—

अचें विचारणें हें रकम ( अ ) प्रमाणें ' सूचना ' होयः बचें कबूल करणें हें रकम ( ब ) प्रमाणें ' वचन ' होयः रकम ( क ) प्रमाणें अ हा ' वचन देणारा ' व ब हा ' वचन घेणारा ' होयः रकम ( ड ) प्रमाणें अनें घोडा विकण्याविषयीं जें वचन दिलें त्याचा ' मोबदला ' बनें रु. २५ देण्याचें कबूल केलें हा आहे, आणि बनें रु. २५ देण्याचें वचन दिलें त्याचा ' मोबदला ' अनें घोडा विकण्याचें वचन दिलें हा आहे; रकम ( इ ) प्रमाणें अचें व बचें वचन ही ' कबुलायत ' होयः आणि रकम ( फ ) प्रमाणें अचें वचन व बचें वचन हीं ' परस्पर वचनें ' होत.

२. वादी यानें प्रतिवादी याजवर एक हुकुमनामा मिळविला आणि त्याचे बजावणींत प्रतिवादीची कांहीं मिळकत जप्त करविली. त्यांचे दरम्यान तोडजोड झाली आणि प्रतिवादी यानें वादी यास त्याजबद्दल एक रोखा लिहून दिला. परंतु ती तोडजोड झाल्याची गोष्ट वादी यानें कोर्टास कळविली नव्हती. त्या रोखयावरून वादी यानें प्रतिवादीवर पुढें एक दावा केला. त्यांत ठराव झाला तोः—

ठरावः—हा रोखा मोबदल्यावांचून झालेला आहे. तोडजोड झाल्याची गोष्ट कोर्टास कळविली नसल्यामुळें ती मान्य करण्याचें प्रतिवादीस भाग नव्हतें आणि याजकरितां या रोख्यास कायदेशीर मोबदला नव्हता. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ८ पृ. ३००; न्या. पु. १९ मुं. दि. नि. पृ. १५८).

———

## बाब १ ली.

## सूचना कळविणें, स्वीकारणें, आणि रद्द करणें यांविषयीं.

सूचना कळविणें, स्वीकारणें, आणि रद्द करणें.

३. सूचना कळविणें, सूचना स्वीकारणें, आणि सूचना व स्वीकार रद्द करणें ह्या गोष्टी, अनुक्रमें सूचना करणारा स्वीकारणारा, अथवा रद्द करणारा मनुष्य तशा प्रकारची सूचना जें कोणतेंही कृत्य करून किंवा करण्याचें वर्जून कळवूं इच्छील, स्वीकारूं इच्छील अथवा रद्द करूं इच्छील, किंवा त्यामुळें ती सूचना, तो स्वीकार आणि ती रद्दी कळविली असें परिणामानें होतें, त्या कोणत्याही कृत्यानें किंवा वर्जनानें झाल्या असें समजलें पाहिजे.

कळविणें पूर्ण केव्हां होतें.

४. ज्या मनुष्यास सूचना केली असेल त्याला ती कळतांच त्या सुचनेचें कळविणें पूर्ण असें समजावें.

सूचनेचा स्वीकार कळविण्याकरितां केलेली गोष्ट सूचना करणाऱ्याकडेस अशा रीतीनें रवाना झाली असेल कीं, ती स्वीकारणाराच्या हातांतून गेली व ती परत घेण्याची शक्ति त्यास राहिली नाहीं असें झालें म्हणजे स्वीकार कळविणें ही गोष्ट सूचना करणाराविरुद्ध समाप्त झाली असें समजावें;

आणि ती सूचना करणारास समजली म्हणजे स्वीकार करणाराविरुद्ध समाप्त झाली असें समजावें;

रद्द केल्याबद्दल कळविण्याकरितां केलेली गोष्ट, रद्द केल्याबद्दल ज्याला कळवावयाचें त्याजकडेस अशा प्रकारें रवाना झाली असेल कीं, रद्द करणाराचे हातांतून जाऊन परत घेण्याची त्यास शक्ति राहिली नाहीं असें झालें म्हणजे रद्द केल्याबद्दल कळविणें हें रद्द करणाराविरुद्ध समाप्त झालें असें समजावें;

आणि ज्याला रद्द केल्याविषयीं कळवावयाचें त्याला ती कळतांच त्या विरुद्ध ती समाप्त झाली असें समजावें.

### उदाहरणें.

( अ. ) अ हा बला कांहींएक किंमत घेऊन घर विकतो अशी पत्रद्वारें सूचना करितो.

ब याला तें पत्र मिळतांच सूचना कळविणें ही गोष्ट समाप्त झाली.

( ब. ) अनें केलेली सूचना ब हा पत्रद्वारें स्वीकारून पत्र टपालांतून पाठवितो. यांत स्वीकार कळविणें ही गोष्ट

अविरुद्ध, पत्र टपालांत घातल्याबरोबर,

आणि, बविरुद्ध, तें पत्र अ याला पोहोंचतांच,

समाप्त झाली.

( क. ) अ हा आपली सूचना तार पाठवून रद्द करितो.

तार रवाना होतांच रद्दी अविरुद्ध समाप्त झाली; बला तार पोहोंचतांच बविरुद्ध समाप्त झाली.

ब हा आपला स्वीकार तार पाठवून रद्द करितो. तार रवाना होतांच वची रद्दी बविरुद्ध समाप्त झाली; आणि तार अला पोहोंचतांच अविरुद्ध समाप्त झाली.

### विशेष समजुतीची टीप.

आह्मांस कांहीं पैका कर्जाऊ पाहिजे आहे तो तुह्मीं दिल्यास त्याची फेड व्याजासुद्धां अमुक दिवशीं करीन अशी सूचना करून कोणी कोणास पत्र पाठविलें असतां, तें पत्र स्टांप ड्यूटीस पात्र नाहीं, तें प्रामिसरी नोट नाहीं, परंतु तें पत्र सन १८७२ चा आक्ट ९ कलम ४ चे अर्थाप्रमाणें एक सूचना आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १३ पृ. ६६९; न्या. पु. २४ मुं. दि. नि. पृ. ३१४ ).

सूचना आणि स्वीकार यांची रद्दी.

५. सूचनेचा स्वीकार कळविणें हें सूचना करणारा विरुद्ध समाप्त होण्यापूर्वीं सूचना कोणत्याही वेळीं रद्द करतां येईल, पण नंतर करितां येणार नाहीं.

स्वीकार कळविणें हें स्वीकारणारा विरुद्ध समाप्त होण्यापूर्वीं, स्वीकार कोणत्याही वेळीं रद्द करितां येईल, पण नंतर करितां येणार नाहीं.

### उदाहरणें.

अ हा आपलें घर बला विकण्याची पत्रद्वारें सूचना करितो, आणि पत्र टपालांतून पाठवितो.

ब हा पत्रद्वारें सूचना स्वीकारितो, आणि पत्र टपालांतून पाठवितो.

व यानें स्वीकाराचें पत्र टपालांत घालण्यापूर्वी पाहिजे तेव्हां किंवा घालतेक्षणीं अ हा आपली सूचना रद्द करूं शकेल पण त्यानंतर रद्द करूं शकणार नाहीं.

वचें स्वीकारपत्र अला पोहोंचण्यापूर्वी पाहिजे तेव्हां किंवा पोहोंचतेक्षणीं व हा आपला स्वीकार रद्द करूं शकेल, पण त्यानंतर रद्द करूं शकणार नाहीं.

रद्द करण्याचे प्रकार.

६. सूचना खालीं लिहिलेल्या प्रकारांनीं रद्द होते:—

(१) सूचना करणारानें रद्द केल्याविषयीं दुसऱ्या पक्षकारास खबर कळविल्यानें;

(२) सूचना स्वीकारण्यास सूचनेंत नेमलेली वेळ होऊन गेल्यानें, अथवा तशी वेळ नेमलेली नसल्यास, योग्य काळ होऊन गेला तरी स्वीकार केल्याविषयीं न कळविल्यानें;

(३) स्वीकारण्यापूर्वी पुरी करावयाची अशी एखादी शर्त स्वीकारणारानें पुरी न केल्यानें; अथवा

(४) सूचना करणारा मेला अगर वेडा झाला आणि तो मेला किंवा वेडा झाला ही गोष्ट स्वीकार करण्यापूर्वी स्वीकारणारास समजली आहे, असें झाल्यानें.

## विशेष समजुतीची टीप.

**लिलावांत दिलेले सवाल केव्हां रद्द होतात**—हुकुमनाम्याच्या बजावणींत झालेल्या लिलावांत निरनिराळ्या इसमांनीं दिलेले सवाल हे फक्त सूचनेच्या स्वरूपाचे असतात व कोर्टानें सदर सवाल मंजूर करण्यापूर्वी सवाल बोलणारा मयत झाल्यास ते सवाल रद्द होतात. (इं. ला. रि. म. सी. व्हा. ४२ पृ. ७७६; न्या. पु. ५४ म. दि. नि. पृ. ४५).

७. सूचनेला वचनत्व येण्याला, स्वीकार

स्वीकार विन शर्तीचा असला पाहिजे.

(१) बिन शर्तीचा व निश्चित असला पाहिजे;

(२) स्वीकार अमुक रीतीनें झाला पाहिजे असें सूचनेंत नेमलें असेल तर तें खेरीज करून तो साधारण प्रचारांतील आणि योग्य अशा रीतीनें दर्शविलेला पाहिजे. स्वीकाराचा प्रकार सूचनेंत नेमला असून त्या प्रकारानें स्वीकार झाला नसेल, तर सूचना करणारास स्वीकार समजल्यापासून योग्य काळाच्या आंत, आपली सूचना तींत नेमल्या प्रकारानेंच स्वीकारली पाहिजे, दुसऱ्या प्रकारें स्वीकारल्यास चालणार नाहीं, असा आग्रह तो धरूं शकेल, परंतु तो तसा आग्रह न धरील, तर त्यानें तो स्वीकार मान्य केला असें समजलें पाहिजे.

## विशेष समजुतीची टीप.

दर पोत्यास नऊ शिलिंग व दोन पेन्स प्रमाणें मिरच्यांचीं पोतीं २०० खरेदी करण्यास मी कबूल आहे अशी प्रतिवादीनें वादीस लेखी सूचना केली. पुढें थोड्या दिवसांनीं प्रतिवादीच्या मूळच्या सूचनेंत ज्या शर्ती नव्हत्या त्या शर्ती घालून वादीच्या लोकांनीं प्रतिवादीकडे एक

कागद सही करितां पाठविला व त्यांत विशेषेंकरून "मुंबई बंदर, माफी व व्याज" असे शब्द दाखल केले होते. त्या लेखावर सही करण्याचें प्रतिवादीनें नाकबूल केलें. तथापि वादीनें प्रतिवादीच्या त्या सूचनेबद्दल इंग्लंड येथील आपल्या पेढीस तार पाठविली आणि तिकडून अनुकूल असा जवाब आल्यावर प्रतिवादीची सूचना मान्य केल्याबद्दल वादीनें प्रतिवादीस लिहून कळविलें. तो स्वाकार ह्मणजे ती मान्यता मी वादीकडे परत केली असें प्रतिवादीचें ह्मणणें होतें. प्रतिवादीनें तसें केलें नाहीं असें वादीचें ह्मणणें होतें.

ची. ज. जेनकिन्सः—या मुद्याचे संबंधाचा कायद्याचा नियम उत्तम रीतीनें सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम ७ यांत असा घालून ठेवला आहे कीं, "सूचनेला वचनत्व येण्याला, स्वीकार विन शर्तींचा व निश्चित असला पाहिजे." ह्मणजे, तसा स्वीकार होईपर्यंत बोलणें पुरें होऊन कायदेशीर जवाबदारी उत्पन्न होत नाहीं. त्याचप्रमाणें सूचनेंतील शर्ती कांहीं अंशीं सोडून दिल्या असतील किंवा त्यांत कांहीं फेरफार केला असेल तर तो स्वीकार निरर्थक होईल; परंतु, ज्या मनुष्यानें ती सूचना केली असेल त्यानें ती गोष्ट मान्य केली असेल तर मात्र त्या स्वीकारावरून कायदेशीर जवाबदारी उत्पन्न होईल. सूचनेंतील शर्तींत फेरफार करून ती सूचना स्वीकारली असतां तें स्वीकारणें होत नाहीं, परंतु तें कृत्य उलट सूचना केल्याचें होतें व तें करार पुरा होण्यापूर्वी सूचना करणारानें मान्य करावें लागतें.

आणखी असाही ठराव झाला कीं, वादीनें प्रतिवादीस कळविलेला लेखी स्वीकार प्रतिवादीनें परत केला होता असें शाबीत करण्यांत आलें नाहीं; येवढ्यावरून त्यांतील शर्ती प्रतिवादीनें मान्य केल्या होत्या असें अनुमान निघूं शकत नाहीं. एखादे मनुष्यानें दुसरे मनुष्यास सूचना केली असेल आणि त्या दुसऱ्या मनुष्यानें ती सूचना नाकबूल केली असेल तर तेवढ्यावरून त्यानें त्या सूचनेस संमत्ती दिली आहे असें होणार नाहीं किंवा तो उगाच बसला असेल तर तेवढ्यावरून त्यानें त्या सूचनेचा स्वीकार केला होता असें समजून त्यावर कायदेशीर जबाबदारी घालतां येणार नाहीं.

आणखी असेंही ठरलें कीं, एखाद्या करारनाम्यांतील शर्तींचें स्पष्टीकरण करण्यासाठीं त्याच करारांतील पक्षकारांचे दरम्यान पूर्वी झालेल्या व्यवहाराबद्दलचा पुरावा घेतां येईल, परंतु करारांत ज्या शर्ती नाहींत तशा शर्तींची जवाबदारी एखादे पक्षकारावर घालण्याकरतां तसा पुरावा घेतां येणार नाहीं. ज्या करारावर सह्या झाल्या आहेत त्या कराराअन्वयें झालेल्या व्यवहारावरून, ज्या करारावर सह्या झाल्या नाहींत किंवा ज्यावर सही करण्याचें प्रतिवादीनें नाकबूल केलें आहे त्यांतील पक्षकारांचा हेतु काय होता तें समजण्यास एखादा आधार मिळणें असंभवनीय आहे.

शर्ती पुऱ्या केल्यानें किंवा मोबदला घेतल्यानें स्वीकार.

८. सूचनेला लागून असलेल्या शर्ती पुऱ्या केल्यानें, अथवा परस्पर वचनाचा एखादा मोबदला सूचनेबरोबर देण्यास काढला असेल तो स्वीकारल्यानें, सूचना स्वीकारिली असें होतें.

वचनें, स्पष्ट आणि गर्भित असूं शकतील.

९. वचनांची सूचना अथवा स्वीकार हीं जितकीं शब्दांनीं केलीं असतील तितक्या त्या वचनांस स्पष्ट हें नांव दिलें पाहिजे, अशी सूचना किंवा स्वीकार ही शब्दांहून अन्य रीतीनें जितकीं केलीं असतील तितकें तें वचन गर्भित असें म्हणावें.

## बाब २.

## करार, निरर्थक करण्याजोगे करार, आणि निरर्थक कबुलायती यांविषयीं.

कोणत्या कबुलायती करार होतात.

१०. करार करण्यास लायक अशा प्रकारांच्या राजीखुषीनें केल्या असतील तर, आणि कायदेशीर मोबदल्यासाठीं आणि कायदेशीर उद्देशानें केलेल्या, आणि ज्या निरर्थक होत असें या आक्टांत स्पष्ट रीतीनें सांगितल्या नाहींत त्या सर्व कबुलायती करार होत.

एखादा करार लेखी अथवा साक्षीदारांसमक्ष झाला पाहिजे असें त्यांत फर्माविलें आहे, असा ब्रिटिश इंडियांत अमलांत असलेला आणि या आक्टावरून स्पष्ट रीतीनें रद्द न केलेला जो कोणताही कायदा, अथवा दस्तऐवजाच्या नोंदणीविषयीं जो कोणताही कायदा असेल, त्यास या आक्टांतील कोणताही मजकूर व्यत्यय आणूं शकणार नाहीं.

### विशेष समजुतीच्या टिपा.

१. पट्यानें घेतलेल्या जमिनीची स्वत्वनिवृत्ति करणार नाहीं असा पट्यानें घेणारानें पट्यात करार लिहून दिला होता; परंतु तशी स्वत्वनिवृत्ति त्यानें केली असतां पट्यानें देणारानें जमीन परत घ्यावी अशी त्यांत शर्त नव्हती.

ठरावः—तो एक नुसता करार आहे आणि शर्त किंवा अट नाहीं आणि याजकरितां जमीन काढून घेण्यासाठीं पट्यानें देणारानें केलेला दावा रद्द केला पाहिजे. (इं. ला. रि. मुं. सी. व्हा. २१ पृ. १९५; न्या. पु. ३२ मुं. दि. नि. पृ. १०० ).

२. एखाद्या कंपनीच्या एजंटानें कंपनीचे भाग मिळण्याबद्दल करावयाच्या अर्जावर सही करण्याबद्दल एखाद्या इसमाचें मन वळविल्यास, व त्या इसमाचें नांव भाग धारण करणारा या नात्यानें दाखल झालें असल्यास, कराराचा आक्ट ( सन १८७२ चा आक्ट ९ ) कलमें २ ( ए ), ( बी ), ३ व १० प्रमाणें कंपनीचा एजंट व सदर इसम यांजमधील करार पूर्ण होतो. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३६ पृ. ५५७; न्या. पु. ४७ मुं. दि. नि. पृ. ३३८ ).

३. **सार्वजनिक कामाकरतां जमीन घेण्याबाबद आपसांतील करार.**—आगष्ट सन १९१६ मध्यें मुंबई शहरच्या म्युनिसिपल कार्पोरेशनला एक रस्ता रुंद करण्याकरितां प्रतिवादी कंपनीच्या मालकीची कांहीं मिळकत घ्यावयाची असल्यामुळें प्रतिवादी कंपनी ही सदहू मिळकतीबद्दल काय किंमत घेण्यास तयार आहे, हें निश्चित करून घेण्याकरितां म्युनिसिपल कार्पोरेशननें प्रतिवादीबरोबर या संबधांत बोलणें सुरू केलें. या बाबतींत दोघांचें एकमत न झाल्यामुळें वादीनीं लँड अक्विझिशन आक्टाअन्वयें ही जमीन आपल्याकरितां घेण्याविषयीं सरकारांत लिहिलें. यानंतर ता. १२ जुलै सन १९१७ रोजीं प्रतिवादीनें या बाबतींत वादीबरोबर पुन्हां बोलणेंचालणें सुरू केलें. ता. २६ जुलै सन १९१७ रोजीं सरकारी गॅझिटमध्यें नेहमीप्रमाणें जाहिरनामा प्रसिद्ध झाला. ता. १२ सप्टेंबर सन १९१७ रोजीं पक्षकारांच्या दरम्यान पूर्वी झालेला पत्रव्यवहार व दोन्हीं पक्षांचे एंजिनियर यांच्या मुलाखतींत झालेल्या हकिगती यांस अनुसरून प्रतिवादी कंपनीच्या सेक्रेटरीनें वादीच्या एंजिनियरला पुढील पत्र

लिहिलें. "कोणत्याही तऱ्हेनें कंपनीच्या हक्कास बाध न आणतां कंपनी रु. १४५५१७—यांत सक्तीनें जमीन घेण्याबद्दल द्यावयाच्या १५ टक्के रकमेचा समावेश झालेला आहे—घेण्यास तयार आहे. शेजारच्या मिळकतीस सवलतीच्या स्वरूपाचे हक्कसंबंध असल्यास त्यांजबद्दल व कलेक्टर यांस त्यांचे देणें रकमेबद्दल एकदम जी रक्कम द्यावी लागेल ती या रकमेंतून वजा करावयाची आहे." हें पत्र वादीच्या एंजिनियरनें म्युनिसिपल कमिशनरपुढें ठेवलें व त्यानें प्रतिवादी कंपनीचें हें मागणें मान्य केल्याबद्दलचा शेरा सदहू पत्रावर लिहिला. ता. १४ सप्टेंबर सन १९१७ रोजीं लँड आक्विझिशनचें काम करणाऱ्या डेप्युटी कलेक्टरसमोर जी सभा झाली त्यांत वादीच्या सालिसिटरनी ता. १२ सप्टेंबर सन १९१७ चें पत्र हजर केलें. या पत्रांतील मजकुरामुळें कोणत्याही हक्कास बाध येत नाहीं वगैरे जो मजकूर सदहू पत्रांत होता त्या मजकुरांत, प्रतिवादीचें ह्मणणें म्युनिसिपालिटीनें मान्य केलें असल्यामुळें, आतां कांहीं अर्थ राहिला नाहीं असें प्रतिवादीच्या एंजिनियरनें या सभेंत कळविलें. नंतर पक्षकारांच्या दरम्यान झालेली ही तडजोड डेप्युटी कलेक्टरनें नोंदून घेतली व शेजारच्या मालकास उजेड, हवा वगैरे संबंधानें काय हक्क आहेत यांचा निर्णय करण्याकरितां त्यांनीं चौकशी तहकूब ठेवली. ता. २२ सप्टेंबर सन १९१७ रोजीं कंपनीच्या डायरेक्टरांनीं ता. १२ सप्टेंबर सन १९१७ चे पत्र पसंत करण्याबद्दल ठराव केला व या पत्रांत कंपनीच्या तर्फे सेक्रेटरीनें वादीची सूचना मान्य आहे असें नमूद करून ठेवण्यांत आलें. ता. २३ आक्टोंबर सन १९१७ रोजीं, ता. १२ सप्टेंबर सन १९१७ ला आपण जी सूचना केली होती ती आपण परत घेतली आहे असें प्रतिवादीनें आपल्या सालिसिटरामार्फत वादीच्या एंजिनियरला कळविलें. पक्षकारांच्या दरम्यान करार निश्चित रीतीनें पूर्ण झालेला आहे व प्रतिवादीस आतां सदहू करारापासून माघार घेतां येणार नाहीं असें वादीचे सालिसिटरांनीं कळविलें. ता. २९ जानेवारी सन १९१८ रोजीं डेप्युटी कलेक्टरसमोर तहकूब राहिलेली सभा झाली. त्या सभेंत प्रतिवादीनें नुकसानभरपाईदाखल ५७१६०० रुपये मागितले व नंतर कलेक्टरनें काम तहकूब केलें. नंतर वादीनें, (१) ता. १२ सप्टेंबर सन १९१७ च्या पत्रांतील शर्ती वादीनें मान्य केल्या असून त्याप्रमाणें प्रतिवादीवर बंधनकारक असा करार वादीप्रतिवादीचे दरम्यान झालेला आहे व (२) कलेक्टरसमोर चाललेल्या कामांत नुकसानभरपाईदाखल रुपये १४५५१७ पेक्षां दुसरी अगर जास्त रक्कम मागण्याचा प्रतिवादीस हक्क नाहीं व (३) कलेक्टरनें रु. १४५६१७ पेक्षां जास्त रक्कम नुकसानभरपाईदाखल देवविल्यास जास्त दिलेल्या रकमेवर वादीचा हक्क राहील व कमी दिल्यास रु. १४५५१७ देणें हें वादीवर बंधनकारक राहील असें ज्ञापित करून घेण्याकरितां दावा लावला. कलेक्टरसमोर चाललेल्या कामांत नुकसानभरपाईदाखल रु. १४५५१७ पेक्षां जास्त रक्कम प्रतिवादीनें मागूं नये अशी प्रतिवादीस ताकीद द्यावी असेंही मागणें वादीनें दाव्यांत केलें होतें. ता. १२ सप्टेंबर सन १९१७ चें हें पत्र आहे त्यांत प्रतिवादीतर्फे कोणतीही सूचना करण्यांत आली नसून वादीनें या संबंधांत आपल्या सूचना करण्याबद्दल त्यास या पत्रान्वयें आव्हान करण्यांत आलें होतें. व म्युनिसिपल कमिशनरनें जो शेरा पत्रावर लिहिला आहे तो सूचनेच्या स्वरूपाचाही नाहीं अगर सूचना मान्य करण्याच्याही स्वरूपाचा नाहीं; व प्रतिवादीची सूचना मान्य केली असल्यास ही गोष्ट प्रतिवादीस अगर प्रतिवादीचें अधिकृत गुमास्ते यांस कळविण्यांत आलेली नव्हती, अशी प्रतिवादीनें तक्रार केली. वादी म्हणतात त्याप्रमाणें करार झाला असल्यास तो करार करणारे इसम या दोघांचाही एकाच प्रकारचा समज असून झाला नसल्यामुळें निरर्थक आहे; व लँड आक्विझिशन आक्टाचें कलम ४८ प्रमाणें मिळकत सक्तीनें घेण्याचें अजिबात सोडून देण्याचें सरकारच्या मर्जीस आल्यास त्यांस तसें करण्याचा अधिकार असल्यामुळें

सदर्हू करार कोणावरही बंधनकारक नाहीं व कंपनीचे डायरेक्टर, सेक्रेटरी अगर प्रतिवादी कंपनी ह्यांजपैकीं कोणासहीं मिळकतीची विक्री करण्याचा करार करण्याचा अधिकार नव्हता अशीही वैकल्पिक रीतीनें प्रतिवादीतर्फे तक्रार करण्यांत आली होती. अव्वल कोर्टानें वादीच्या मागणीप्रमाणें ज्ञापित करण्याबद्दलचा हुकुमनामा करून पूर्वी वादीप्रतिवादींच्या दरम्यान झालेली वाटाघाट व सप्टेंबर सन १९१७ मध्यें झालेला पत्रव्यवहार पाहतां, कलेक्टरसमोर चाललेल्या कामांत कांहीं ठराव झाला तरी तंट्याच्या मिळकतीबद्दल प्रतिवादीनें रु. १४५५१७ घ्यावे असा करार वादीप्रतिवादींच्या दरम्यान संपूर्णपणें झालेला आहे. व सदर्हू करार करणें डायरेक्टरांच्या अधिकाराबाहेरचें नाहीं असें कोर्टानें ठरविलें. अपिलांत अव्वल कोर्टाचा ठराव कायम करून पुढील ठराव करण्यांत आला:

(१.) ता. १२ सप्टेंबर सन १९१७ चें प्रतिवादीचें जें पत्र आहे त्यांत त्यांनीं आपल्या अटी कळविल्या होत्या; त्या पत्रानें वादीस आपल्या शर्ती सुचविण्याविषयीं प्रतिवादीनें फक्त कळविलें होतें असें नाहीं; व सदर्हू कराराची सूचना व मान्यता या दोन्ही गोष्टी वादीप्रतिवादींचे अधिकृत मुखत्यार यांचे दरम्यान झालेल्या आहेत.

(२.) सूचना व मान्यता यांजमुळें वादीप्रतिवादींच्या दरम्यानचा करार पूर्ण झाला व कलेक्टरनें नुकसान भरपाईदाखल कोणतीही रक्कम देण्याचा ठराव केला तरी या कराराअन्वयें पक्षकारांनीं नुकसान भरपाईची रक्कम आपसांत ठरविली व यामुळें जास्त रक्कम ठरविली गेल्यास ती परत देण्याची अगर कमी ठरविल्यास कमी आलेली रक्कम पुरी करण्याची जबाबदारी करारामुळें करार करणाऱ्या इसमांवर आली. कराराच्या आक्टाचीं कलमें २ व १० यांतील अर्थाप्रमाणें सदर्हू करार हा 'करार' या सदरांत येत असून त्याची प्रतिवादीविरुद्ध विशेष रीतीनें अम्मलबजावणी करितां येईल.

(३.) लँड आक्विझीशन आक्टाचें कलम ४८ प्रमाणें चाललेलें काम बंद करण्याचा अधिकार सरकारास दिलेला आहे येवढ्यामुळें सदर करार निरर्थक होत नाहीं अगर सदर्हू करार, करार करणाऱ्या इसमांनीं एकाच समजुतीनें केलेला नाहीं असेंही नाहीं. (इ. ला. रि. मुं. सी. व्हा. ४४ पृ. ७९७; न्या. पु. ५५ मुं. दि. नि. पृ. ६१ ते ६४).

**४. पक्का अडत्या व त्याचे गिऱ्हाईक आणि दलाल आणि गिऱ्हाईक यांजमधील संबंध.—चीं. ज. म्याक्लाउड:**—पक्का अडत्या व त्याचे गिऱ्हाईक यांजमधील परस्पर संबंध आलेल्या हुकुमाप्रमाणें त्रयस्थ इसमावरोबर केलेल्या व्यवहारांबद्दल स्वतःवर जबाबदारी असणारा दलाल व त्याचे गिऱ्हाईक यांजमधील परस्परसंबंध यांजमध्यें दुसऱ्या स्थलीं दलाल हा आपल्या गिऱ्हाईकाचा गुमास्ता या नात्यानें व्यवहार करतो व तिसऱ्या इसमावरोबर झालेल्या व्यवहाराची सर्व जबाबदारी दलालावर असते व अडत्या हा त्रयस्थ इसमावरोबर गुमास्ता या नात्यानें व्यवहार करीत नसून मुख्य या नात्यानें व्यवहार करतो व या त्रयस्थ इसमाचा व आपला संबंध घडून आला पाहिजे असें म्हणण्याचा त्यानें गिऱ्हाईकास अधिकार नसतो येवढा फरक असतो. (इं. ला. रि. मुं. सी. व्हा. ४५ पृ. ३८६; न्या. पु. ५६ मुं. दि. नि. पृ. ३६).

५. कोर्टाच्या सर्टिफिकीटावरून नेमलेल्या पालन करणारास अज्ञानाचें कांहीं देणें होतें. सदर देण्याच्या फेडीकरतां पालन करणारानें अज्ञानास कांहीं मिळकत तबदील करून दिली. पालन करणारा मयत झाल्यावर, अज्ञानांनीं मिळकतीचा कबजा मिळण्याबद्दल पालन करणाराच्या वारसांवर दावा लावला.

ठरावः—झालेला व्यवहार हा अज्ञानाच्या फ़ायद्याचा व इमानानें झाला आहे असें ठरविलें असल्यामुळें, अज्ञानाकरतां केलेली तवदिली कायदेशीर आहे व मयत पालन करणाराच्या वारसांविरुद्ध ती अमलांत आणतां येईल. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३३ पृ. ६५०; न्या. पु. ४६ अ. दि. नि. पृ. ५० ).

करार करण्यास लायक कोण कोण.

११. ज्यांस जो कायदा लागू असेल त्या कायद्याप्रमाणें वयांत आलेलें, आणि जे वेडे नाहींत, आणि ज्यांस तो कायदा लागू असेल त्या कायद्यावरून ज्यांस करार करण्याची नालायकी नाहीं, ते सर्व मनुष्य करार करण्यास लायक होत.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. हिंदुशास्त्राप्रमाणें, वयांत येण्यास १६ वर्षांची यत्ता आहे. मुसलमानी शरेप्रमाणें, १६ वर्षांची यत्ता आहे, परंतु १६ वर्षांचें वय होण्यापूर्वी जर कोणी पुरुषाचे किंवा स्त्रीचे अंगावर तारुण्यांत आल्याची चिन्हें दिसूं लागलीं तर तीं दिसूं लागल्यापासून तो किंवा ती वयांत आली असें समजावें—म्याकन्याटनकृत मुसलमानी शरा पृष्ठ ६२; आणि इंग्लिश कायद्याप्रमाणें वयांत येण्याची २१ वर्षांची यत्ता आहे—स्मिथस् कान्ट्र्याक्ट पृ. २६८. सन १८६४ चा आक्ट २० कलम ३० अन्वयें वयांत येण्याची यत्ता १८ वर्षांची आहे.

२. अल्पवयी मनुष्याचे वयाचें संबंधानें सन १८७५ चा आक्ट ९ ( व्यवहार्यवयाचा ) यांत विशेष ठराव केलेले आहेत, सबब त्यांतील लागू पडणारीं कलमें खालीं दाखल केलेलीं आहेत तीं:—

"क० २ —या आक्टांतील कोणतेही ठरावावरून,

( अ ) खालीं लिहिलेले गोष्टींबाबद म्हणजे लग्न व आंदण व विवाह संबंध तोडणें व दत्तक घेणें या गोष्टींबाबद काम करण्याचे कोणतेही मनुष्याचे योग्यतेस व्यत्यय येत नाहीं अथवा,

( ब ) हिंदुस्थानांतील मलिका माआझमांचे कोणतेही वर्गाचे रयतेचे धर्मास किंवा धर्मसंबंधी क्रियांस व संप्रदायास, अथवा,

( क. ) हा आक्ट अमलांत आल्या पूर्वी जो कोणताही मनुष्य आपणास लागू असणारे कायद्याअन्वयें व्यवहार्यवयांत आला असेल त्याचे योग्यतेस व्यत्यय येत नाहीं.

"क० ३.—सदरील ठराव लागू राहून खालीं लिहिल्याप्रमाणें समजावें म्हणजे ज्या ज्या अल्पवयी मनुष्यासाठीं किंवा ज्या ज्या अल्पवयी मनुष्याचे माल मिळकतीसाठीं इन्साफाचे कोणतेही कोर्टाकडून पालन करणारा नेमला असेल किंवा नेमण्यांत येईल त्या त्या अल्पवयी मनुष्याची आणि कोणतेही कोर्ट आफ वार्डचे हुकुमतींतील प्रत्येक अल्पवयी मनुष्याचें एकवीस वर्षांचें वय पूर्ण होईल तेव्हां, हिंदुस्थानचा वारशा विषयींचा आक्ट ( सन १८६५ चा १० वा ) आहे त्यांत किंवा इतर कोणतेही आक्टांत कोणताही ठराव असला तथापि तो, व्यवहार्यवयांत आला असें समजावें, त्यापूर्वी समजूं नये.

सदरील ठराव लागू राहून खालीं लिहिल्याप्रमाणें समजावें म्हणजे ज्या ज्या इतर मनुष्यानें ब्रिटिश इंडियांत स्थायिक वस्ती केलेली असेल त्या त्या मनुष्याचें अठरा वर्षांचें वय पूर्ण होईल तेव्हां तो व्यवहार्यवयांत आला असें समजावें त्यापूर्वी समजूं नये.

" क० ४.—कोणतेही मनुष्याचें वय मोजतांना तो ज्या दिवशीं जन्मला तो सगळा दिवस धरावा, आणि त्यास तिसरे कलमाचा पहिला पारिग्राफ लागू असेल तर त्याचे एकवीसावे वाढदिवसाचे प्रारंभीं तो पूर्ण वयांत आला असें समजावें आणि त्यास तिसरे कलमाचा दुसरा पारिग्राफ लागू असेल तर त्याचे अठरावे वाढदिवसाचे प्रारंभीं तो पूर्ण वयांत आला असें समजावें."

३. हिंदुशास्त्राप्रमाणें, महान् रोगग्रस्त, व अति जरूरीचे प्रसंग खेरीज करून स्त्रिया व अल्पवयी, करार करण्यास नालायक आहेत—स्ट्रेंज हिंदु लॉ व्हा. १ चाप्टर १२ पृ. २७१–७८. मुसलमानी शरेप्रमाणें, अल्पवयी, भ्रमिष्ट, मरणारे रोगी हे करार करण्यास लायक नाहींत. व्यंकटरावकृत मु. श. पृ. ८५; इंग्लिश लॉ प्रमाणें कारपोरेशन, लग्न झालेल्या स्त्रिया (नवऱ्याचे अनुमताखेरीज) व फेलन्स, परदेशचा मनुष्य, राजरक्षणबहिष्कृत, वगैरे यांस कांहीं प्रसंग खेरीजकरून करार करण्याचा अधिकार नाहीं. विशेष माहिती करितां वासुदेव जगन्नाथ कीर्तिकरकृत करार शास्त्राचें प्रकरण २ रें आणि स्मिथकृत करारशास्त्राचें लेक्चर ८, ९ व १० पहा.

४. इंग्लंडांतील कायद्यावरून कोणी एकादा मनुष्य करार करण्यास लायक आहे किंवा नाहीं या प्रश्नाचा निकाल करणें तो, त्याच्या राहण्याच्या ठिकाणाच्या कायद्यावरून करण्यांत येतो. हें इंग्लिश कायद्याचें मूलतत्व सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम ११ वरून मान्य केलें आहे.

अल्पवयी मनुष्यानें अल्पवयांत असतां करून दिलेल्या रोख्यावरून, त्यानें तो रोखा वयांत आल्यानंतर मान्य केला नसेल तर त्यावर दावा करितां येत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १९ पृ. ६९७; न्या. पु. ३० मुं. दि. नि. पृ. ३११).

५. मी पूर्ण वयांत आलेलों आहे असें सांगून एका अल्पवयी मनुष्यानें कांहीं मिळकत अस विकत दिली आणि खरेदीखत लिहून देऊन तें नोंदवून दिलें. मी २२ वर्षांचे वयाचा आहे असें त्यानें त्या खरेदीखतांत लिहिलें होतें. मी अल्पवयी असतांना तें खरेदीखत लिहून दिलें होतें असें कारण लावून तें रद्द करून घेण्यासाठीं त्या अल्पवयी मनुष्यानें दावा केला.

ठरावः—अशा प्रकारचा दावा करण्यास प्रतिबंध आला आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २१ पृ. १९८; न्या. पु. ३२ मुं. दि. नि. पृ. १०२).

६. **चीफ ज. फ्यारन आणि ज. रानडेः—**(ज. फुलटन यांचा अभिप्राय भिन्न आहे):— इंडियांत अल्पवयी मनुष्यानें केलेला करार निरर्थक नाहीं. परंतु निरर्थक करण्याजोगा तो करार असतो, आणि तो अल्पवयी वयांत आल्यावर त्याला तो करार मंजूर करितां येतो.

एकाद्या अल्पवयी बापानें वडिलोपार्जित मिळकतींतील आपले सर्व हक्क व संबंध आपल्या पुत्रास देण्याबद्दल सोडचिठी दिली असेल आणि वयांत आल्यानंतर त्यानें ती मंजूर केली असेल तर ती व्यवहारोपयोगी होते. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २३ पृ. १४६; न्या. पु. ३४ मुं. दि. नि. पृ. ४७ व ४८).

७. गहाणाची सर्व रक्कम अज्ञानानें दिली असून त्याच्या नांवानें गहाणखत करून दिलें असेल तर सदर गहाणखत स्वतः अज्ञानास व त्याच्या तर्फेनें दुसऱ्या कोणत्याही इसमास अमलांत आणतां येईल. (इ. ला. री. म. सी. व्हा. ४० पृ. ३०८; न्या. पु. ५२ म. दि. नि. पृ. १६).

८. **अज्ञान स्त्रीनें हक्क सोडणेंः—**इंडियन मेजारिटी आक्टाप्रमाणें जी मुसलमान स्त्री अज्ञान आहे अशा स्त्रीनें आपला हा[illegible] हक्क सोडून देणें ही गोष्ट [illegible] आक्टाप्रमाणें

( सन १८७२ चा आक्ट ९ बेकायदेशीर आहे. ( इं. ला. री. क. सीं. व्हा. ४१ पृ. १०२६; न्या. पु. ५३ म. दि. नि. पृ. ५६ ).

९. समाईक हिंदू कुटुंबास लिहून दिलेलें गहाणखत ज्या इसमाच्या नांवानें लिहून दिलें असेल तो त्या गहाणखताचे वेळेस अल्पवयी असेल, तर तेवढ्यावरून तें गहाणखत निरर्थक होणार नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३० पृ. ६३; न्या. पु. ४३ अ. दि. नि. पृ. ५ ).

१०. ह व र या दोन हिंदू विधवांनीं वादींना एक दुकान विकलें. र ही अज्ञान होती. खरेदीखत नोंदण्याचें नाकारल्यामुळें, दुकानावरील गहाण सोडविण्याबद्दल दिलेले २३१ रुपये, व विकत देणारांस दिलेले रोख रुपये १००, परत मिळण्याबद्दल व दुकानाची विक्री होण्याबद्दल विकत घेणारांनीं दावा आणला.

ठरावः—अज्ञानानें विक्री केली असल्यामुळें, गहाण सोडविल्यानें वादींना कोणताही हितसंबंध मिळणार नाहीं, व अज्ञानास दिलेले १०० रुपये अज्ञानास अवश्य लागणाऱ्या गोष्टीकरतां दिले नसल्यामुळें, सदहू रक्कमही त्यांस परत मिळणार नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३२ पृ. २५; न्या. पु. ४५ अ. दि. नि. पृ. ४ ).

११. कांहीं जमिनदारी मिळकत कांहीं इसमांस विकण्यांत आली होती. सदर इसम विक्रीच्या वेळीं अज्ञान होते. नंतर त्रयस्थ इसमांनीं दावा लाऊन खरेदीदारांपासून मिळकतीचा कबजा काढून घेतला.

ठरावः—खरेदी देणारांस खरेदी घेणारांनीं जी खरेदीची रक्कम दिली होती ती खरेदी देणारांपासून परत घेण्याचा हक्क तरी निदान खरेदी घेणारांस असतो. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३५ पृ. ३७०; न्या. पु. ४८ अ. दि. नि. पृ. ४२ ).

१२. **अज्ञान पक्षकाराचें बाबतींत वर्तन ही कसोटी.**—अज्ञानानें केलेला विक्रीचा करार हा कायद्याप्रमाणें निष्परिणामी असला तरी, पक्षकारांच्या दरम्यान करारामुळें परस्पर हक्कसंबंध उत्पन्न झाले असोत अगर पक्षकारांच्या दरम्यान कराराचा अभाव असो—गोष्टीच्या विरहित असा न्यायतत्वांनुसार कोर्टास अधिकार असतो व या अधिकारांत खरेदीखत रद्द करून मिळकतीचा कबजा मिळण्याबद्दल आणलेल्या दाव्यांत अज्ञानास मोबदल्याची जी रक्कम प्रत्यक्ष मिळाली असेल ती परत देण्याच्या शर्तीवर अज्ञानातर्फे हुकुमनामा कोर्टास करितां येतो. प्रत्येक कज्जांत पक्षकारांचें वर्तन ही कसोटी लावावयाची असते. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४५ पृ. ६४४; न्या. पु. ५८ अ. दि. नि. पृ. ६२ ).

करार करण्याला वेडा नाहीं ह्मणजे काय.

१२. कोणी मनुष्य करार करते वेळीं तो करार समजतो आहे, आणि आपल्या नफ्यातोटयावर त्याचा परिणाम काय होईल याविषयीं विचारयुक्त निर्णय करूं शकत आहे, तर तो मनुष्य करार करण्यास वेडा नाहीं असें म्हटलें पाहिजे.

जो मनुष्य नेहमीं वेडा असून केव्हां केव्हां बरा असतो त्यानें बरा असल्या वेळीं करार केल्यास चालेल.

जो मनुष्य नेहमीं बरा असून केव्हां केव्हां वेडा असतो त्यानें वेडा असल्या वेळीं करार केल्यास चालणार नाहीं.

## उदाहरणें.

( अ. ) वेड्याच्या इस्पितळांत असलेला एकादा वेडा केव्हां केव्हां बरा असतो. त्यानें बरा असल्या वेळीं करार केल्यास चालेल.

( ब. ) एकाद्या वेडा नसलेल्या मनुष्याला ज्वर आल्यामुळें भ्रांतिष्ट झाला आहे अथवा दारू पिऊन इतका छाकटा झाला आहे कीं, तो करारांतील संकेत समजूं शकत नाहीं, किंवा त्या करारांपासून आपल्या नफ्या तोट्यावर काय परिणाम होईल याविषयीं विचारयुक्त निर्णय करूं शकत नाहीं, तर ती भ्रांति किंवा कैफ असे-पर्यंत त्यानें करार केल्यास चालणार नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

गहाणांचे व्यवहार करण्यांत आले त्या वेळेस गहाण देणारा इसम वेडा होता असें कारणावरून ते व्यवहार रद्द करून घेण्यासाठीं केलेल्या दाव्यांत, गहाण देणाराचा वेडेपणा उन्मत्त स्वरूपाचा होता अशा विषयीं वादीचें साक्षीदारांनीं पुरावा दिला होता, परंतु त्या पुराव्यावर कनिष्ठ कोर्टांपैकीं कोणीही विश्वास ठेविला नव्हता.

ठरावः—ज्या प्रकारच्या वेडेपणाबद्दल वादीतर्फे पुरावा देण्यांत आला होता तो प्रकार बाजूस ठेऊन त्या ऐवजीं वादी हा मनानें दुबळा होता व त्यामुळें पराधीन झालेला होता, असें अव्वल कोर्टाला ठरविण्याचा अधिकार नव्हता, आणि तसें ठरवून वादीला त्या कारणावरून अंशतः दाद देणें कोर्टास वाजवी नव्हतें.

वादीनें ज्या प्रकारचा वेडेपणा असल्याबद्दल म्हटलें होतें तशा प्रकारचा वेडेपणा नव्हता अशाविषयीं समकालीन ठराव असल्याकारणानें, आणि गहाणाचे व्यवहारास मोबदला नव्हता असें शाबीत करण्यांत आलें नसल्यामुळें, दावे रद्द करून औधचे जुडिशियल कमिशनरचे कोर्टानें केलेला ठराव कायम करण्यांत आला. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. २७ पृ. १; न्या. पु. ४० अ. दि. नि. पृ. १ ).

**१३.** दोन किंवा अधिक मनुष्यें एकाच गोष्टींविषयीं एकाच अर्थी कबूल असले म्हणजे ते त्या गोष्टीला आपली राजी देतात असें म्हणावें.

"राजी" म्हणजे" काय.

**१४.** राजी ही खालीं लिहिल्याप्रकारांनीं जेव्हां होत नसते तेव्हां तिला 'राजी खुषी' असें म्हणावें; म्हणजे,

"राजी खुषी" काय.

( १ ) पंधरावे कलमांत लक्षण केल्याप्रमाणें जी सक्ति तिच्या योगानें झाली नसेल तर, अथवा

( २ ) सोळावे कलमांत लक्षण केल्याप्रमाणें जो गैरवाजवी दाब तेणेंकरून झाली नसेल तर, अथवा

( ३ ) सतरावे कलमांत ज्याचें लक्षण केलें आहे अशा कपटानें झाली नसेल तर, अथवा

( ४ ) अठरावे कलमांत लक्षण केल्याप्रमाणें जी गैरसमजाविशी तेणेंकरून झाली नसेल तर, अथवा

( ५ ) वीस, एकवीस आणि बावीस, या कलमांतील ठरावांस पात्र अशी जी चूक तेणेंकरून झाली नसेल तर.

अशी सक्ति, गैरवाजवी दाब, कपट, गैरसमजाविशी, किंवा चूक जर घडली नसती तर राजी झालीच नसती असें जेव्हां असेल, तेव्हां वर लिहिल्याप्रमाणें ( म्हणजे सक्तीनें वगैरे ) राजी मिळाली असें म्हणावें.

" सक्ति " लक्षण.

१५. सक्ति म्हणजे, एखाद्या मनुष्यास कबुलायत करणें भाग पाडण्याच्या उद्देशानें ' इंडियन पिनल कोड ' यांत ज्याची मनाई केली आहे असें कोणतेंही कृत्य करणें किंवा करितों अशी भीति घालणें, अथवा कोणतीही जिंदगी कायद्याविरुद्ध अटकावून ठेवणें अथवा अटकावून ठेवितों अशी भीति घालणें, कीं जेणेंकरून कोणत्याही एखाद्या मनुष्याचें नुकसान व्हावें, ती होय.

खुलासा.—सक्ति करावयाच्या ठिकाणीं ' इंडियन पिनलकोड ' अमलांत असो किंवा नसो, त्यावर तात्पर्य नाहीं.

## उदाहरण.

अ हा मोठ्या समुद्रांत एका इंग्रजी जहाजावर असें कृत्य करून ब याजकडून कबुलायत करवितो कीं, तें कृत्य इंडियन पिनलकोड प्रमाणें अन्यायाची धमकी होय.

नंतर अ हा कलकत्ता येथें करार मोडल्याचा दावा बवर आणितो.

तर अनें केलेलें कृत्य इंग्लंडच्या कायद्याप्रमाणें जरी गुन्हा होत नाहीं, आणि जरी तें कृत्य केल्यावेळीं व ठिकाणीं इंडियन पिनलकोडचें ५०६ वें कलम अमलांत नव्हतें तरी अनें सक्ति केली असें झालें.

## विशेष समजुतीची टीप.

आत्महत्या करण्याची धमकी.—आत्महत्या करण्याची धमकी देऊन एका हिंदू इसमानें आपल्या बायकोचें व मुलाचें मन आपल्या भावाच्या नांवानें ज्या मिळकतीवर ते स्वतःची मालकी सांगत होते अशा मिळकतीसंबंधानें बेदावेपत्र करून देण्याविषयीं वळविलें.

चीं. ज. वालिस व ज. शेषगिरी अय्यर यांचा ठरावः—( ओल्डफील्ड यांचें मत विरुद्ध होतें ):—आत्महत्या करण्याची धमकी देणें हें हिंदुस्थानांतील कराराच्या आक्टाचें कलम १५ मधील अर्थाप्रमाणें सक्ती या सदरांत येतें व झालेलें बेदावेपत्र निरर्थक करितां येण्यासारखें आहे.

चीं. ज. वालिस व ज. शेषगिरी अय्यरः—आत्महत्येस इं. पि. कोडअन्वयें मनाई करण्यांत आली आहे व एखाद्या हिंदूनें आत्महत्या केल्यास त्यामुळें त्याचें स्वतःचेंच नुक-

सान होतें असें नाहीं तर कलम १५ मधील अर्थाप्रमाणें या कृत्यामुळें त्याच्या बायकोचें व मुलाचेंही नुकसान होतें.

ज. ओल्डफील्डः—प्रत्यक्ष रीतीनें अगर अनुमानानें ज्या कृत्यांस इं. पि. कोडमध्यें मनाई करण्यांत आली आहे अशा कृत्यांत आत्महत्येचा समावेश होत नाहीं; व यामुळें आत्महत्या करण्याची धमकी ही सक्ती होणार नाहीं व या कारणामुळें वेदावेपत्र निरर्थक करितां येत नाहीं. ज्या इसमानें धमकी दिली त्याचा वेदावेपत्राशीं संबंध नसल्यामुळें कराराच्या आक्टाचें कलम १६ प्रमाणें अयोग्य वजनाच्या कारणामुळेंही सदर वेदावेपत्र निरर्थक करितां येण्यासारखें नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४१ पृ. ३३; न्या. पु. ५३ म. दि. नि. पृ. ४ ).

"गैरवाजवी दाब" याची व्याख्या.

"१६. (१) जेव्हां करार करणाऱ्या पक्षकारांमधला संबंध असा असेल कीं, त्यांतला एक पक्षकार दुसऱ्या पक्षकाराच्या मनावर वर्चस्व चालविण्यासारख्या स्थितींत असेल, आणि त्यानें त्या आपल्या स्थितीचा उपयोग त्या दुसऱ्या पक्षकाराविरुद्ध गैरवाजवी फायदा करून घेण्यासाठीं केलेला असेल, तेव्हां तो करार ' गैरवाजवी दाबाच्या ' योगानें करून घेतला आहे असें म्हणावें.

( २ ) विशेषेंकरून, आणि वर घालून दिलेल्या तत्वाच्या सामान्य व्याप्तीस बाध न येतां, खालीं लिहिलेल्या बाबतींत एक मनुष्य दुसऱ्याच्या मनावर वर्चस्व चालविण्यासारख्या स्थितींत आहे असें समजलें पाहिजे:—

( अ ) तो मनुष्य त्या दुसऱ्या मनुष्यावर खरा किंवा दर्शनी अधिकार चालवीत असेल किंवा त्याचें त्या दुसऱ्या मनुष्याशीं विश्वासाचें नातें असेल त्या बाबतींत; अगर

( ब ) त्यानें, ज्या मनुष्याची मानसिक शक्ति वार्धक्यामुळें, आजारामुळें, अगर मानसिक किंवा शरीरसंबंधीं व्यथेमुळें कांहीं काळपर्यंत किंवा कायमची दूषित झालेली असेल अशा मनुष्याबरोबर करार केलेला असेल त्या बाबतींत.

( ३ ) दुसऱ्या मनुष्याच्या मनावर वर्चस्व चालविण्यासारख्या स्थितींत असलेला कोणताही मनुष्य त्याबरोबर करार करील आणि तो करार गैरवाजवी आहे असें उघड उघड अगर हजर केलेल्या पुराव्यावरून दिसून येईल, तेव्हां, तो करार गैरवाजवी दाबाच्या योगानें करून न घेतल्याबद्दल पुरावा करण्याचा बोजा, जो मनुष्य त्या दुसऱ्याच्या मनावर वर्चस्व चालविण्यासारख्या स्थितींत असेल, त्यावर राहील.

ह्या पोटकलमांतील कोणत्याही ठरावावरून, सन १८७२ चा हिंदुस्थानचा पुराव्याचा आक्ट याच्या १११ व्या कलमांतील ठरावास बाध येणार नाहीं.

### उदाहरणें.

( अ ) अ आपला मुलगा ब झाला, तो अल्पवयीं असतांना कांहीं पैसा देतो आणि ब वयांत आल्यावर त्याकडून आपल्या पितृत्वाच्या दाबाचा गैरउपयोग करून, त्या दिलेल्या पैशाबद्दल यावयाच्या रकमेहून जास्त रकमेचें खत लिहून घेतो, अन गैरवाजवी दाबाचा उपयोग केला.

( ब ) रोगानें किंवा वार्धक्यामुळें अशक्त झालेला अ याकडून त्याचा वैद्यकीय उपचारक ब हा आपल्या उपचारकसंबंधाच्या दाबाचा उपयोग करून आपल्या धंद्यासंबंधानें केलेल्या नोकरीबद्दल अयोग्य रकम आपल्यास देण्याचें कबूल करण्यास त्याचें मन वळवितो. ब गैरवाजवी दाबाचा उपयोग करितो.

( क ) अ हा त्याच्या गांवचा सावकार ब याला कांहीं कर्ज देणें असून तो करार गैरवाजवी दाबाच्या योगानें करून घेतला नाहीं हें शाबीत करण्याचा बोजा बवर आहे.

( ड ) बाजारांत पैशाची चणचण आहे अशा वेळीं अ हा एका सावकाराकडे कर्ज मागतो. तो सावकार नेहमींपेक्षां फार जास्त अशा व्याजाशिवाय तें कर्ज देण्याचें नाकारतो. अ हा तें कर्ज तशा अटीवर घेतो. ही एक साधारण व्यवहारांतली गोष्ट झाली, आणि तो करार गैरवाजवी दाबाच्या योगानें करून घेतलेला नाहीं. ( हें कलम सन १८९९ चा आक्ट ७ कलम २ वरून नवीन दाखल केलें आहे ).

### विशेष समजुतीच्या टिपा.

१. खरेदी देणारा इसम कर्जबाजारी असून अडाणी असेल आणि व्यवहारांतील मोबदला अयोग्य असेल तर इतक्या गोष्टी एकत्र झाल्या असतां त्या व्यवहारांत गैर वाजवी दाबाचा उपयोग एका पक्षकारानें दुसऱ्या पक्षकारावर केला असला पाहिजे असें कोर्टास अनुमान काढतां येईल. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २५ पृ. १२६; न्या. पु. ४४ क. दि. नि. पृ. ५५ ).

२. कपटाचे कारणावरून कोणताही एखादा करार निरर्थक होत नाहीं, परंतु कपटामुळें ज्याचें नुकसान झालें असेल त्यानें तक्रार केली असतां तो करार निरर्थक होण्याजोगा असतो.

ता. १५ एप्रिल सन १८९३ रोजीं झालेल्या एका गहाणखतावरून येणें झालेली व्याजाची रक्कम गहाणमिळकतीची विक्री करून प्रतिवादीपासून घेण्यासाठीं वादीनें सन १९०० सालीं दावा केला होता. सदर गहाणखत मीं राजीखुषीनें दिलें नव्हतें आणि मजवर फौजदारी काम चालविण्याचें भय घातल्यामुळें मीं तें लिहून दिलें होतें, अशी प्रतिवादीनें तक्रार केली.

ठरावः—प्रतिवादीवर झालेल्या दाव्यास कपटाचे कारणावरून हरकत सांगण्याचा प्रतिवादीस हक्क होता आणि तो व्यवहार रद्द करून घेण्यासाठीं प्रतिवादीनें दावा केला नसला तरी ती तक्रार वादीनें केलेल्या दाव्यांत करण्याचा प्रतिवादीस हक्क पोंचतो.

शिवाय असें ठरविण्यांत आलें कीं, कज्जांतील अहवालांवरून पाहतां, मुदत निघून गेल्याचे कारणावरून प्रतिवादीनें केलेली तक्रार त्यास करण्यास प्रतिबंध येत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २८ पृ. ६३९; न्या. पु. ३९ मुं. दि. नि. पृ. ३१६ ).

जे व्यवहार गैरवाजवी आहेत असें कोर्टास वाटतील त्यांमध्यें हात घालण्याचा आणि त्यांपासून प्रतिवादीचा बचाव करण्याचा, कराराच्या आक्टाचीं कलमें १६ व १९ अ वरून कोर्टास अधिकार आहे.

व्याजाचा वाजवी दर कोणता घ्यावा हें ठरविण्यासाठीं प्रत्येक कज्जांतील अहवाल पाहिले पाहिजे. (इं. ला. रीं. मुं. सी. व्हा. ३१ पृ. ३४८; न्या. पु. ४२ मुं. दि. नि. पृ. १६४ व १७०).

अयोग्य वजन अगर दाब याचा उपयोग केला होता असें कज्जांतील हकीगतीवरून दिसून आल्याशिवाय फौजदारी खटला न चालविण्याबद्दल केलेल्या करारान्वयें दिलेली रक्कम अगर दिलेली जामिनकी परत देण्याबद्दल हुकूम करितां येणार नाहीं. फौजदारी खटल्यांत शिक्षा होण्याची भीति ही अयोग्य वजन या सदरांत येत नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४३ पृ. ३४६; न्या. पु. ५७ क. दि. नि. पृ. १०).

ज. मुकर्जी:—रिणकोची सांपत्तिक स्थिती अतिशय वाईट असलेमुळें तिचा फायदा घेण्यासारखी सावकाराची स्थिती होती व त्यांचे दरम्यान झालेला व्यवहार सदसद्विवेक बुद्धीस सोडून होता ही गोष्ट दाव्यांतील हकीगतीवरून स्पष्ट दिसून येत असेल तर कराराच्या आक्टाचें कलम १६ लागू पडण्यास ज्या दोन गोष्टींचा मिलाफ होणें अवश्य असते त्या दोन्ही गोष्टी येथें एकत्र झाल्या आहेत असें म्हणतां येईल. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४२ पृ. ६५२; न्या. पु. ५७ क. दि. नि. पृ. २७ व २८).

गैरवाजवी दाब केव्हां समजावा.—दोन इसमांस असा संबंध होता कीं, एक साहजिकपणेंच दुसऱ्याच्या मदतीवर अवलंबून असे व दुसरा इसम हा पहिल्या इसमाच्या इच्छाशक्तीवर आपलें प्रभुत्व चालविण्यासारखा स्थितींत असे एवढी गोष्ट शाबीत झाल्यामुळें अयोग्य वजन शाबीत झालें असें शाबीत होतें असें मानणें चुकीचें आहे. या गोष्टीमुळें फक्त एकाचें दुसऱ्यावर वजन होतें इतकेंच शाबीत होतें. परंतु इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशांतील कायद्याप्रमाणें सदहू वजन हें अयोग्य वजन होण्यास एकाचें दुसऱ्यावर वजन होतें यापेक्षां अधिक कांहीं गोष्टी शाबीत कराव्या लागतात. ज्या इसमाचें दुसऱ्या इसमाच्या इच्छाशक्तीवर प्रभुत्व होतें त्यानें आपल्या प्रभुत्वाचा उपयोग करून स्वतःचा अयोग्य फायदा करून घेतला असून जो इसम त्याच्या मदतीवर अवलंबून होता अगर त्याच्या नियंत्रणाखालीं होता त्याचें त्यानें नुकसान केलें आहे हें शाबीत झालें पाहिजे.

एकाचें दुसऱ्या इसमावर वजन होतें हें शाबीत होऊन ज्या इसमाचें वजन होतें त्या इसमाबरोबर ज्या इसमावर त्याचें वजन होतें त्याचा व्यवहार झाला असून तो व्यवहार नेहमींच्या व्यवहारास सोडून आहे असें शाबीत होईल तर सदहू व्यवहार घडवून आणण्याचें कामीं आपण आपल्या वजनाचा उपयोग केला नाहीं व दस्तऐवज करून देणाऱ्या इसमास या व्यवहारासंबंधानें एका त्रयस्थ व स्वतंत्र अशा इसमाचा सल्ला मुद्दाम मिळवून दिलेला होता असें शाबीत करण्याचा फार मोठा बोजा ज्या इसमाचें वजन होतें त्या इसमावर येऊन पडेल. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४३ पृ. ५४६; न्या. पु. ५५ म. दि. नि. पृ. २६).

७. **या कलमांत समावेश होणारे करार.**—ज्या करारांचा समावेश कराराच्या आक्टाचें कलम १६ मध्यें होत नाहीं अशा करारांत ठरलेला व्याजाचा दर कमी करण्याचा अधिकार कोर्टास नाहीं ही तक्रार ज्या इसमांच्या दरम्यान करार झाला तेच इसम दाव्यांत पक्षकार असतील तेव्हां लागू पडते. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४१ पृ. ५३३; न्या. पु. ५४ अ. दि. नि. पृ. २९).

८. पुराव्याचा बोजा कसा व कोणावर पडतो.—सन १८९९ चा आक्ट ६ प्रमाणें दुरुस्त केलेल्या कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ ) कलम १६ प्रमाणें एखाद्या इसमास त्यानें करून दिलेला करार ज्या इसमांशीं सदर करार झाला होता त्या इसमाच्या परिस्थितीमुळें तो आपल्याकडून वाटेल ती गोष्ट करून घेण्यासारखा होता असें शाबीत केल्याशिवाय अयोग्य वजनाच्या कारणामुळें रद्द करून घेतां येत नाहीं. ही गोष्ट शाबीत झाल्यानंतर या परिस्थितीचा उपयोग करून घेऊन सदर इसमानें आपला अयोग्य फायदा करून घेतला आहे किंवा काय, हा प्रश्न उत्पन्न होतो व झालेला व्यवहार नेहमींच्या पद्धतीस सोडून आहे असें दिसत असेल तर या संबंधाचा पुराव्याचा बोजा करार करून घेणाऱ्या इसमावर असतो.

यामुळें पुष्कळ तारण मिळकत गहाणांत लाऊन दिली असून त्यांतील व्याजाचा दर जबर व जाचक असला तरी गहाण घेणारा हा आपल्याकडून वाटेल तें करून घेण्यासारख्या परिस्थितीमध्यें होता असें गहाण देणाराकडून शाबीत न झाल्यास सदर गहाणाचा दस्तऐवज अयोग्य वजन खर्च करून घेतला आहे असें अनुमान करितां येणार नाहीं. ( इं. ला. री. पा. सी. व्हा. ३ पृ. २७९; न्या. पु. ५९ पा. दि. नि. पृ. ११ ).

१७. कपट म्हणजे, कराराच्या कोणत्याही पक्षकारानें, किंवा त्याला ठाऊक असून त्यानें कानाडोळा केल्यामुळें, किंवा त्याच्या गुमास्त्यानें, त्या कराराच्या दुसऱ्या पक्षकारास किंवा त्याच्या गुमास्त्यास ठकविण्याचा उद्देश मनांत धरून, अथवा करार करण्यास त्याचें मन वळविण्यासाठीं, केलेलीं जीं खालीं लिहिलेलीं कृत्यें त्यांतून कोणतेंही होय, व कपट शब्दांत त्यांतून कोणत्याचाही समावेश होतो:—

" कपट " लक्षण.

( १ ) एकादी गोष्ट खरी नसून, ती खरी आहे असें जो मानीत नाहीं तशा मनुष्यानें ती खरी असल्याप्रमाणें सुचविणें;

( २ ) कांहीं गोष्ट अशी आहे हें ज्यास माहीत आहे किंवा तशी असल्याविषयीं ज्यास वाटत आहे तशा मनुष्यानें ती मुद्दाम लपवून ठेवणें;

( ३ ) वचन पुरें करण्याचा उद्देश अगदीं नसतां वचन देणें;

( ४ ) दुसरें कोणतेंही कृत्य, कीं जें दुसऱ्यास ठकविण्या जोगतें होय;

( ५ ) कोणतेंही कृत्य किंवा वर्जन, कीं जें कपटाचें होय असें कायद्यांत स्पष्ट रीतीनें फर्माविलें आहे.

खुलासा. — ज्या गोष्टी एकाद्या मनुष्यास समजल्या असतां करारास राजी द्यावी कीं न द्यावी असें त्या मनुष्यास वाटूं शकेल तशा गोष्टीविषयीं केवळ मौन धरल्यास तें कपट होत नाहीं; मात्र जर तो प्रसंग असा असेल कीं, त्या प्रसंगाच्या संबंधानें पाहिल्यास मौन धरणारानें बोलावें हें त्याचें काम होय, अथवा जर कांहींच न बोलणें हें बोलल्याप्रमाणें होय असें असेल, तर मात्र मौन धरणें हें कपट होईल.

## उदाहरणें.

(अ.) अ हा लिलांव करून बला एक घोडा विकतो. आणि तो घोडा अयबदार आहे हें अला ठाऊक आहे. घोडा अयबदार असल्याविषयीं अ हा बला कांहीं सांगत नाहीं तर यांत अ यानें कपट केलें असें होत नाहीं.

(ब.) ब ही अची मुलगी असून नुक्तीच वयांत आली आहे. तर या पक्षकारांचा संबंध अशा प्रकारचा आहे कीं, घोडा अयबदार असल्यास बला सांगणें हें अचें काम आहे.

(क.) ब अला म्हणतो कीं, "हा घोडा अयबदार आहे असें तूं सांगत नसल्यास तो अयबदार नाहीं, चांगला आहे असें मी मानेन;" अ कांहींच बोलत नाहीं. तर येथें अनें मौन धरलें तें बोलल्याप्रमाणें होय.

(ड.) अ आणि ब हे व्यापारी असून कांहीं एक करार करितात. अला किंमतींत फेरफार झाल्याविषयीं गुप्त वर्तमान समजलें आहे कीं, जेणेंकरून बला करार समक्ष करावा कीं न करावा याविषयीं संशय येईल. बला तें वर्तमान अनें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं.

### विशेष समजुतीच्या टिपा.

१. इं. पि. को. कलम २५—कपटानें कोणाकडून कांहीं घेण्याच्या इरायानें जर कोणी कांहीं केलें तरच त्यानें तें "कपटानें" केलें असें समजावें. एरव्हीं नाहीं.

२. या कलमांतील नियम कलम २१५ यांतील ठरावास लागू आहेत.—चौ. ज. स्वाव:—वादी हा निव्वळ नांवापुरता पुढें केलेला इसम होता हें महत्वाची गोष्ट छपऊन ठेवणें या सदरांत येईल. कराराच्या आक्टाचीं कलम १७ व १९ मध्यें कपटासंबंधानें जे नियम घालून दिले आहेत ते आक्टाचें कलम २१५ प्रमाणें मुख्य व गुमास्ता यांचे बाबतींत लागू करण्यांत आले आहेत. (इं. ला. री. स. सी. व्हा. ४५ पृ. १००५; त्या. पु. ५२ म. दि. नि पृ. ३५).

"गैरसमजाविशीं" लक्षण.

१८. गैरसमजाविशीं म्हणजे खालीं लिहिल्याप्रमाणें होय, व गैरसमजाविशीं शब्दांत खालीं लिहिलेल्याचा समावेश होतो.

(१) कांहीं गोष्ट खरी नसून ती खरी आहे असें जरी एखाद्या मनुष्यास वाटत आहे, तरी त्याला असलेल्या माहितीवरून जितक्या खात्रीनें त्या गोष्टीविषयीं सांगणें योग्य होईल त्याहून जास्त खात्रीनें सांगणें;

(२) कांहीं कर्तव्य कामाविषयीं अशा रीतीनें कसूर करणें कीं, ठकबाजी करण्याचा हेतु नसला, तरी तिच्या योगानें ती करणाराचा, किंवा जो कोणी *त्यांजवरून आपला हक्क सांगत असेल त्याचा, दुसऱ्या एखाद्या मनुष्याचें

* त्यांजवरून म्हणजे ती करणाराच्या तर्फे.

किंवा +त्याजवरून आपला हक्क सांगत असेल अशा कोणतेही मनुष्याचें अहित होईल अशा रीतीनें त्या दुसऱ्यास भलतेच समजावून दिल्यामुळें, कांहीं फायदा होईल;

(३) कबुलायतीचा विषय होय अशी जी वस्तु तिच्या तत्वाविषयीं त्या कबुलायतीच्या एकाद्या पक्षकाराकरवीं कांहीं तरी चूक करविणें, मग ती करविण्यांत कांहीं लबाडी नसली म्हणून चिंता नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. प्रतिवादींनीं वादींपासून एक जहाज भाड्यानें घेण्याचा मुंबई येथें करार केला. तें जहाज २७००—२८०० टनांच्या वजनाचें आहे असें वादींनीं त्या करारनाम्यांत लिहून दिलें. तें जहाज मुंबईस कधींच आलें नव्हतें व प्रतिवादी यांस त्याबद्दलची मुळींच माहिती नव्हती. त्या करारनाम्याबद्दल ज्यावेळेस बोलणें चाललें होतें त्यावेळेस, तें जहाज खरोखरच २८०० टनाहून जास्त वजनाचें नाहीं असें वादींनीं प्रतिवादींस सांगितल्याबद्दल, या कज्जांत पुरावा देण्यांत आला आहे तथापि तें जहाज ३०४५ टनांच्या वजनाचें आहे असें आढळून आलें व त्यामुळें प्रतिवादींनीं त्या कराराअन्वयें तें जहाज घेण्याचें नाकबूल केलें.

ठराव:—त्या जहाजाच्या आकाराचे संबंधानें वादींनीं प्रतिवादींस खोटी माहिती दिली असल्यामुळें तो करार रद्दबातल आहे असें मानण्यास प्रतिवादींस हक्क आहे. (सन १८७२ चा आक्ट ९ कलमें १०, १३, १४, १८ व १९). (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १४ पृ. २४१; न्या. पु. २५ मुं. दि. नि. पृ. ११९).

२. जी मिळकत लिलांवानें विकण्यांत आली आहे तिजमध्यें फैसल्यांतील रिणकोचे विकतां येण्यासारखे हितसंबंध नाहींत असें लिलांवांतील खरेदीदारास आढळून आल्यामुळें, विकलेल्या मिळकतीचा कबजा मिळण्याकरतां, अथवा मोबदल्याचा पूर्ण अभाव झाल्यामुळें खरेदीची रकम परत मिळण्याकरतां, लिलांवांतील खरेदीदारानें फैसल्यांतील रिणकोविरुद्ध दावा लावला. सदर दावा चालेल किंवा नाहीं याबद्दल प्रश्न उपस्थित झाला.

ठराव:—फैसल्यांतील रिणकोचे हक्क, मालकी व हितसंबंध जेव्हां विकले जातात, तेव्हां फैसल्यांतील रिणकोचे विकतां येण्यासारखे हितसंबंध असतात, अशी सि. प्रो. को. प्रमाणें आक्षिप्त हमी असल्यामुळें प्रस्तुत दावा चालेल. अशा आक्षिप्त हमीमुळें, कांहीं परिस्थितीमध्यें फैसल्यांतील रिणकोपासून खरेदीची रकम परत घेण्याचा लिलांवांतील खरेदीदाराचा हक्क मान्य करण्यांत आलेला आहे. फैसल्यांतील रिणको व खरेदीदार यांजमधील परस्पर संबंध करारासारखे असतात. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३५ पृ. २९; न्या. पु. ४६ मुं. दि. नि. पृ. २३).

३. गहाण मिळकतीच्या किंमतीपेक्षां जास्त गहाणाच्या बोजास मात्र ठेवून सदर्हू विक्री करण्यांत आली होती; आणि गहाण सोडविण्याचा जो हक्क वादीनें खरेदी घेतला होता तो अगदीं कवडी किंमतीचा होता, असें विक्रीनंतर त्याचे लक्षांत आलें. लिलांव करणाऱ्या अधिकाऱ्यानें केलेल्या गैरसमजाविशीमुळें माझी भलतीच समजूत झाली आणि म्हणून मी ती मिळकत विकत घेतली, सबब ती विक्री रद्द करण्यांत यावी म्हणून वादीनें दावा केला होता. कराराचे आक्टाचें कलम १८ अन्वयें गैरसमजाविशी झाली होती हें खरें, परंतु सदर बाबद कलम १९ चे अपवादाखालीं येते. कारण, वादी हा जर साधारणपणें धूर्ततेनें वागला असतां तर खरा प्रकार त्याचें

+ त्याजवरून म्हणजे एकाद्या मनुष्याच्या तर्फे.

लक्षांत आला असतां असें कारण लावून अपील कोर्टानें तो दावा रद्द केला होता. (इं. ला. री. क. सी. व्हा. ३६ पृ. २२३; न्या. पु. ४४ क. दि. नि. पृ. ७).

१९. जेव्हां कवुलायतीला सक्ति, कपट अथवा गैरसमजाविशी येणेंकरून राजी मिळविली असेल, तेव्हां त्या कवुलायतीस त्या करारांचें स्वरूप येतें कीं, तो करार, ज्याची राजी तशा तऱ्हेनें मिळविली असेल त्या पक्षकाराच्या इच्छेस येईल तर, निरर्थक करतां येईल. (सन १८९९ चा आक्ट ६ कलम ३ वरून दुरुस्त केला आहे).

राजीखुषीनें नसलेल्या कवुलायती निरर्थक करतां येतात.

कराराच्या एखाद्या ज्या पक्षकाराची राजी कपटानें अथवा गैरसमजाविशीनें मिळविली असेल तो, जर त्याला योग्य वाटेल तर, असा आग्रह धरूं शकेल, कीं करार अमलांत आणला पाहिजे, आणि आपल्याला सांगितलेल्या गोष्टी खऱ्या असल्या तर आपण ज्या स्थितींत असतों त्या स्थितींत आपल्यास घालावें.

अपवाद.—जरी ती राजी सतरावे कलमाप्रमाणें जीस कपटयुक्त म्हणतां येईल अशा गैरसमजाविशीनें अगर तशा मौनानें मिळविली असेल, तरी ज्या पक्षकाराची राजी तशी मिळविली गेली त्याला खरें काय आहे हें साधारण हुषारीनें समजण्याचें साधन होतें असें जर आहे, तर तो करार निरर्थक करतां येणार नाहीं.

खुलासा.—एखाद्या पक्षकाराशीं कपट केलें किंवा त्याची गैरसमजाविशी केली, पण त्यानें करारास जी राजी दिली ती त्या कपटामुळें किंवा गैरसमजाविशीमुळें दिली नाहीं, असें असेल तर करार निरर्थक करण्याजोगा नाहीं.

उदाहरणें.

(अ.) अ हा बला ठकविण्याचें मनांत आणून, लबाडीनें अशी गैरसमजाविशी करतो कीं, आपल्या कारखान्यांत दरसाल पांचशें मण नीळ तयार होते, आणि तसें सांगून तो कारखाना विकत घेण्याला बचें मन वळवितो. तर बचे इच्छेस आल्यास तो करार निरर्थक करतां येईल.

(ब.) अ हा गैरसमजाविशीनें बच्या मनांत असें खोटें आणून देतो कीं, अच्या कारखान्यांत दरसाल पांचशें मण नीळ तयार होते, ब हा कारखान्याचे हिशेब तपासून पाहतो, आणि त्यावरून असें दिसून येतें कीं, फक्त चारशें मण नीळ तयार होत आली आहे. यानंतर ब तो कारखाना विकत घेतो. तर अच्या गैरसमजाविशीमुळें तो करार निरर्थक करवितां येणार नाहीं.

(क.) अ हा कपटानें बला असें समजावितो कीं आपल्या इस्टेटीवर कांहीं बोजा नाहीं. त्यामुळें ब ती इस्टेट विकत घेतो, पण ती इस्टेट गहाण

आहे. तर ब हा त्या करारास निरर्थक करूं शकेल, किंवा असा आग्रह धरूं शकेल कीं, करार अमलांत आणिला पाहिजे आणि गहाण मोकळें केलें पाहिजे.

(ड.) अच्या इस्टेटींत धातूचा कपा आहे असा बला शोध लागला आहे. व धातूचा कपा आहे ही गोष्ट असासून गुप्त ठेवण्याचें साधन वापरितो,* व ती गुप्त ठेवितो. अशा ती माहिती नसल्यामुळें बला ती इस्टेट कमी किंमतीला विकत घेण्यास मिळाली. तर अच्या इच्छेस आल्यास तो करार निरर्थक करतां येईल.

(ई.) व मेल्यावर कांहीं इस्टेट अला मिळावी असा अचा हक्क आहे. व हा मरण पावतो. वच्या मरणाची बातमी कला समजली आहे आणि क हा ती बातमी अला न समजे असें करून त्या इस्टेटीवरील अचा हक्क अनें आपणास विकावा असें अचें मन वळवितो. तर ती विक्री, अच्या इच्छेस आल्यास निरर्थक करतां येईल.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. कुटुंबांतील वडील मनुष्यानें म्यानेजर या नात्यानें केलेल्या व्यवहारामुळें नुकसान झालें असतां; त्या कुटुंबाच्या मिळकतींत ज्या ज्या मनुष्यांचा म्हणून मालकीचा संबंध आहे त्यांपैकीं प्रत्येकास त्या व्यवहाराबद्दल तक्रार करण्याचा हक्क आहे.

तो म्यानेजर आणि तिऱ्हाईत मनुष्य यांचे दरम्यान झालेल्या व्यवहारामुळें ज्या मनुष्याचें नुकसान झालें असेल त्याला तो व्यवहारच सर्व निरर्थक आहे असें ठरवून घेण्याचा हक्क आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४ पृ. २९; न्या. पु. १५ मुं. दि. नि. पृ. ७८).

२. एका इसमानें बक्षीसपत्र करून तें नोंदून दिलें होतें व त्यांत बक्षीस रद्द करण्याचा हक्क बक्षीस देणारानें आपलेकडे ठेवला नव्हता. कराराचा आक्ट (सन १८७२ चा आक्ट ९) कलम १९ मधील मुद्यावर सदर बक्षीस करून देणाऱ्या इसमास कायद्यानें ठरविलेल्या मुदतींत आपण करून दिलेल्या बक्षीसाबद्दल तक्रार करतां येत असली तरी जोंपर्यंत नोंदलेलें बक्षीसपत्र कायम आहे तोंपर्यंत ज्या इसमास कोणतेही हक्कसंबंध नाहींत अशा त्रयस्थ इसमास सदर बक्षिसाबद्दल तक्रार करण्याचा हक्क नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३६ पृ. ३७; न्या. पु. ४७ मुं. दि. नि. पृ. २० व २१).

गैरवाजवी दावाच्या योगानें करून घेतलेला करार रद्द करण्यास अधिकार.

"१९ अ. जेव्हां कोणत्याही कबुलायतीस संमत्ती गैरवाजवी दावाच्या योगानें मिळविलेली असेल, तेव्हां ती कबुलायत, ज्याची संमत्ति याप्रमाणें मिळविलेली असेल, त्याच्या मर्जीप्रमाणें रद्द करतां येण्याजोगा करार होय असें समजावें.

असा कोणताही करार पूर्णपणें रद्द करण्याचा अगर ज्या पक्षकारास तो चुकविण्याचा हक्क असेल त्याला त्याखालीं कोणताही फायदा झालेला असल्यास कोर्टास वाजवी वाटतील अशा शर्तीनिशीं व अटींनिशीं तो रद्द करण्याचा अधिकार आहे.

* साधन वापरितो म्हणजे उपाय योजितो.

## उदाहरणें.

( अ. ) अचा मुलगा एका प्रामिसरी नोटीवर बच्या नांवाची खोटी सही करितो. ब हा, अच्या मुलावर फिर्याद करण्याच्या धमकीनें अ कडून त्या खोट्या केलेल्या नोटीच्या रकमेचें खत लिहून घेतो. जर बनें त्या खतावरून दावा केला तर कोर्टाला तें रद्द करितां येईल.

( ब. ) अ हा एक सावकार ब ह्या शेतकऱ्यास १०० रुपये देतो, आणि गैरवाजवी दाबाच्या योगानें दरमहा दर शेंकडा ६ टक्यांच्या व्याजानें २०० रुपयांचें खत लिहून देण्यास त्याचें मन वळवितो. कोर्टाला तें खत रद्द करण्याचा आणि योग्य असेल त्या व्याजाच्या दरानें ते १०० रुपये परत देण्याबद्दल बला हुकूम करण्याचा अधिकार आहे. " ( हें कलम सन १८९९ चा आक्ट ६ कलम ३ वरून नवीन दाखल केलें आहे ).

झालेल्या किंवा असलेल्या गोष्टीविषयीं उभयपक्षीं चूक झाल्यास कबुलायत निरर्थक.

२०. कबुलायतीस अवश्य अशा गोष्टीविषयीं कबुलायतीच्या उभय पक्षकारांची चूक झाली असेल तर कबुलायत निरर्थक होय.

खुलासा.—कबुलायतीचा विषय होय अशा वस्तूच्या किंमती विषयीं जो अभिप्राय त्यांत चूक झाल्यास तिला गोष्टीविषयीं चूक असें ह्मणावयाचें नाहीं.

## उदाहरणें.

( अ. ) इंग्लंडाहून येत आहे असा मानलेला जाहजावरील अमुक माल बला विकण्याची कबुलायत अ हा करितो. मागाहून असें समजतें कीं, ज्या जहाजावरून तो माल येत होता तें जहाज करार झालेल्या दिवसा पूर्वींच फुटून तो माल नाश पावला. या गोष्टीची माहिती एकाही पक्षास नव्हती. तर ती कबुलायत निरर्थक समजावी.

( ब. ) बजवळून अमूक एक घोडा विकत घेण्याची कबुलायत अ हा करितो. मग असें समजलें कीं करार झाला त्या वेळीं तो घोडा जिवंतच नव्हता, आणि ती गोष्ट दोहोंतून एकाही पक्षास ठाऊक नव्हती. तर ही कबुलायत निरर्थक होय.

( क. ) अ याला ब हयात असेपर्यंत, कांहीं एका इस्टेटीवर हक्क आहे. ती इस्टेट अ हा कला विकण्याची कबुलायत करितो. कबुलायतीच्या वेळीं ब जिवंत नव्हता, आणि त्याच्या मरणाची माहिती एकाही पक्षकारास नव्हती. तर ही कबुलायत निरर्थक होय.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. जे एफ. व एल. एम. या दोघांच्या बापानें केलेल्या मृत्युपत्राअन्वयें मुंबईमधील माजगांव येथील एका घराचे जे. एफ. व एल. एम. हे दोघे संयुक्त मालक झाले. तिसरा मुलगा सी. हा जोंपर्यंत आपले भाऊ व बहीण यांजसमवेत सुखानें व भांडणतंटा न करितां राहील, तोंपर्यंत त्यास सदर घरांत राहण्याचा हक्क मृत्युपत्रावरून देण्यात आला होता. परंतु सोनें आपण आपला भाऊ एल. एम. हा इसम आहे असें कपटानें भासऊन सदर घरांपैकीं अर्ध्या घराचें गहाणखत प्रतिवादीस करून दिलें. नंतर प्रतिवादीनें वादीपासून रुपये १७७० घेऊन वादीस सदर अर्ध्या घराचें गहाणखत वेचन करून दिलें. हें वेचनपत्र करून देण्यांत एल. एम. चें अंग असावें असा वादीनें आग्रह धरल्यामुळें आपण एल. एम. आहे असें भासऊन सोनें सदर वेचनपत्रास संमत्ती दिली. सदर गहाणखत व वेचनपत्र हीं दोन्हीं वास्तविक एल. एम. नें करून दिलीं नसून त्याच्या नांवानें खोटी सही करून तिसऱ्या इसमानें करून दिलीं आहेत असें वादीस आढळून आ. ल्यामुळें मोबदला संपूर्ण नष्ट झाला आहे या मुद्यावर वादीनें वेचनादाखल दिलेली रक्कम परत मिळण्याकरतां दावा लावला. दाव्याची अव्वल चौकशी करणाऱ्या जजानें कॅव्हिएट एम्प्टॉरचें तत्व लागू करून वादीचा दावा रद्द केला. वादीनें अपील केलें.

ठराव:—खरेदीची रक्कम वादीस परत करण्यास कराराच्या आक्टाचें कलम ६१ प्रमाणें प्रतिवादी हा बांधला गेला आहे; कारण मिळकतीच्या खऱ्या मालकानें वेचनपत्रास संमत्ती दिली असा वेचन देणारा व घेणारा या दोघांचाही समज असल्यामुळें त्यांची कराराच्या एका महत्वाच्या अंगासंबंधानें चूक झाली आहे व यामुळें कराराच्या आक्टाचें कलम २० मधील ठरावाप्रमाणें सदर करार रद्द झाला आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. ३३८; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. ३०६ व ३०७ ).

२. एका गहाणखतावरून यावयाची रक्कम वसूल करण्यासाठीं अनें एक दावा केला. त्या गहाणखतांतील सर्व हक्क व केलेल्या दाव्यांतील आपले सर्व हक्कसंबंध, किंमतदार मोबदला देऊन अनें ब यास विकत दिले. "येणें प्रमाणें विकत दिलेल्या हक्कास व्यंग्य अशी किंवा एकादी पैक्याची रक्कम वसूल करितां येणार नाहीं तर त्याबद्दल मी, किंवा माझे एक्झिक्यूटर किंवा ॲडमिनिस्ट्रेटर जबाबदार होणार नाहीं," अशी त्या दस्तऐवजांत शर्त होती. ब यास ते हक्कसंबंध लावून दिल्यानंतर, अनें आणिलेल्या दाव्यांत ब यास एक सोबती वादी म्हणून सामील करण्यांत आलें. अ याचें गहाणखत होतें, त्यावर फक्त एकच साक्षीदार असल्यामुळें तें अमलांत आणण्याजोगें नव्हतें असें पुढें आढळून आलें आणि म्हणून तो दावा काढून घेण्यांत आला.

तो विक्रीचा करार निरर्थक आहे असें ठरवून घेण्यासाठीं आणि मोबदल्याची भरलेली रक्कम परत घेण्यासाठीं बनें अवर दावा केला.

ठराव:—त्या करारांतील शर्तीचा फायदा घेण्याचा अस हक्क आहे, कारण त्या शर्तीवरून सर्व जबाबदारींतून त्यास मुक्त केलेलें आहे. तें गहाणखत व्यवहारोपयोगी आहे असें मानण्यास अ आणि ब यांची उभयतांची जरी चूक झाली असली तरी तिजबद्दल तो जबाबदार होत नाहीं आणि मोबदल्याचा घेतलेला पैका परत करणें अस भाग नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३०.पृ. २८४; न्या. पु. ४२ म. दि. नि. पृ. २२ व २३ ).



२१. ब्रिटिश इंडियांत चालू अमलांत असलेल्या कोणत्याही कायद्याविषयींच्या चुकीमुळें

कायद्याविषयींच्या चुकीचा परिणाम.

करार झाला असेल तर, तो निरर्थक करण्याजोगा होत नाहीं; परंतु ब्रिटिश इंडियांत चालू नाहीं अशा कायद्याविषयींच्या चुकीचा परिणाम गोष्टीविषयीं जी चूक तिच्या प्रमाणेंच होय.

## उदाहरणें.

(अ.) अ आणि ब हे, हिंदुस्थानांतील मुदतीच्या कायद्यावरून अमुक एक कर्ज रद्द झालें अशा खोट्या समजुतीच्या आधारावर, कांहींएक करार करतात तर तो करार निरर्थक करण्याजोगा होत नाहीं.

(ब.) सन १९१७ चा आक्ट २४ परिशिष्ट २ रें अन्वयें रद्द.

## विशेष समजुतीची टीप.

ब आणि र यांनीं सन १८४८ सालीं एक जमीन वकडे गहाण ठेविली. ती जमीन आठ वर्षांचे आंत सोडवून घ्यावयाची होती आणि तसें न झालें तर ती व ह्याची निखालस मिळकत व्हावयाची होती. ती सोडवून घेण्यांत आली नाहीं आणि ती जमीन सरकारी वहीस वच्या नांवावर असल्यामुळें ब यानें वच्या तर्फे राजिनामा दिला आणि व यानें ती जमीन घेऊन सरकारांत कबुलायत लिहून दिली. पुढें ब आणि र अशीं वचीं कुळें झालीं व ते कुळें आहेत असें समजून त्यांजपासून धारा घेण्याकरितां व यानें त्यांजवर दावा केला आणि सन १८६३ सालीं धाऱ्याबद्दलचा हुकुमनामा मिळविला. व यानें ती जमीन सन १८७२ सालीं न यास विकली व न यानें तीच जमीन पुन्हां प्रतिवादी यास विकत दिली. मूळचे गहाण देणारे जे ब आणि र यांजपासून वादी यानें त्यांचा गहाण सोडवून घेण्याचा हक्क खरेदी केला असल्यामुळें ती मिळकत सोडवून घेण्याकरितां म्हणून वादी यानें हल्लींचा हा दावा केला.

ठरावः—ब यानें जो राजिनामा दिला होता त्यांत त्यानें आपल्याकडे कांहींएक बाकी ठेविलें नव्हतें आणि त्या राजिनाम्याबरोबर त्यानें कबजाही देऊन टाकिला होता. याजमुळें त्या गहाण देणारांच्या सर्व हक्कांचें तें खरेदीखत गहाण घेणारास लिहून दिल्यासारखें झालें होतें. गहाण देणारा या नात्यानें आपले हक्क काय आहेत याची माहिती नसून व गैरसमज झाली असल्यामुळें जरी ब यानें तो राजिनामा दिला असला तरी त्याजवरून, गहाण सोडवून घेण्याचा त्याचा हक्क नाहींसा झाला आहे.

सन १८७२ चा आक्ट ९ कलम २१ वरून पाहतां, कायद्याच्या चुकीमुळें कोणताही करार निरर्थक होऊं शकत नाहीं. मग, कपट किंवा गैरसमजाविशी किंवा हयगय झालेली नसेल तर जें खरेदीखत आज कित्येक वर्षे चालत आलेलें आहे तें तर इतक्या वर्षांनंतर मुळींच निरर्थक होणार नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ११ पृ. १७४; न्या. पु. २२ मुं. दि. नि. पृ. ६७).

गोष्टीविषयींची करारा-

*२२. करारांतील एका पक्षकाराची गोष्टीविषयीं चूक

* क० २२ उदाहरण—अ जवळ एक हिरा होता. परंतु तो हिरा आहे असें त्यास माहीत नसल्यामुळें तो त्यानें ब यास कमी किंमतीस विकत दिला पुढें तो हिरा होता असें त्यास समजल्यावरून ती विक्री रद्द करण्यास तो इच्छितो तर ती विक्री रद्द होऊं शकणार नाहीं.

च्या एका पक्षकाराची चूक आहे इतक्याच वरून करार निरर्थक करण्याजोगा होत नाहीं.

असल्यामुळें करार झाला इतक्याच कारणानें करार निरर्थक करण्याजोगा होत नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

धी एमप्रेस मील नांवाच्या गिरणींतील ५० शेअरबद्दल दर शेअरास रुपये ३७ प्रमाणें जे प्रतिवादी यास घेण्याचा हक्क होता ते त्याजपासून विकत घेण्याबद्दल वादी यानें प्रतिवादीपाशीं ता. २१ जानेवारी सन १८८३ रोजीं करार केला. दर शेअरावर किती नफा वांटून द्यावयाचा आहे याजबद्दल त्या गिरणीकडून पुढें ठराव व्हावयाचा आहे अशी त्यावेळेस वादीची समज होती. त्या खरेदीच्या पैशाचा भाग ह्मणून वादी यानें प्रतिवादीपाशीं रुपये १०० अनामत ठेविले. पुढें असें कळून आलें कीं, दर शेअरामागें नफ्याबद्दल रुपये २५ प्रमाणें दिले जातील अशाबद्दल त्या गिरणीनें चार दिवसांपूर्वींच ह्मणजे ता. १७ जानेवारी सन १८८३ रोजींच ठराव केला आहे. त्यावरून वादी यानें तो करार रद्द करून घेण्याकरितां आणि प्रतिवादी याजपाशीं ठेविलेली १०० रुपयांची रक्कम व्याजासुद्धां परत घेण्याकरितां दावा केला. हा करार सट्याचा किंवा पैजेचा आहे असा भडोच येथील स्मालकाज कोर्टाच्या जज्जाचा अभिप्राय असल्यावरून त्यांनीं वादीचा दावा नाकबूल केला. तो कनिष्ठ कोर्टाचा फैसला रद्द करण्याकरितां वादी यानें हायकोर्टाच्या असाधारण अधिकारांत अर्ज केला.

**ठरावः—**या फिर्यादअर्जीवरून दाव्याचें कारण दिसून येत नसल्यामुळें पहिल्यानें ही फिर्यादअर्जी दुरुस्त करण्याकरितां परत दिली पाहिजे होती. त्या करारांतील दोघांही पक्षकारांची चूक झालेली आहे किंवा प्रतिवादी यानें कपटानें तो करार करून देण्याविषयीं वादीचें मन वळविलेलें आहे यापैकीं कोणतीही तरी गोष्ट ह्या फिर्यादअर्जींत लिहिली पाहिजे होती. करार करणाऱ्या पक्षकारांपैकीं एका पक्षकारास घडलेल्या गोष्टीची माहिती नव्हती, एवढ्यावरून सन १८७२ चा आक्ट ९ कलम २२ वरून तो करार निरर्थक होणार नाहीं.

आणखी असाही ठराव झाला कीं, तो करार खरोखरच जर सट्याचा असेल तर त्याचें स्वरूप उभय पक्षकारांसही पहिल्यापासून माहीत असलेंच पाहिजे आणि याजकरितां त्याच आक्टाचें कलम ६५ वरून ती अनामत ठेवलेली रक्कम परत मागतां येणार नाहीं. अशा प्रकारें जो करार पोकळ व निरर्थक आहे असें माहीत आहे त्यास कलम ६५ लागू पडत नाहीं. तो करार सट्याचा आहे अशी जर दोघांही पक्षकारांची समज असली तर या दाव्यास सन १८६५ चा मुंबईचा आक्ट ३ कलम १ वरून प्रतिबंध येईल. त्याच आक्टाचें कलम १ हें सन १८७२ चा आक्ट ९ कलम ३० बरोबर वाचलें पाहिजे.

आणखी असाही ठराव झाला कीं, जी गोष्ट घडून आली असतां करार पुरा करावयाचा ती गोष्ट करण्याचें कोणत्याही पक्षकारांच्या हातीं नसून ती अनियमित गोष्ट घडून आली असतां एकमेकांनीं एकमेकांस पैसा द्यावयाचा असतो; व अशा प्रकारचा करार असतो त्यास सट्याचा किंवा पैजेचा करार असें ह्मणतात. परंतु ती गोष्ट घडून आणण्याचें काम जर एकाच पक्षकाराच्या हातीं असलें तर तो सट्याचा किंवा पैजेचा करार होणार नाहीं. दर शेअरामागें रुपये २५ प्रमाणें नफ्याची वांटणी ( डिव्हिडंट ) व्हावयाची आहे असा त्या गिरणीनें केलेला ठराव प्रतिवादी यास माहीत असतां, रुपये ३७ प्रमाणें नफ्याची रक्कम मिळणार आहे असें सांगून प्रतिवादीनें वादीकडून तो करार करून घेतला, असा जर वादी याची तक्रार असेल तर, अशा करारावरून

दिलेली शंभर रुपयाची रकम परंत घेण्याकरितां वादीनें केलेल्या दाव्यास सन १८६५ चा मुंबई आक्ट ३ हा लागू पडणार नाहीं. सव्याचे करार हे बेकायदेशीर करार नाहींत. कायदेशीर व्यवस्था करून ते अमलांत मात्र आणतां येत नाहींत.

याप्रमाणें ठराव करून हायकोर्टानें कनिष्ठ कोर्टाचा फैसला रद्द केला; आणि प्रतिवादीनें कपट केल्यामुळें आपल्यास दावा करण्याचें कारण झालें आहे असें दाखविण्यासाठीं फिर्यादअर्जी दुरुस्त करण्याची वादीस परवानगी दिली. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ९ पृ. ३५८; न्या. पु. २० मुं. दि. नि. पृ. १६५ ).

कोणकोणते मोबदले व विषय कायदेशीर व कोणकोणते गैर कायदेशीर होत.

**२३.** कबुलायतीचा मोबदला किंवा विषय, खालीं लिहिलें आहे तसा नसेल तर तो मोबदला किंवा विषय कायदेशीर होय; म्हणजे—

* ज्याची मनाई कायद्यानें केली आहे तो, किंवा ज्याचें स्वरूप असें आहे कीं, त्याविषयीं मोकळीक ठेविली तर त्यामुळें कोणत्याही एकाद्या कायद्यांतील ठराव व्यर्थ होतील, तो; अथवा ज्यांत कपट आहे तो; अथवा ज्यामुळें किंवा ज्या योगें दुसऱ्या मनुष्याच्या शरीरास किंवा जिंदगीस हानि होणार आहे अथवा होणार असें दिसतें तो; अथवा ज्याला कोर्ट अनीतीचा+किंवा राजनीतीशीं विरुद्ध× असें मानितें.

यांतून कोणताही प्रकार असला तरी कबुलायतीचा मोबदला किंवा विषय गैरकायदेशीर मानला पाहिजे. जिचा विषय अगर मोबदला बेकायदेशीर आहे, ती हर कोणतीही कबुलायत निरर्थक होय.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा आपलें घर १०,००० रुपयांस ब ला विकत देण्याची कबुलायत करितो. तर यांत अनें घर विकण्याविषयीं जें वचन दिलें त्याचा मोबदला बनें १०,००० रुपये देणें कबूल केलें तो होय, आणि बनें १०,००० रुपये देण्याचें वचन दिलें त्याचा मोबदला अनें घर विकण्याचें वचन दिलें हा होय. तर हे मोबदले कायदेशीर होत.

( ब. ) कनें बचे १०,००० रुपये द्यावयाचे आहेत. ते कनें ६ महिन्यांनीं न दिले तर अ हा बला ते रुपये देण्याचें वचन देतो. त्याप्रमाणें ब हा कला

---

* सन १८४३ चा आक्ट ५ ( गुलामांविषयीं ) इं. पि. को. कलमें २९२, २९४ अ, ३७०, ३७१, ३७२, ३७३ व ५०२ आणि अशाच प्रकारचीं दुसरीं कांहीं कलमें.

\+ व्यभिचारिणी स्त्रियांस घर भाड्यानें देण्याचे करार; निंदापत्र छापण्याचे करार; अशास्त्र संग करण्याचे करार; स्त्रियांचीं मनें वाईट कामाकडे लावण्याचे करार; व अशाच प्रकारचे दुसरे कित्येक करार.

× च्यांपटीं व मेहेनतन्याचे करार—न्या. मा. ४ थें. मुं. दि. पृ. १२८ पहा.

मुदत देतो. तर यांत एकानें दिलेलें वचन दुसऱ्यानें दिलेल्या वचनाचा मोबदला होय, आणि ते मोबदले बेकायदेशीर होत.

(क.) बनें अला कांहींएक रकम दिली आहे. त्याबद्दल अ असें वचन देतो कीं, बचें तारूं अमूक एका सफरेवर फुटलें तर त्याची किंमत बला आपण भरून देईन. तर येथें बनें जी रकम दिली तो अच्या वचनाचा मोबदला होय, आणि अनें जें वचन दिलें तो बनें दिलेल्या रकमेचा मोबदला होय, आणि ते मोबदले कायदेशीर होत.

(ड.) अ हा बच्या मुलाचें प्रतिपालन करीन असें वचन देतो. आणि ब हा त्याबद्दल अला दरसाल १००० रुपये देईन असें वचन देतो. तर यांत एका पक्षाचें वचन दुसऱ्या पक्षाच्या वचनाचा मोबदला होय आणि ते मोबदले कायदेशीर होत.

(ई.) अ, ब आणि क हे अशी कबुलायत करितात कीं, आपण कपटानें मिळविलेला किंवा मिळविणार आहों तो माल अपसांत वांटून घेऊं. तर ही कबुलायत निरर्थक होय, कारण कीं, तिचा विषय गैरकायदेशीर आहे.

(फ.) अ असें वचन देतो कीं, आपण बला सरकारांत नोकरी मिळवून देईन, आणि ब हा त्याजबद्दल अला १००० रुपये देण्याचें वचन देतो. तर ही कबुलायत निरर्थक होय, कारण कीं, तिजबद्दलचा मोबदला गैरकायदेशीर आहे.

(ग.) अ हा एका जमीनदाराचा गुमास्ता आहे, आणि धन्यास न कळत धन्याची कांहीं जमीन पैसा घेऊन ब साठीं धान्यानें मिळविण्याचें वचन देतो. तर अ आणि ब यांची कबुलायत निरर्थक होय, कारण कीं, अनें छपावणी करून आपल्या धन्याशीं कपट केलें असें तिजवरून होतें.

(ह.) अ हा बला असें वचन देतो कीं, जबरी चोरीची फिर्याद तुझ्यावर मी चालविली आहे ती काढून घेतो आणि ब हा चोरलेल्या मालाची किंमत भरून देतो असें वचन देतो. तर ही कबुलायत निरर्थक होय, कारण कीं, तिचा विषय गैरकायदेशीर आहे.

(ऐ.) अची इस्टेट, कायदे करणाऱ्या मंडळीनें केलेल्या एका आक्टांतील ठरावाअन्वयें साऱ्याच्या बाकीसाठीं विकली जात आहे. ज्याकडेस बाकी राहिली असेल त्यानें ती इस्टेट घ्यावयाची नाहीं अशी त्या आक्टात मनाई आहे. ब हा अनें त्याच्याशीं मसलत केल्यावरून, ती विकत घेतो, आणि त्यानें (बनें) जी किंमत दिली आहे ती अ कडून आपणास मिळाल्यावर ती इस्टेट अला विकान असें ब कबूल करितो. तर ही कबुलायत निरर्थक होय, कारण कीं, तिच्या

योगानें त्याजवळ बाकी राहिली त्यानेंच ती इस्टेट लिलावांत घेतली असा फलितार्थ झाला, आणि तसें झाल्यानें त्या आक्टांतील ठराव व्यर्थ होतील.

(ज.) अ हा बचा मुखत्यार आहे, आणि अ असें वचन देतो कीं, मुखत्यारकीच्या नात्यानें जें आपलें बशीं वचन आहे तें कसाठीं आपण खर्च करीन; आणि क हा अला १००० रुपये देईन असें वचन देतो. तर ही कबुलायत निरर्थक होय, कारण कीं, ती अनीतीची आहे.

(के.) अ ही आपली मुलगी राख ठेवण्याकरतां बला भाड्यानें देण्याचें कबूल करिते. ही कबुलायत निरर्थक होय, कारण कीं, तशा प्रकारें भाड्यानें देणें हें जरी इंडियन पिनल कोडावरून शिक्षेस पात्र नसल, तरी ती अनीतीची आहे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. एका जिल्ह्यांपैकीं कांहीं दुकानांत फुटकळ अफू विकण्याचा मक्ता वादीनें घेतला. कलेक्टरच्या परवानगीवांचून त्यानें कोणास पोटमक्ता देऊं नये असा वादीचे परवान्यांत ठराव असतां, कलेक्टरच्या परवानगीवांचून त्याच जिल्ह्यांतील कांहीं दुकानांची वहिवाट कांहीं नियमीत शर्तींनीं प्रतिवादीस पोट मक्त्यानें देण्याबद्दल वादीनें प्रतिवादी बरोबर एक करारनामा केला. तें साल संपल्यानंतर प्रतिवादीकडे जी रक्कम येणें राहिली होती ती त्याजपासून वसूल करण्यासाठीं वादीनें त्या करारनाम्यावरून प्रतिवादीवर दावा केला आणि एक हुकुमनामा मिळविला.

तो हुकुमनामा रद्द करून ठराव करण्यांत आला तोः—सन १८७८ चा (अफूबाबदचा) आक्ट १ अन्वयें सरकारनें केलेल्या कानूवरून तसा करारनामा करण्याची परवानगी नसतां तो केला असल्यामुळें त्याच आक्टाचें कलम ४ वरून तसा करारनामा करण्याची मनाई होती व कायद्यानें मनाई केलेल्या गोष्टीबद्दलचा तो करारनामा असल्यामुळें तो निरर्थक होता.

आणखी असाही ठराव झाला कीं, वादी यानें प्रतिवादी यास जी अफू पुरविली होती त्या अफूची किंमत प्रतिवादीपासून परत मागण्याचा वादीस हक्क नाहीं, कारण नंतर अमलांत आणलेल्या बेकायदेशीर कामाकरितां पूर्वी दिलेला माल किंवा पैका परत मागण्याचा कोणासही हक्क पोंचत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १९ पृ. ६२६; न्या. पु. ३० मुं. दि. नि. पृ. २७७).

२. मुलगा किंवा मुलगी लग्नास देण्याबद्दल त्याच्या किंवा तिच्या बापास पैसे देण्याबद्दलचा करार हा राजनीतीविरुद्ध असल्यामुळें कायद्याचे कोर्टास तो अमलांत आणतां येत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २२ पृ. ६५८; न्या. पु. ३३ मुं. दि. नि. पृ. २२५).

३. सन १८७५ चा मुंबई आक्ट ३, टोलाबाबद कलम १० अन्वयें सरकारनें वादीस कांहीं शर्तीवर टोलाची वहिवाट व वसूल करण्याचें काम पट्यानें दिलें. कलेक्टराची मंजुरी पूर्वी मिळविल्यावांचून सदर टोलाच्या वहिवाटीचें व वसुलाचें काम वादीनें पोटपट्यानें दुसऱ्यास देऊं नये अशी त्या पट्यांत एक शर्त होती. सदर पट्यांतील शर्ती पैकीं एकादी शर्त मोडल्यास त्याबद्दल २०० रुपयेपर्यंत दंड करण्याचा कलेक्टरास अधिकार आहे अशीही त्या पट्यांत एक शर्त होती. कलेक्टरची मंजुरी घेतल्यावांचून वादीनें टोलाचें काम प्रतिवादीस पोटकरारानें दिलें आणि त्या कराराअन्वयें प्रतिवादीनीं जी रक्कम देण्याचें कबूल केलें होतें ती वसूल करण्यासाठीं वादीनें दावा केला. सरकारास करून दिलेल्या पट्यांतील शर्त मोडणें हें कृत्य बेकायदेशीर व राजनीतीशीं वि-

रुद्ध होतें; आणि ह्मणून कराराच्या आक्टाचें कलम २३ अन्वयें वादीचे व आमचे दरम्यान झालेला करार निरर्थक आहे आणि त्या अन्वयें वादीस रक्कम मिळण्याचा हक्क पोंचत नाहीं.

**ठरावः**—वादीस दावा मिळण्याचा हक्क पोंचतो. पटयांतील शर्ती अन्वयें टोलाचें काम दुसऱ्यास देणें जरी दंडाची रक्कम ठरवून मना करण्यांत आलें आहे तरी तें कृत्य बेकायदेशीर किंवा राजनीतीशीं विरुद्ध होत नाहीं. शर्त मोडली असतां त्याबद्दल शिक्षा ह्मणून दंडाची विवक्षित रक्कम ठरविण्यांत आली होती आणि त्यामुळें वादीनें मागाहून केलेला करार निरर्थक होत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २४ पृ. ६२२; न्या. पु. ३५ मुं. दि. नि. पृ. ३७७ व ३७८).

४. अन्यायानें पकडून कैदेंत ठेविल्यामुळें झालेली नुकसानी घेण्यासाठीं वादीनें प्रतिवादीवर दावा केला. कांहीं फौजदारी आरोप मांडून वाळावे आणि आपल्या दरम्यानचे तंटे मिटवावे ह्मणून झालेला करारनामा प्रतिवादीनें हजर केला. जे आरोप एका फौजदारी कोर्टांत पक्षकारांचे दरम्यान चालू होते त्यां पैकीं एक आरोप कायद्यावरून मांडून वाळण्याजोगा नव्हता. तसा करार झाला असल्यामुळें तो दावा करण्यास वादीस प्रतिबंध आला आहे, असें कनिष्ठ अपील कोर्टानें ठरविलें. त्याजवरें अपील झालें.

**ठरावः**—फौजदारींत चाललेलें काम व्यर्थ चालविण्याचे उद्देशानें तो करारनामा झाला असल्यामुळें, कायद्याच्या दृष्टीनें तो करार अयोग्य आहे आणि याजकरितां कायद्याच्या कोर्टांत एखाद्या दाव्याचा जवाब म्हणून तो करारनामा हजर करितां येत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २८ पृ. ३२६; न्या. पु. ३९ मुं. दि. नि. पृ. २१६).

५. एखाद्या अनीतीच्या व्यवहारांत वादीचें अंग असेल आणि त्याचे मदतीवांचून वादीला आपला दावा शाबीत करतां येत नसेल तर वादी हरला पाहिजे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३२ पृ. ५८१; न्या. पु. ४३ मुं. दि. नि. पृ. २५५).

६. नवरा अगर बायकोपैकीं कोणीही ज्ञाती ठरवील ती रक्कम दुसऱ्यास दिल्यास त्यास दुसऱ्याची ह्मणजे नवऱ्याची अगर बायकोची इच्छा नसतांना लग्न मोडतां येते अशी वहिवाट हिंदुमधील पखाली जातींत आहे असें सांगण्यांत आलें आहे. सदर रुढी कोर्टास मान्य करितां येणार नाहीं. कराराच्या आक्टाचें (सन १८७२ चा आक्ट ९) कलम २३ मधील अर्थाप्रमाणें अशी रुढी ही अनीतीची अगर सार्वजनिक नीतीविरुद्ध आहे असें मानलें पाहिजे. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें उत्तम कारणांवरून सुद्धां काडी मोडण्याची परवानगी मोठया नाखुषीनें देण्यांत येते ही गोष्ट लक्षांत घेतां सदर रुढी ही हिंदुधर्मशास्त्राच्याही तितकीच विरुद्ध आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३३ पृ. ५३८; न्या. पु. ५० मुं. दि. नि. पृ. २२७).

७. जंगलावरचा अधिकारी व परवानगी दिलेला इसम यांचे दरम्यान झालेल्या करारांतील शर्तीच्या विरुद्ध नफा वांटून घेण्याकरितां केलेला करार कायद्याच्या विरुद्ध नाहीं व त्यामुळें कायद्यांतील कोणताही ठराव मोडल्याप्रमाणें होत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. ६४; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. १७).

८. **सावहरिन्स खरेदी घेण्याचा करार.**—वादी हे कमिशन एजंट असून प्रतिवादी हे त्यांचे उत्तर हिंदुस्थानांतील एक कूळ होतें. प्रतिवादीकरितां संवत १९७४ च्या वैशाख व ज्येष्ठ वायद्याचं (मे व जून सन १९१८) सॉव्हरिन्स खरेदी घेण्याचा करार वादीनें केला. प्रतिवादीनें वायद्याचे दिवशीं रक्कम न दिल्यामुळें करार मोडल्यामुळें झालेलें नुकसान भरून मिळण्याकरितां वादीनें दावा लावला. प्रतिवादीनें हिंदुस्थानचा कराराचा आक्ट कलम २३ मधील अर्थाप्रमाणें वादीप्रतिवादींच्या दरम्यान झालेला करार सार्वजनिक नीतीविरुद्ध आहे अशी एक

स्वीकार केला व आपल्या सरकारच्या समर्थनार्थ डिफेन्स ऑफ इंडिया आक्टाअन्वयें (सन १९१५ चा आक्ट ४) काढलेल्या दोन जाहिरनाम्यांचा आधार दिला. पहिला जाहिरनामा ता. २९ जून सन १९१७ चा असून तो ता. ९ जुलै सन १९१७ रोजीं प्रसिद्ध करण्यांत आलेला होता. सदरहू जाहिरनाम्यांत पुढें दिल्याप्रमाणें हुकूम करण्यांत आलेला होता. "चालूं असलेलें कोणतेंही सोन्याचें अगर चांदीचें नाणें कोणत्याही इसमानें वितळवूं नये, तोडूं नये अगर त्याचा नाण्याव्यतिरिक्त अन्य मार्गानें उपयोग करूं नये" दुसरा जाहिरनामा करार मोडल्यानंतर ता. २३ आगष्ट सन १९१८ रोजीं प्रसिद्ध झालेला होता. या जाहिरनाम्यांत कोणत्याही नाण्यावर दर्शनीं जी किंमत लिहिली असेल त्या किंमतीपेक्षां जास्त किंमतीस कोणतेंही नाणें कोणीही खरेदी करूं नये, अगर विकूं नये अथवा जास्त किंमतीस खरेदी देण्यास अगर घेण्यास तयार होऊं नये अथवा कर्जाच्या फेडीकरितां अथवा अन्य कारणाकरितां नाण्याच्या दर्शनीं किंमतीपेक्षां जास्त किंमतीस कोणीही इसमानें कोणतेंही नाणें घेऊं नये अगर घेण्यास तयार होऊं नये" असा हुकूम करण्यांत आला होता. मोठें युद्ध चालूं असतां देशांतील सोन्याच्या नाण्यांचा व्यापार करण्यामुळें सरकारचें सरकारी तिजोरीसंबंधाचें जें धोरण होतें त्यांत घोटाळा उत्पन्न होण्याचा संभव असून तें धोरण निष्फळ होण्याचाही संभव होता. हिंदुस्थानांतील सार्वजनिक नीतीची व्याख्या त्यावेळीं सरकारी हुकुमावरून झालेली असून त्या वेळीं सार्वजनिक नीती व सरकारी हुकूम यांस विरोध नव्हता. सोन्याच्या नाण्यांचा व्यापार करणें ही गोष्ट सार्वजनिक नीतीविरुद्ध होती व जुलै सन १९१७ चा व त्यानंतरचा आगष्ट सन १९१८ चा जाहिरनामा पाहिला असतां अशा नाण्यांचा व्यापार करणें हें त्या मुनारास सार्वजनिक नीतीच्या विरुद्ध होतें असें दिसून येत आहे असें ठरवून अव्वल जज्जानें वादीचा दावा रद्द केला.

वादीनें यावर केलेल्या अपिलांत अव्वल कोर्टाचा हुकुमनामा रद्द करून वादीचा दावा देवविण्यांत आला व पुढील ठराव करण्यांत आलाः

ठरावः—(१) ज्या कारणामुळें दाव्यांतील करार बेकायदेशीर आहेत असें कोर्टास ठरवितां येईल असें सार्वजनिक नीतीचें एखादें स्पष्ट व सर्वसाधारण कलम निष्पन्न होत नसल्यामुळें कराराच्या आक्टाचें कलम २३ मधील अर्थाप्रमाणें दाव्यांतील करार सार्वजनिक नीतीच्या विरुद्ध असल्यामुळें निरर्थक आहेत असें ठरवितां येत नाहीं.

(२) जाहिरनाम्यांद्वारा आधारें दाव्याचा निर्णय करावयाचा असेल तर अशा करारास कायद्यानें मनाई करण्यांत आली होती असें शाबीत केलें पाहिजे व ही गोष्ट शाबीत झाल्यावर प्रस्तुतच्या दाव्यास कराराच्या आक्टाचें कलम २३ चा पहिला भाग लागू करतां येईल व मग सार्वजनिक नीतीसंबंधाचा मुद्दा गैरलागू होईल. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४४ पृ. ६; न्या. पु. ५५ मुं. दि. नि. पृ. १ व २).

९. कापीराइट मिळविलेल्या चित्राच्या प्रती छापून देण्याचा करार.—ता. १९ फेब्रुवारी सन १९१२ रोजीं प्रतिवादीनें वादीबरोबर कराराच्या तारखेपासून तीन महिन्यांत बादशहा व महाराणी यांच्या इंग्लंडांतील राज्याभिषेकाच्या एका चित्राच्या दहा हजार प्रती छापून देण्याचा करार केला. नमुन्याचें चित्र मूळ इंग्लंडमध्यें ए. व्हिवियन मॅनसेल ॲण्ड को या कंपनीनें छापून प्रसिद्ध केलें असून त्या चित्रासंबंधानें सदरहू कंपनीनें कापीराइट मिळविला होता. प्रतिवादीनें करार मोडल्यामुळें वादीनें नुकसानीचा दावा लावला. चित्रासंबंधानें ज्या इंग्लंडांतील कंपनीनें कापीराइट मिळविलेला होता त्या कंपनीचें नुकसान करणें हा वादीप्रतिवादींच्या दरम्यान झालेल्या कराराचा हेतु असल्यामुळें कराराच्या आक्टाचें (सन १८७२) कलम २३

प्रमाणें सदहू करार निरर्थक आहे अशी तक्रार प्रतिवादीनें केली. प्रतिवादीची ही तक्रार अमान्य करून पुढील ठराव करण्यांत आलाः

ठरावः—कराराच्या आक्टाचें (सन १८७२) कलम २३ मध्यें सदहू कराराचा अंतर्भाव होत नाहीं; व वादीस करार मोडल्यामुळें झालेली नुकसानी भरून मिळण्याकरितां दावा लावण्याचा हक्क आहे. (इं. ला. रि. मुं. सी. व्हा. ४४ पृ. ७२०; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. ५७).

१०. ज्या फौजदारी अपराधाबद्दल कायद्याप्रमाणें आपसांत तडजोड करितां येत नाहीं अशा अपराधाबद्दल तडजोड करणें ही गोष्ट सार्वजनिक नीतीविरुद्ध आहे.

ठरावः—विश्वासघाताबद्दल (क्रि. प्रो. कोडप्रमाणें विश्वासघाताबद्दल केलेल्या खटल्याची आपसांत तडजोड करितां येत नाहीं) गुमास्त्यावर केलेला खटला काढून घेण्याबद्दल गुमास्त्यानें करून दिलेलें गहाणखत (खटल्याची आपसांत कोर्टाबाहेर समजून व्हावी असें माजिस्ट्रेटानें सुचविलें असलें तरी) निरर्थक आहे; व अशा गहाण खताची अम्मलबजावणी करण्याकरितां आणलेला दावा चालणार नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४० पृ. ११३; न्या. पु. ४८ क. दि. नि. पृ. ८).

११. वादीच्या मुलास डिस्ट्रिक्ट कोर्टांतील पट्टेवाल्याची जागा देण्याबद्दल नाझरास दिलेली रक्कम परत मिळण्याकरितां दावा लावतां येत नाहीं.

कराराच्या आक्टाचें कलम २३ मधील अर्थाप्रमाणें या कराराचा हेतु सार्वजनिक नीतीच्या विरुद्ध असल्यामुळें असले करार मूळपासूनच निरर्थक असतात. जे करार निरर्थक आहेत असें नंतर आढळून आलें असेल अथवा नंतर घडलेल्या परिस्थितीमुळें जे करार निरर्थक झाले असतील अशा करारांस कराराच्या आक्टाचें कलम ६५ लागू पडतें. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४३ पृ. ११५; न्या. पु. ५१ क. दि. नि. पृ. ६).

१२ बीच्या मुलीचें लग्न पच्या मुलाबरोबर करावें व बीनें असें न केल्यास बीनें पला रक्कम द्यावी असा करार प व बीमध्यें झाला होता. सदर करार सार्वजनिक नीतीविरुद्ध असल्यामुळें कराराचा आक्ट (सन १८७२ चा आक्ट ९) कलम २३ अन्वयें निरर्थक आहे. (इं. ला. री. म. सी. व्हा. ३७ पृ. ३९३; न्या. पु. ४९ म. दि. नि. पृ. २१).

१३. ट्रान्सफर आफ प्राप्र्टी आक्टानें कलम २३ प्रमाणें भविष्यकाळीं प्राप्त होणारे हक्कसंबंध खरेदी देण्याचे करार हिंदुस्थानांत निरर्थक आहेत; व हे हक्कसंबध प्राप्त झाल्यानंतर असला करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्याकरतां आणलेला दावा चालत नाहीं. (इं. ला. री. म. सी. व्हा. ३९ पृ. ५५४; न्या. पु. ५१ म. दि. नि. पृ. ३०).

१४. **वकिलाच्या कारकुनास रक्कम देण्याचा करार.**—एखाद्या पक्षकारानें त्याचे कोर्टांतील कामाकडे त्याच्या वकिलाच्या कारकुनानें विशेष लक्ष देण्याकरितां रक्कम देण्याचा करार केला असेल व ज्या कामाकडे विशेष लक्ष द्यावयाचें तें काम फीचा मोबदला म्हणून करणें हें वकिलाचें कर्तव्य असेल तर पक्षकारानें केलेला सदर करार सार्वजनिक नीतीरुद्ध होईल व तो निरर्थक असून अमलांत आणतां येणार नाहीं. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४१ पृ. ४७१; न्या. पु. ५३ म. दि. नि. पृ. २९ व ३०).

१५. **बेकायदेशीर कराराअन्वयें गुमास्त्यानें वसूल केलेली रक्कम.**—मुख्यानें एका त्रयस्थ इसमाबरोबर केलेल्या कराराअन्वयें सदहू त्रयस्थ इसमापासून गुमास्त्यानें रक्कम वसूल केली असल्यास सदहू मुख्य व त्रयस्थ इसम यांचे दरम्यान झालेला करार बेकायदेशीर होता येवढ्या-

मुळें गुमास्त्यानें वसूल केलेली रक्कम त्याचेकडून मिळण्यास मुख्यास प्रतिबंध होत नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४४ पृ. ३३४; न्या. पु. ५६ म. दि. नि. पृ. १५ ).

१६. ठरावः—कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ ) कलम २३ मधील अर्थाप्रमाणें पटवारीनें गहाण वेचन घेणें हा व्यवहार सार्वजनिक नीतीविरुद्ध होत नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३९ पृ. ५१; न्या. पु. ५२ अ. दि. नि. पृ. ४ ).

१७. लग्नापूर्वी झालेला करार.—ठरावः—एका पक्षास भविष्यकाळीं होणारी बायको व एका पक्षास भविष्यकाळीं होणारा नवरा व त्याचा बाप ( हे इसम मुसलमान होते ) यांच दरम्यान नवऱ्यानें बायकोस वाईट रीतीनें वागवूं नये या हेतूनें बायकोस नवऱ्यानें वाईट रीतीनें वागविल्यास तिजला पोटगीदाखल योग्य रक्कम देण्याबद्दल लग्नापूर्वी झालेला करार हा सार्वजनिक नीतीच्या विरुद्ध आहे या कारणामुळें बेकायदेशीर होत नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४३ पृ. ६५०; न्या. पु. ५६ अ. दि. नि. पृ. ४८ ).

## निरर्थक कबुलायत.

*मोबदले आणि विषय हे अंशतः गैरकायदेशीर असल्यास कबुलायती निरर्थक.*

२४. एक किंवा अधिक विषयांबद्दल एकच मोबदला आहे आणि त्या मोबदल्याचा कांहीं भाग, अथवा, एकच विषय असून त्याबद्दल मोबदले अनेक आहेत आणि त्या मोबदल्यांतून कोणताही एक किंवा कोणत्याही एकाचा कांहीं भाग, गैरकायदेशीर असेल, तर ती कबुलायत निरर्थक होय.

### उदाहरण.

अ हा निळेच्या कायदेशीर कारखान्यावर आणि दुसऱ्या कांहीं गैरकायदेशीर पदार्थांच्या व्यापारावर बच्या तर्फे देखरेख पहाण्याचें वचन देतो. ब हा अला दरसाल १०,००० रुपये वेतन देईन असें वचन देतो. तर ही कबुलायत निरर्थक होय, कारण कीं, अनें दिलेल्या वचनाचा विषय आणि बनें दिलेल्या वचनाचा मोबदला हीं अंशतः गैरकायदेशीर आहेत.

### विशेष समजुतीच्या टिपा.

१. प्रतिवादीवर एका फौजदारी खटल्याचें काम चालू असतांना त्याचे वकिलानें तो ( प्रतिवादी ) हजर राहण्याबद्दल एक जामीनरोखा लिहून दिला. त्या रोख्यामुळें त्या वकिलास जें नुकसान सोसण्याचा प्रसंग येईल तें नुकसान भरून देण्यासाठीं प्रतिवादीनें वादीला एक बरकांती खरेदीखत व भाडेपट्टा करून दिला.

त्यानंतर, त्या भाडेपट्याचे आधारानें व्याजासुद्धां दोन वर्षांचें भाडें घेण्यासाठीं वादीनें एक दावा केला व सदर मिळकत वादीची नाहीं असा प्रतिवादीनें जाब दिला.

ठरावः—कराराच्या आक्टाचें कलम २४ अन्वयें वादांतील खरेदीखत निरर्थक झालें आहे. सदर खरेदीखत राजनीतिविरुद्ध असल्यामुळें हा दावा रद्द केला पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३२ पृ. ४४९; न्या. पु. ४२ मुं. दि. नि. पृ. १९३ ).

२. केनें सरकारी कायद्यांप्रमाणें मान्य न झालेला असा हिस्सा ता. १९ मे सन १८९६

रोजीं आरकडे कबजेगहाण टाकला. सदर हिस्सा गहाण टाकणें ही गोष्ट सन १८८२च्या भागें दारी आक्टांतील ठरावाविरुद्ध होती. गहाण घेणारानें अकरा वर्षेपर्यंत गहाण मिळकत आपल्या ताब्यांत ठेवल्यानंतर गहाण घेणारा हा गहाणावरील रकम जेव्हां मागेल तेव्हां सदर रकम त्यास गहाण मिळकतीमधून देण्यांत यावी अगर गहाण देणारा अगर त्याचे वारस यांनीं जातीनें द्यावी अशी शर्त गहाणखतांत होती. सन १९०८ सालीं बीनें आरच्या मिळकतीवर एक पैक्याचा हुकुमनामा मिळविला. या हुकुमनाम्याच्या बजावणींत गहाण घेणारा या नात्यानें आरला असलेल्या हक्काची कोर्टामार्फत विक्री झाली व सदर हक्क रुपये ५७७ ला वादीनें विकत घेतला. सन १९१० सालीं वादीनें आर व के यांच्या वारच्या असामींवर कबजा मिळण्याकरितां दावा (मु. नं. १७६ सन १९१०) लावला. गहाणावरून येणें असलेल्या रकमेबद्दल या दाव्यांत मागणें केलें नव्हतें. गहाण बेकायदेशीर असल्यामुळें तें अमलांत आणतां येण्यासारखें नाहीं या मुद्यावर या दाव्याचा निकाल वादीविरुद्ध झाला. सन १८११ सालीं वादीनें त्याच पक्षकाराविरुद्ध केच्या मिळकतीमधून ७८८ रुपये मिळण्याकरितां अगर बीच्या मिळकतीमधून रुपये ५७७ मिळण्याकरितां दावा लावला. वादीच्या दाव्यास निर्णीत गोष्टीच्या कारणावरून हरकत आलेली आहे व मुदतीची हरकत आलेली आहे अशी तक्रार प्रतिवादी नं. १ ते ३ यांनीं केली. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. ६१४; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. २८६ व २८७).

३. **खरेदीच्या करारांतील शर्त.**—प्रतिवादीच्या नवऱ्यानें कांहीं जमीन वादीस रु. १५० ला खरेदी देण्याचा करार केला होता. वादीनें जमीन खरेदी देणाराविरुद्ध विश्वासघाताची फौजदारी फिर्याद केली होती ती फिर्याद काढून न घेतल्यास सदरहू करार अमलांत आणावयाचा नाहीं अशी खरेदीच्या करारांत एक शर्त होती. हा करार विशेष रीतीनें पूर्ण करून घेण्याकरितां वादीनें दावा लावला.

सदरहू करार सार्वजनिक नीतीविरुद्ध असल्यामुळें निरर्थक आहे अशी प्रतिवादीनें तक्रार केली. वादीचा दावा रद्द करून पुढील ठराव करण्यांत आला:—

**ठरावः**—कराराच्या मोबदल्यापैकीं कांहीं भाग सार्वजनिक नीतीविरुद्ध असल्यामुळें सदरहू करार अमलांत आणतां येत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४२ पृ. ३३९; न्या. पु. ५३ मुं. दि. नि. पृ. २६).

४. **रकम न दिल्यास कबजा घेण्याची शर्त.**—प्रतिवादीनें वादीच्या बापाकडून रकम कर्जाऊ घेऊन कर्जरोखा लिहून दिला. सदरहू कर्जरोख्यांत ही रकम एका विशिष्ट तारखेस परत देण्याचा करार होता व शिवाय ही रकम या तारखेस परत न दिल्यास प्रतिवादीच्या शेती जमिनीचा कबजा भोगवटयाचें गहाण घेणारा या नात्यानें सावकारानें घ्यावा अशी आणखी शर्त सदर कर्जरोख्यांत होती.

**ठरावः**—सर्व करार बेकायदेशीर होत नाहीं ही शर्त बेकायदेशीर असली तरी वादीस फक्त पैक्याचा हुकुमनामा मिळण्याचा हक्क आहे. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४५ पृ. ६२१; न्या. पु. ५८ अ. दि. नि. पृ. ६०).

मोबदल्या शिवाय कबुलायत निरर्थक.

२५. मोबदल्या शिवाय केलेली कबुलायत निरर्थक होय; मात्र

(१) ती लेखी आहे, व विवक्षित कालीं चालू असलेल्या दस्तऐवज नोंद-

ती लेखी असून नोंद- ण्याविषयींच्या कायद्याप्रमाणें* नोंदली आहे, आणि एकमे-
ली असेल, तर मात्र नाहीं. कांचे जवळचे नातलग आहेत अशा मनुष्यांनी जी पर-
स्पर स्वाभाविक प्रीति व माया तिजमुळें केली आहे; अथवा (ही रकम सन १८९१
चा आक्ट १२ परिशिष्ट २ वरून दुरुस्त केली आहे).

(२) ती कबुलायत म्हणजे एक वचन असेल कीं जेणेंकरून, वचन देणा-
रासाठीं कोणीएकानें कांहीं तरी आपण होऊन केलें असेल
अथवा कांहीं केलें अ- त्याबद्दल, किंवा जें कांहीं तरी करणें हें त्या वचन देणा-
सल्यास त्याबद्दल उतराई रास कायद्या अन्वयें भाग पाडता आलें असतें असें कांहीं
होण्याचें वचन असेल, तर तरी त्या मनुष्यानें आपण होऊन केलें असेल त्याबद्दल त्याचा
नाहीं.
एकंदर किंवा अंशतः उतराई व्हावें असें असेल; अथवा

(३) कायद्यानें मुदतीबाहेर गेलें नसतें तर ज्याचा वसूल धनकोस
अथवा मुदतीबाहेर गे- ल्यानें करवितां आला असतां असें कर्ज एकंदर
लेलें कर्ज देण्याचें वचन किंवा अंशतः देण्याविषयीं वचन त्या कबुलायतींत अ-
असेल, तर नाहीं. सेल, व ती कबुलायत लेखी असून, त्या वचनाची
जबाबदारी ज्यावर रहावयाची त्याची किंवा त्याच्या कुलमुखत्याराची किंवा ति-
तक्याकामासाठीं ज्याला अधिकार दिला असेल अशा मुखत्याराची सही ति-
जवर असेल;

तर या कोणत्याही प्रसंगीं कबुलायतीस करारांचें स्वरूप येईल.

खुलासा १.—एकादी देणगी वस्तुतः दिली असल्यास तिच्या देणाऱ्या व घेणाऱ्यांमध्यें तिच्या कायदेशीरपणास या कलमांतील कोणत्याच मजकुरानें व्यत्यय येणार नाहीं.

खुलासा २.—वचन देणारानें ज्या एखाद्या कबुलायतीस आपल्या खुषीनें राजी दिली ती कबुलायत केवळ तिचा मोबदला अपुरता आहे इतक्याच कारणानें निरर्थक होत नाहीं; परंतु वचन देणारानें आपली राजी खुषीनें दिली कीं कसें, ह्या प्रश्नाचा निर्णय करितांना कोर्टानें मोबदला अपुरता आहे या गोष्टीचा विचार केल्यास चालेल.

## उदाहरणें.

(अ.) अ हा कांहींच मोबदल्याशिवाय बला १००० रुपये देईन असें वचन देतो. तर ही कबुलायत निरर्थक होय.

(ब.) अ हा स्वाभाविक प्रीतीनें आणि मायेनें त्याचा मुलगा जो ब

* हल्लीं चालू असलेला नोंदणीचा कायदा सन १९०८ चा आक्ट १६ हा आहे. सबब त्या आक्टाचीं कलमें १७ व १८हीं पहा.

त्याला १००० रुपये देईन असें वचन देतो. अ हा तें वचन लेखी करून नोंदवितो. तर हा एक करार होय.

(क.) अला वची पैशाची पिशवी सांपडली आणि ती त्यानें व जवळ नेऊन दिली. व अला ५० रुपये देण्याविषयीं वचन देतो. तर हा करार होय.

(ड.) वच्या लहान मुलाचा अ प्रतिपाळ करितो. त्यामुळें अला आलेला खर्च आपण देईन असें ब वचन देतो. तर तो करार होय.

(ई.) अनें बचे १००० रुपये कर्ज द्यावयाचे आहेत, परंतु तें कर्ज मुदत गेल्यामुळें रद्द झालें आहे. त्या कर्जाबद्दल ५०० रुपये बला देईन अशा वचनाच्या लेखावर अ सही करितो. तर तो करार होय.

(फ.) अ हा १००० रुपये किंमतीचा घोडा १० रुपयांस विकत देण्याचें कबूल करतो. कबुलायतीस अची राजी आत्मखुषीनें झाली आहे. तर मोबदला अपुरता असला तरी त्या कबुलायतीस करार असें समजलें पाहिजे.

(ग.) अ हा १००० रुपये किंमतीचा घोडा १० रुपयांस विकण्यास कबूल करितो. अ आपण कबुलायतीस आत्मखुषीनें राजी दिली नाहीं असें म्हणतो. तर तो मोबदला अपुरता आहे. ही गोष्ट अशा प्रकारची आहे कीं, अची राजी आत्मखुषीनें झाली होती कीं नाहीं याचा निर्णय करतांना कोर्टानें तिचा विचार करावा.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. सन १८७२ च्या हिंदुस्थानच्या करारांविषयीं आक्टाच्या २५ व्या कलमास बाध येतो असें समजूं नये. (सन १९०८ चा आक्ट ९ कलम २९ रकम अ).

२. अ यानें ता. १८ नोवेंबर सन १८९२ रोजीं ब यास एका जमिनीचें खरेदीखत लिहून दिलें. तें खरेदीखत योग्य रीतीनें नोंदलेलें होतें व मोबदल्याची रक्कम रुपये ९० दिल्याबद्दल त्यांत लिहिलें होतें. बनें त्या जमिनीचा कबजा घेतला. मी आजारी असल्यामुळें तें खरेदीखत लिहून देण्यास नालायक असतां तें लिहून देण्याबद्दल बनें माझें मन वळविलें व त्या खरेदीखतांतील मोबदल्याची रक्कम आपल्यास मिळाली नाहीं असें सांगून अनें तें खरेदीखत रद्द करण्यासाठीं व जमिनीचा कबजा घेण्यासाठीं दावा केला. मोबदल्याची रक्कम देण्यांत आली नव्हती असें दोन्हीं कोर्टांनीं ठरविलें. ती मोबदल्याची रक्कम बनें दिली नसल्यास ती रक्कम घेण्यासाठीं बवर दावा करण्याचा अस मार्ग आहे आणि त्या रकमेपुरता त्या जमिनीवर अचा हक्क आहे, परंतु तें खरेदीखत अस रद्द करतां येत नाहीं असें ठरवून कनिष्ठ अपील कोर्टानें अचा तो दावा रद्द केला.

ज. फुलटनः—मोबदला नसल्यामुळें तें खरेदीखत निरर्थक आहे. सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम २५ हें त्या व्यवहारास लागू आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २२ पृ. १७६; न्या. पु. ९२० मुं. हि. नि. पृ. ७२).

३. पुढें निराळे राहण्याबद्दल मुसलमान नवरा व बायको यांजमध्यें झालेला करार कराराचा आक्ट (सन १८७२ चा आक्ट ९) कलम २५ प्रमाणें सार्वजनिक राजनीतीविरुद्ध असलेमुळें निरर्थक असतो. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३७ पृ. २८०; न्या. पु. ४८ मुं. दि. नि. पृ. १७०).

४. **तोंडी करारावरून दावा.**—ता. २८ फेब्रुवारी सन १९१८ रोजीं वादीनें प्रतिवादीवर भाड्याचा हुकुमनामा मिळविला. ता. ११ फेब्रुवारी सन १९२० रोजीं वादीनें हुकुमनाम्याची बजावणी करणार नाहीं असें केल्यामुळें त्याचा मोबदला म्हणून प्रतिवादीनें हुकुमनाम्याची रक्कम सव्याज सन १९२१ एप्रिलमध्यें परत देण्याचा तोंडी करार केला. सन १९२१ एप्रिलमध्यें रक्कम देण्यांत आलेली नाहीं. हुकुमनामा मुदतीबाहेर गेला होता व त्याची बजावणी करतां येत नव्हती. ता. ३१ मार्च सन १९२२ रोजीं वादीनें नवीन तोंडी करारावरून प्रतिवादीवर दावा लावला.

**ठराव:**—सदर करार कायदेशीर असून त्याची कायद्याप्रमाणें अम्मलबजावणी करतां येईल. (इं. ला. री. क. सी. व्हा. ५० पृ. ९७४; न्या. पु. ५८ क. दि. नि. पृ. २२).

५. लवादानें पक्षकारांच्या दरम्यानचे हिशोब करून जी बाकी निघेल ती बाकी देण्याबद्दलचें वचन हें कराराच्या आक्टाचें कलम २५ प्रमाणें (सन १८७२ चा आक्ट ९) कर्ज देण्यासंबंधाचें होत नाहीं; कारण या स्थलीं निश्चित झालेली नसते. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४० पृ. ३१; न्या. पु. ६२ म. दि. नि. पृ. २).

६. **हिंदू बापाचें कर्ज देण्याची मुलाची पात्रता.**—हिंदू बापानें एकत्र कुटुंबाच्या फायद्याकरितां कर्ज काढलें असेल तर तें कराराच्या आक्टाचें कलम २५ (३) प्रमाणें मुलांवर बंधनकारक असलेलेंच कर्ज होतें आहे तरी, बापाचें कर्ज फेडण्याची जबाबदारी मुलावर जातीनें नसून ती कुटुंबाच्या जिनगीपुरतीच मर्यादित अशी असते अशी गोष्ट हें देणें मुदतीबाहेर गेल्यानंतर तें देण्याचें वचन मुलानें दिल्यास तें सर्व देण्याची जबाबदारी मुलावर जातीनें येते. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४५ पृ. ३४५; न्या. पु. ५७ म. दि. नि. पृ. १४).

७. **दावा लावून निकाल करून घेण्याचें कबूल करणें हा कराराचा योग्य मोबदला होईल.**–एखाद्या इसमास दुसऱ्या इसमाविरुद्ध आपणांस कांहीं दावाहक्क आहेत असें वाटत असून त्यानें त्याबद्दल कोर्टांत दावा लाऊन निकाल करून घेण्याचें तहकूब करणें हें कराराचा कायदेशीर मोबदला होईल, मग त्यानें आपला हक्क अमलांत आणण्याकरितां दावा लावला असतां त्याचा निकाल कोणत्याही प्रकारचा होवो. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४४ पृ. ४२४; न्या. पु. ५७ अ. दि. नि. पृ. ३०).

८. **मुदतीबाहेर गेलेलें कर्ज पूर्वींचें कर्ज या सदरांत येते.**—बापानें मुदतीबाहेर गेलेल्या कर्जाची फेड करण्याकरितां सदर रकमेच्या मोबदल्यांत अविभक्त वडिलोपार्जित मिळकतीची स्वत्वनिवृत्ती केली होती. मुदतीबाहेर गेलेलें कर्ज हें कायदेशीर पूर्वींचें कर्ज या सदरांत येतें. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४६ पृ. ७७५; न्या. पु. ५९ अ. दि. नि. पृ. ५२).

लग्नाच्या अटकावाविषयींच्या कबुलायती निरर्थक.

**२६.** अल्पवयस्क मनुष्य खेरीज करून इतर कोणत्याही मनुष्याच्या विवाहास अटकाव करणाऱ्या सर्व कबुलायती निरर्थक होत.

२७. ज्यांवरून एकादा कायदेशीर धंदा, व्यापार, किंवा कोणतेही प्रकारचा उद्योग करण्याचा कोणाला तरी अटकाव होईल अशा सर्व कबुलायती तितक्या अंशानें निरर्थक होत.

व्यापाराच्या अटकावाविषयींच्या कबुलायती निरर्थक.

अपवाद १.—कोणी एकादा मनुष्य व्यापाराची गुडविल* विकील, तर ती विकत घेणारा अथवा त्या विकत घेणारापासून ज्याला त्या गुडविलाविषयीं हक्क प्राप्त झाला आहे असा कोणी जोंपर्यंत तो व्यापार कांहींएक नेमलेल्या स्थानिक हद्दींचे आंत चालवील तोंपर्यंत त्या हद्दींच्या आंत आपण तसा व्यापार करणार नाहीं अशी कबुलायत तो विकणार खरीददाराशीं करूं शकेल; मात्र त्या व्यापाराच्या स्वरूपाकडे पाहिलें तर त्या नेमलेल्या हद्दी योग्य आहेत असें कोर्टास वाटलें पाहिजे.

ज्याची गुडविल विकली आहे त्या व्यापाराविषयीं मात्र अपवाद आहे.

अपवाद २.—सरकत मोडल्यावर अथवा मोडावयाची आहे इतक्यांत, सरकतीनें चालत आहे तसा व्यापार सरकतदारांपैकीं कांहींजण अथवा कोणीही वरील अपवादांत सांगितल्याप्रमाणें स्थानिक हद्दींच्या आंत चालविणार नाहीं अशी कबुलायत सरकतदार करूं शकतील.

सरकत मोडण्यापूर्वी सरकतदारांनीं आपसांत केलेल्या कबुलायतीविषयीं अपवाद.

अपवाद ३.—सरकत चालू असेपर्यंत सरकतीनें चालत असलेल्या व्यापाराखेरीज दुसरा कोणताही व्यापार अमुक सरकतदार किंवा कोणताच सरकतदार करणार नाहीं अशी कबुलायत सरकतदार करूं शकतील.

अथवा सरकत चालू असेपर्यंत इ०

विशेष समजुतीच्या टीपा.

१. चौघां इसमांपैकीं प्रत्येकाचो कापसाच्या सरक्या काढण्याची एकेक गिरणी होती. त्या इसमांनीं एक करारनामा केला "एक पल्लाभर कापसाच्या सरक्या काढण्याबद्दल प्रत्येकानें ४॥ रुपये भाडें घेत जावें; त्या रकमेपैकीं २॥ रुपये सरक्या काढण्याकरितां प्रत्यक्ष होणाऱ्या खर्चाबद्दल आहेत असें समजावें आणि बाकीचे दोन रुपये समाईक फंडांत ठेवावे आणि प्रत्येकाच्या

* गुडविल हे शब्द इंग्रजी आहेत. मराठींत त्यांला बरोबर अर्थाचा पर्याय शब्द नसल्यामुळें तेच मराठींत घेतले आहेत. त्यांचा अर्थः—"कोहीं धंदा चालला असून जें भांडवल, सामानपुंजी, ऐपत अथवा जिंदगी त्यांत घातलेली असते त्याशिवाय जो लाभ, गिन्हाईकें सतत अगर नेहमीं येतें असल्यानें किंवा तो धंदा अमुक एक ठिकाणीं चालतें असल्यावरून किंवा त्याची त्या ठिकाणीं कौशल्याबद्दल, विपुलतेबद्दल वेळचेवेळावर काम होत असल्यावरून चांगली कीर्ति असल्यानें, किंवा दुसऱ्या कांहीं यादृच्छिक गोष्टीवरून किंवा पूर्वीपासून मेहेरबानी होत असल्यावरून वगैरे लोकांकडून साधारण सार्वजनिक उत्तेजन मिळाल्यामुळें, त्या धंद्याला होत असेल ती." व्हार्टनचा कायदेकोश, तिसरी आवृत्ति, १८७४. शंकर पांडुरंग पंडित ख. रु. ठाणेंवाला.

गिरणांत सरकया काढण्याचीं जितकीं यंत्रें असतील त्या यंत्रांच्या मानानें दरसाल सर्वांनीं ती रक्कम वांटून घेत जावी." असा त्या करारनाम्यांत ठराव होता. तो करारनामा ४ वर्षांच्या मुदतीचा होता. बाकीच्या लोकांनीं त्या कराराप्रमाणें व्यवस्था केली. परंतु प्रतिवादानें ती २ रुपयांची रक्कम जरी पृथक् हिशोबांत जमा केली होती तरी त्या रकमेची वादीची वांटणी वादीस देण्याचें प्रतिवादीनें नाकबूल केलें. दुसऱ्या दोघां इसमांचे हिस्से देण्याचे प्रतिवादीनें नाकबूल केलें होतें. वादीस व त्या दुसऱ्या दोघां इसमांस करारनाम्याप्रमाणें किती रकमा द्यावयाच्या याजबद्दल प्रतिवादीनें हिशोब बरोबर केले होते. आपल्या हिश्शाची रक्कम घेण्याकरितां वादीनें प्रतिवादीवर दावा केला. तो करारनामा व्यापारास अटकाव करण्याचे स्वरूपाचा असल्यामुळें तो अमलांत आणतां येत नाहीं आणि त्या करारनाम्यांतील दुसऱ्या पक्षकारास वादीनें या दाव्यांत पक्षकार केलें पाहिजे होतें, अशी प्रतिवादीनें तक्रार केली.

ठरावः—प्रतिवादीपासून आपला हिस्सा घेण्याचा वादीस हक्क आहे. फायदा वांटून घेण्याचा करार अमलांत आणण्यासाठींच फक्त वादीनें या दाव्यांत मागणें केलें आहे. एकमेकांचा फायदा वांटून घेण्याबद्दलचा हा करार असल्यामुळें तो कायदेशीर आहे व तो अमलांत आणितां येण्याजोगा आहे.

आणखी असाही ठराव झाला कीं, त्या करारनाम्यांतील दुसऱ्या इसमांस या दाव्यांत पक्षकार करण्याची जरूर नव्हती. योग्य रीतीनें हिशेब करण्यांत आले होते व ते बरोबर आहेत असें कबूल करण्यांत आलें आहे आणि त्या करारनाम्यांतील एखाद्या इसमापासून प्रतिवादीस कांहीं एक यावयाचें नसून प्रतिवादीनें वादीस मात्र कांहीं नियमित रक्कम द्यावयाची आहे असें त्या हिशेबावरून दिसून येत आहे.

ची. ज. फ्यारनः—एक पल्ला कापसाच्या सरकया काढण्याबद्दल प्रत्येकानें ४॥ रुपये भाडें घेतलें पाहिजे, अशी जी त्या करारनाम्यांत शर्त आहे ती, "व्यापारास अटकाव" करण्याचे स्वरूपाची आहे असा जो कनिष्ठ अपील कोर्टानें ठराव केला आहे तो मान्य करावा असें मला वाटतें.

ज. ग्रांडीः—तो करारनामा व्यापारास अटकाव करण्याचे स्वरूपाचा आहे अशी माझी खात्री होत नाहीं. कराराच्या आक्टाचें कलम २७ यांत "ज्यावरून एकाद्या कायदेशीर व्यापारास अटकाव होईल" असे जे शब्द आहेत त्या शब्दांखालीं या कज्जांतील करार बरोबर रीतीनें येईल अशी माझी खात्री होत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २२ पृ. ८६१; न्या. पु. ३३ मुं. दि. नि. पृ. २८४ व २८५).

२. झंजीबार येथें वैद्यकीचा व सर्जनाचा धंदा करणारा ब याजपाशीं कांहीं शर्तीनीं ३ वर्षें पर्यंत असिस्टंटचें काम करण्याबद्दल अनें करार केला. ज्या शर्ती बनें अस कळविल्या होत्या व अनें मान्य केल्या आहेत असें कोर्टानें ठरविलें होतें त्या शर्तींत, "वैद्यकीचा धंदा न करण्याबद्दल नेहमींप्रमाणें शर्त घातली जाईल" असें शब्द होते. एक वर्षा नंतर त्यांचा बेबनाव झाला आणि अनें बच्या असिस्टंटचें काम करण्याचें बंद केलें आणि स्वतः झंजीबार येथें वैद्याचें काम करण्यास त्यानें सुरुवात केली. तसें स्वतंत्र रीतीनें काम करण्याची अ यास मनाईची ताकीद मिळावी म्हणून बनें अवर दावा केला.

ठरावः—३ वर्षांची मुदत होईपर्यंत अनें स्वतः स्वतंत्रपणानें वैद्याचा धंदा करूं नये अशी त्यास ताकीद देवविण्याचा बस हक्क आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २३ पृ. १०३; न्या. पु. ३४ मुं. दि. नि. पृ. २७).

३. सन १९०२ सालीं मार्च महिन्यांत मुंबई येथील कांहीं बर्फ तयार करणाऱ्या कंपन्यांनी बर्फ तयार करण्यासंबंधानें व त्याचे विक्री संबंधानें आपसांत करार केला. बर्फ किती कनिष्ठ किंमतीस विकावयाचें, कोणत्या कंपनीनें किती माल तयार करावयाचा, आणि नफ्यापैकीं प्रत्येक कंपनीला किती हिस्सा मिळावयाचा अशाविषयीं त्या करारनाम्यांत ठराव करण्यांत आले होते. शिवाय, प्रत्येक कंपनीस जो खरोखर नफा मिळाला असेल आणि करारनाम्याअन्वयें जो नफा मिळण्याचा या कंपनीस हक्क असेल, त्या दोन रकमां पैकीं फरकाची रक्कम निघेल ती रक्कम, प्रत्येक महिन्यास, साधारण फंडांत आणून भरण्याचा व त्यांतून घेण्याचा बोजा व हक्क, प्रत्येक कंपनीचे बाबतींत उत्पन्न करण्यांत आला होता. तो करार मोडल्या कारणानें, एक दावा करण्यांत आला व त्यांत, दाव्याचें अगोदर व दाव्याची चौकशी होईपर्यंत आलेल्या व येणाऱ्या नुकसानीबद्दल मागणें करण्यांत आलें होतें:

ठरावः—एकादा करार होऊन तो अमलांत आल्यास त्याचे योगानें व्यापारसंबंधीं चढाओढ कमी होऊन मालाच्या किंमतीचे प्रमाण कायम राहण्याचा परिणाम होईल तर, तो करार हिंदुस्थानचे करारावाबद आक्टाचें कलम २७ खालीं येईलच असें नाहीं. एखादा कायदेशीर धंदा, व्यापार, किंवा कोणतेही प्रकारचा उद्योग करण्याचा कोणाला तरी अटकाव त्या करारावरून झाला होता, असें सदर कलमाअन्वयें तक्रार करणारांनीं शाबीत केलें पाहिजे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २९ पृ. १०७; न्या. पु ४० मुं. दि. नि. पृ. ८१ व ८२).

४. व्यापारास मनाई करणारा करार.—नदीवरील कांहीं भागांच्या दरम्यान लहान नांवा हांकण्याचा अपेलंटाचा धंदा होता. या धंद्याचें गुडविल व नांवा उतरण्याच्या जागेसंबंधानें व त्या जागेवर करावयाच्या पट्टीच्या वसुलीसंबंधानें अपेलंटास त्यानें केलेल्या करारामुळें जे हक्कसंबंध प्राप्त झाले होते ते हक्कसंबंध अपेलंटापासून खरेदी घेण्याचा लेखी करार रेस्पांडंटानें अपेलंटास लिहून दिला होता. तीन वर्षेपर्यंत सदर जागीं आपण नांवा चालविणार नाहीं असें अपेलंटानें कबूल केलें होतें. मोबदल्यादाखल ठरलेली रक्कम मिळण्याकरितां अपेलंटानें दावा लावला.

ठरावः—कराराच्या आक्टाचें (सन १८७२) कलम २७ अपवाद १ मधील अर्थाप्रमाणें हा करार धंद्याचे गुडविल खरेदी देण्यासंबंधाचा आहे व यामुळें व्यापारास मनाई करणारा करार म्हणून तो रद्दबातल होत नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४८ पृ. १०३०; न्या. पु. ५६ क. दि. नि. पृ. २५).

५. अनेक मंडळींनीं आपसांत करार करून कापूस पिंजून त्याचे गाठे बांधण्याबद्दलचे दर ठरविले; व नफा कसा वांटून घ्यावयाचा तें ठरविलें.

ठरावः—सदर करार व्यापारास प्रतिरोधक अगर सार्वजनिक नीतिविरुद्ध नाहीं. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ३४ पृ. ५६७; न्या. पु. ४७ अ. दि. नि. पृ. ४१).

६. ठरावः—एका मालकानें शेजारच्या जमिनीच्या मालकाबरोबर दोन्हीं जमिनींवर गुरांचा बाजार एकाच दिवशीं भरवूं नये असा करार केला होता. या करारास कराराच्या आक्टाचें (सन १८७२) कलम २७ मधील तत्त्व लागू पडत नाहीं. (इं. ला. री. अ. सी. व्हा. २७ पृ. २०८; न्या. पु. ५० अ. दि. नि. पृ. १६).

न्यायाचे कामास मनाई आणणाऱ्या कबुलायती निरर्थक.

२८. ज्या कबुलायतीवरून तिच्या पक्षकारांतून कोणाला तरी, कोणत्याही करारासंबंधीं जे त्याचे हक्क ते न्यायाच्या साधारण ठिकाणीं न्यायाचें काम साधारण रीतीनें चालवून अमलांत आणण्यास अगदीं मनाई होईल, किंवा ज्या कबुलायतीवरून

त्यानें आपले हक्क तशा रीतीनें, अमलांत आणण्याच्या वेळावर इयत्ता येईल, त्या सर्व कवुलायती तितक्या अंशीं निरर्थक होत.

वाद उत्पन्न झाल्यास तो पंचांकडे घालूं असें कबुलायतीविषयीं अपवाद.

अपवाद १.—जर दोन किंवा अधिक मनुष्य आपसांत असा करार करतील कीं, कोणत्याही अमुक बाबतीबद्दल अथवा अमुक प्रकारच्या बाबतींबद्दल आपल्यामध्यें वाद उत्पन्न झाला तर तो निवडण्याकरितां पंचांकडे सोंपवून द्यावा, आणि तसा जो सोंपलेला वाद त्याबद्दल पंच ठरवितील तेवढीच रक्कम वसूल करावी, तर तो करार या कलमावरून गैरकायदेशीर होणार नाहीं.

अशा करारांनीं दाव्यास बाध येतो.

असा करार झाल्यावर, त्याची विशेष पूर्तता होण्याविषयीं दावा आणितां येईल आणि त्याची विशेष पूर्तता होणें याहून अन्य गोष्टीसाठीं किंवा पंचांनीं ठरविलेली रक्कम वसूल होणें याहून अन्य गोष्टीसाठीं, ज्या बाबतीबद्दल वाद उत्पन्न झाल्यास पंचांकडे घालण्याचें कबूल केलें असेल त्या बाबतीसंबंधीं, कराराच्या एका पक्षकारानें दुसऱ्या कोणत्याही पक्षकारावर दावा आणल्यास, तसा करार झाला आहे या गोष्टीवरून त्या दाव्यास बाध येईल.

जे वाद पूर्वींच उत्पन्न झाले असतील ते पंचांकडे सोंपविण्याविषयींच्या करारावद्दल अपवाद.

अपवाद २.—आणि दोन किंवा अधिक मनुष्यांमध्यें कांहीं वाद पूर्वींच उत्पन्न झाला आहे तो पंचांकडे सोंपविण्याची कबुलायत ज्यांत आहे असा करार लेखी त्या दोन किंवा अधिक मनुष्यांनीं केला असेल, तर तो या कलमावरून गैरकायदेशीर होणार नाहीं, किंवा पंचांकडून निकाल होण्यास्तव खटले पंचांकडे सोंपवून देण्याविषयीं विवक्षित काळीं जो कोणताही कायदा* लागू असेल त्याच्या कोणत्याही ठरावाला, या कलमावरून व्यत्यय येणार नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. वादी यानें प्रतिवादी हरपाटील यांजवर एक पैक्याचा हुकुमनामा मिळविला आणि त्याचे बजावणींत प्रतिवादीची कांहीं मिळकत जप्त करविली. तेव्हां प्रतिवादी हरपाटील याचे विनंतीवरून सदहू हुकुमनाम्याची फेड करण्याबद्दल प्रतिवादीच्या तर्फेनें पांच इसमांनीं हवाला घेतला म्हणून ती जप्ती उठविण्यांत आली. त्या हवाल्याप्रमाणें त्यांनीं कांहीं रकमेची फेडही केली होती असें दिसतें. नंतर हरपाटील आणि प्रतिवादी नं. २ व ३ यांनीं त्या हवाल्याबद्दल व त्या हवाल्यावरून केलेल्या फेडीबद्दल उल्लेख करून, त्या हुकुमनाम्यांतील बाकीची रक्कम व्याजासुद्धां फेड करण्याबद्दल वादी यास एक करार लिहून दिला. त्या हवाल्याची गोष्ट किंवा त्या

* सन १८८२ चा १४ (सि. प्रो. कोड) याव ३७ पहा; सन १९०८ चा आक्ट ५ (नवीन सि. प्रो. कोड) दुसरें परिशिष्ट (दिवाणी [illegible]) पहा.

करारनाम्याची गोष्ट त्यांनीं कोर्टास कळविली नव्हती आणि तो हुकुमनामा बजावण्यालायक अस-तांना त्यांनीं तो फाडून टाकिला. त्या करारनाम्यावरून किंवा रोख्यावरून यावयाची रक्कम घे-ण्याकरितां वादी यानें हल्लीं हा दावा केला आहे. त्या रोख्यांत व्याज घेण्या बद्दलचा जो करार आहे तो अव्यवहारोपयोगी आहे, परंतु त्या हुकुमनाम्यांतील मुद्दल रक्कम घेण्याबद्दल जो त्यांत ठ-राव आहे तो अव्यवहारोपयोगी नाहीं, असा जिल्हे जज्जाचा अभिप्राय होता. त्यानें हा कज्जा हायकोर्टाकडे अभिप्रायाकरितां पाठविला.

ठरावः—तो सर्व करार रद्दबातल आहे. हा हवाला, सन १८८२ चा आक्ट १४ कलम २५७—अ यांत सांगितलेल्या प्रकारचा एक करार आहे आणि त्या कलमाप्रमाणें त्यास कोर्टाची मंजुरी नसल्यामुळें तो रद्दबातल आहे. वादी यानें जो रोखा लिहून घेतला आहे तो त्या हवा-ल्याच्या बद्दलचा आहे किंवा हुकुमनाम्याचे फेडीबद्दलचा तो करार आहे आणि याजकरितां त्याच कलमाच्या दुसऱ्या पारिग्राफावरून त्याच कारणामुळें रद्दबातल आहे, कारण त्यास कोर्टाची मंजुरी घेतलेली नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २२ पृ. ४९९; न्या. पु. २३ मुं. दि. नि. पृ. २२३ ).

२. ठरावः—हक्क नष्ट होणें व दाद लावण्याचा मार्ग नष्ट होणें यांत भेद आहे. केव्हांहीं दावा न करण्याबद्दलच्या करारास अगर ठराविक मुदतींत दावा न करण्याबद्दलच्या करारास अ-नुलक्षून कराराचा आक्ट कलम २८ करण्यांत आलें आहे. परस्परसंबंध असलेले निरनिराळे दावे होऊं नयेत अशाकरतां मुळींच दावा न करण्याच्या कराराचा परिणाम कांहीं शर्तीवर हक्क सोडून देण्याबद्दलच्या करारासारखाच होतो असें कांहीं स्थलीं ठरविलें असलें तरी, दावा न क-रण्याचा करार व कांहीं शर्तीवर हक्क सोडून देण्याचा करार हे अगदीं भिन्न आहेत. दाव्यांतील पॉलिसींत हक्क नष्ट होण्यासंबंधानें जी शर्त आहे तिचा अंतर्भाव कराराचा आक्ट कलम २८ मध्यें होत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३८ पृ. ३४४; न्या. पु. ४९ मुं. दि. नि. पृ. १४३ व १४४ ).

३. एकाद्या करारनाम्यांत लवाद नेमण्याबद्दल शर्त असेल तर ती शर्त सन १८९९ चा ल-वादीबाबद आक्ट ९ कलम ४ चें अर्थाप्रमाणें मतभेदाच्या बाबती लवादीकडे सोंपविण्यासाठीं केलेली लेखी कबुलायत होते आणि कराराच्या आक्टाचें कलम २८ अपवाद १ वरून तीस बाध येत नसल्यामुळें ती शर्त व्यवहारोपयोगी होते.

फार मोठ्या व नेहमीं लोकांचा फेरबदल होणाऱ्या अशा एकाद्या सभेकडे किंवा मंडळीकडे एकादे प्रकर्ण लवाद करण्यासाठीं पक्षकारांनीं पाठविलें असेल तर त्या सर्व मंडळीस किंवा सभेस न्यायाधीश म्हणून बसतां येत नसल्यामुळें आपल्यापैकीं कांहीं लोकांस लवादाचें काम कर-ण्यासाठीं नेमण्याचा त्यांस अधिकार असतो व त्या सभेचे नियम मान्य करणें पक्ष-कारास भाग आहे. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३३ पृ. ११६९; न्या. पु. ४१ क. दि. नि. पृ. ४७ व ४८ ).

४. **वेचन देणारा व घेणारा यांजमधील करार.**—वेचनाप्रमाणें हुकुमनामा वेचन घेणारास मिळालेले हक्कसंबंध वेचन घेणारा केव्हांहीं अमलांत आणणार नाहीं; म्हणजे, वेचन घेणारा हा हुकुमनाम्याची बजावणी करणार नाहीं, अगर बजावणीचें कामीं मध्यें पडणार नाहीं, असा करार वेचन देणारा व वेचन घेणारा यांचे दरम्यान झाला असेल तर, तो कराराच्या आक्टाचें कलम २८ मधील ठरावामुळें बेकायदेशीर होईल. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४४ पृ. ९१९; न्या. पु. ५६ म. दि. नि. पृ. ३७ ).

मोघमपणामुळें कबुलायती निरर्थक होत.

२९. ज्यांचा अर्थ निश्चित होत नाहीं, किंवा निश्चित करण्याजोगा नाहीं, अशा कबुलायती निरर्थक होत.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा ' १०० टन तेल ' बला विकत देण्याची कबुलायत करितो. कशाचें तेल द्यावयाचें मनांत होतें हें समजण्यास कांहीं आधार नाहीं. तर ही कबुलायत मोघमपणामुळें निरर्थक होय.

( ब. ) अ हा १०० टन अमूक एक प्रकारचे तेलें कीं, ज्याची प्रसिद्धी व्यापाराची जिन्नस म्हणून व्यापारी लोकांस आहे तें बला विकत देण्याची कबुलायत करितो, तर यांतील अर्थाविषयीं संशय नसल्यामुळें कबुलायत निरर्थक होत नाहीं.

( क. ) अ हा केवळ खोबरेल तेलाचा व्यापार करीत असून तो बला ' १०० टन तेल देईन ' अशी कबुलायत करितो. अच्या व्यापाराच्या स्वरुपावरून कबुलायतीचा अर्थ समजण्यांत येतो, म्हणून अनें १०० टन खोबरेल देण्याची कबुलायत केली असें झालें.

( ड. ) अ हा ' रामनगर येथें आपल्या कोठारांत असलेलें सर्व धान्य ' बला विकण्याचें कबूल करितो. यात कबुलायत निरर्थक होण्याजोगें मोघमपण कांहीं नाहीं.

( ई. ) अ हा ' क ठरवील त्या किंमतीनें एक हजार मण तांदूळ ' बला विकण्याचें कबूल करितो. यांत किंमत निश्चित करतां येते म्हणून कबुलायत निरर्थक होण्याजोगे मोघमपण कांहीं नाहीं.

( फ. ) अ हा ' माझा पांढरा घोडा ' पांचशें रुपयांस किंवा एक हजार रुपयांस बला विकीन अशी कबुलायत करितो. सांगितलेल्या दोहोंतून कोणती किंमत द्यावयाची मनांत होती तें समजण्यास कांहीं साधन नाहीं. तर ही कबुलायत निरर्थक होय.

## विशेष समजुतीची टीप.

मयत फ्रामजी कावसजी वनाजी याचे वारस यांनीं ता. २४ मे सन १८५१ रोजीं आपसांत एक करारनामा केला. सालसिटी ( वसई ) बेटांतील पौवाई नांवच्या इस्टेटीच्या उत्पन्नांतून मयताच्या कर्जाची फेड झाल्यानंतर जें बाकी उत्पन्न राहील तें उत्पन्न मयताचें वारस म्हणून नियमित हिश्शांनीं आपसांत वांटून घेत जावें आणि आपल्या मरणानंतर आपले वारस व आपली मुलें यांनीं वंशपरंपरेनें सदोदीत त्या हिश्शांचा उपभोग घ्यावा असें त्या सर्वांनीं त्या करारनाम्यांत कबूल केलें होतें. त्या करारनाम्यावरून पूर्वीं जो एक दावा झाला होता ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ६ पृ. १५१ ) त्यांत, " त्या करारनाम्यावर सह्या करणारांस आपआपल्या हिश्शांत फक्त ताहयातचा हक्क मात्र मिळाला आहे " असा ठराव झाला होता. हल्लींच्या या दाव्यांत अशी तक्रार करण्यांत आली आहे व या कोर्टाच्या [illegible] कोर्टानें असें ठरविलें होतें कीं,

" त्याजवर सह्या करणारांच्या मरणानंतर त्याचे हिस्से त्याच्या वारसांस व मुलांस वंशपरंपरेनें सदोदीत देण्याबद्दल " जो त्या करारनाम्यांत ठराव आहे तो निरर्थक आहे. त्याजवरील अपिलांत ठराव झाला तोः—

ठरावः—त्या करारनाम्यावर सही करणाऱ्यां प्रत्येक इसमाच्या वारसांस व मुलांस हिस्सा देण्याबद्दल जो त्यांत ठराव आहे तो कायद्याचे दृष्टीनें व्यवहारोपयोगी आहे आणि सदोदीतच्या स्वरूपाचा तो आहे एवढ्यावरून तो निरर्थक होत नाहीं. त्या हिश्शाहून त्या वारसांस व मुलांस कमी हिस्सा मिळावा असा उद्देश असल्याबद्दल त्या करारनाम्यांत शब्द नसल्यामळे, त्या करारनाम्यावर सह्या करणारांचे वारसांस व मुलांस त्यांच्या त्यांच्या हिश्शावर निखालस मालकी प्राप्त झाली आहे.

अचे वारसांस वंशपरंपरेची देणगी देण्यांत आली असेल आणि अनें आपले वारसांची नांवें क्ष व य अशीं लिहून त्यांस देणगी दिली असेल तर त्या दोन्हीं प्रसंगीं अचे वारसांस एकसारखीच मालकी प्राप्त होते. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २२ पृ. ३५५; न्या. पु. ३३ मुं. दि. नि. पृ. १३१ व १३२ ).

पैजेवरच्या कबुलायती निरर्थक होत.

३०. पैजेवरच्या कबुलायती निरर्थक होत, आणि एखादी वस्तु कोणत्याही एखाद्या पैजेनें जिंकिली असें म्हणणें असेल तशी वस्तु, अथवा ज्या एखाद्या शर्यती विषयीं अगर दुसऱ्या अनिश्चित गोष्टीविषयीं कोणतीही पैज मारिली असेल त्या शर्यतीचा अथवा अनिश्चित गोष्टीचा शेवट होईल त्याप्रमाणें वागण्याबद्दल जी एखादी वस्तु कोणाकडेस तरी ठेव ठेविली असेल ती मिळविण्यासाठीं दावा करितां येणार नाहीं.

घोड्याचे शर्यतीबद्दल कित्येक बक्षिसांसाठीं अपवाद.

कोणतीही घोड्याची शर्यत जिंकणारास अगर जिंकणारांस द्यावयाचे जे पांचशें रुपये किंवा त्याहून अधिक किंमतीचें अथवा रकमेचें ताट, बक्षीस, किंवा द्रव्य त्याकरितां किंवा त्याची भर होण्याकरितां दिलेली वर्गणी किंवा पट्टी, अथवा वर्गणी अगर पट्टी देण्याविषयीं केलेली कबुलायत या कलमावरून गैरकायदेशीर होते असें मानूं नये.

या कलमावरून इंडि- ज्याला *इंडियन पिनल कोड कलम २९४ अ

* इं. पि. कोड कलम २९४ अ. " सरकारानें हुकूम न दिलेली कोणतीही सोडत काढण्यासाठीं कोणतेंही ऑफिस ( कचेरी ) किंवा जागा जो कोणी ठेवील त्यास पराकाष्ठा ६ महिनेपर्यंत दोहों प्रकारांपैकीं कोणत्याही एका प्रकारच्या कैदेची शिक्षा, किंवा दंड, किंवा या दोन्हीं शिक्षा कराव्या.

आणि सदहू प्रकारचे कोणतेही सोडतींत कोणतीही तिकीट, किंवा लाट, किंवा नंबर, किंवा अंक काढण्यासंबंधीं किंवा लागू करणारी कोणतीही गोष्ट घडली असतां कोणतेही मनुष्याचे फायद्यासाठीं कोणतीही रकम, किंवा माल देण्यांत येईल, किंवा कोणतीही गोष्ट करण्यांत येईल, किंवा करण्यांत न येईल असा कोणताही ठराव जो कोणी प्रसिद्ध करील त्यास एक हजार रुपये पर्यंत दंड करावा. ( सन १८७० चा आक्ट २७ कलम १० ). "

यन पिनल कोड कलम २९४ अ याला व्यत्यय येत नाहीं.

यांतील ठराव लागू आहेत असा घोड्याच्या शर्यतीसंबंधीं कोणताही व्यवहार या कलमावरून कायदेशीर होतो असें मानूं नये.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. सन १८६५ चा मुंबईचा आक्ट ३ अजून अमलांत आहे व सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ वरून तो रद्द झाला नाहीं.

पक्षकारांचे दरम्यान पैजेच्या स्वरूपाचे झालेले करार निरर्थक होतात. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २२ पृ. ८९९; न्या. पु. ३३ मुं. दि. नि. पृ. २९० ).

२. हैद्राबाद येथें ब्यारिस्टरचें काम करणारा ब्यारिस्टर नसरवानजी एफ. भंडारा याचा कारकून अबदूल समद याची बायको महबुबबी हिच्या आयुष्याचा विमा प्रतिवादीच्या कंपनीनें उतरून १० वर्षांच्या मुदतीची व २५००० रुपयांच्या रकमेची पालिसी ता. २३ आगष्ट सन १८९४ रोजीं दिली. महबुबबी हिनें ती पालिसी ता. १ सप्टेंबर सन १८९४ रोजीं, नसरवानजी एफ भंडारा याची बायको जी अलमई हिला विकत दिली. महबुबबीची ही ता. २ आक्टोंबर सन १८९४ रोजीं मयत झाली. त्या पालिसीवरून वादीनें म्हणजे अलमई हिनें प्रतिवादीच्या कंपनीपासून २५००० रुपये घेण्याकरितां हा दावा केला. ती पालिसी, महबुबबी हिनें किंवा तिच्या उपयोगाकरितां किंवा तिच्या फायद्याकरितां किंवा स्वतःकरितां खरोखर केलेली नसून नसरवानजी एफ. भंडारा यानें आपल्या स्वतःच्या उपयोगाकरितां व फायद्याकरितां घेतलेली आहे व महबुबबीच्या जिवीत्वाचे संबंधानें त्यास कांहींच कळकळ नव्हती आणि याजकरितां ती पालिसी निरर्थक आहे असा प्रतिवादीच्या कंपनीनें जबाब दिला.

**ठरावः**—( १ ) महबुबबी हिनें ती पालिसी आपल्या स्वतःच्या उपयोगाकरितां घेतली नसून नसरवानजी एफ भंडारा यानें आपल्या स्वतःच्या उपयोगाकरितां व फायद्याकरितां घेववली होती व महबुबबी हिच्या जिवीत्वाचे संबंधानें त्यास कांहीं कळकळ नव्हती, असें पुराव्यावरून ठरविण्यांत आलें.

( २ ) ज्या मनुष्याचे जिवीत्वांत कांहीं हितसंबंध नाहीं अशा मनुष्याच्या जिवीत्वाचा कांहीं वर्षांच्या मुदतीचा विमा उतरला असतां, सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम ३० चे अर्थाप्रमाणें तो पैजेच्या स्वरूपाचा विमा असल्यामुळें तो निरर्थक होतो.

**प्रश्नः**—एखादे मनुष्यानें आपल्या जिवीत्वाचें विम्याची पालिसी, ज्या मनुष्यास आपल्या जिवीत्वाचे संबंधानें कांहीं कळकळ नाहीं अशा तिऱ्हाईत मनुष्यास विकत दिली असतां तो व्यवहार निरर्थक होतो किंवा नाहीं ? ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २३ पृ. १९१; न्या. पु. ३४ मुं. दि. नि. पृ. ६१ व ६२ ).

३. प्रतिवादीतर्फे धालरा येथें कापसाचे व्यवहार करण्यासाठीं प्रतिवादींनीं वादीस नोकरीस ठेविलें. छापलेल्या नमुन्यांतील शर्तीस अनुसरून कापूस विकण्याचे व खरेदी करण्याचे करार करण्यांत येत असत. धालरा येथील कापसाच्या व्यापाऱ्यांनीं केलेले कानू त्या नमुन्यांत दाखल केलेले असतात. प्रत्येक बाबतींत कापूस स्वाधीन केला पाहिजे आणि नुसत्या किंमतींतील फेराबद्दल पैजा मारूं नये असा त्या कानूंत स्पष्ट ठराव आहे. ते कानु व करारांतील स्पष्ट शर्ती एकीकडे ठेऊन, करारांतील किंमत आणि ठरावाचे दिवशीं मुंबई येथील बाजार भावाची किंमत या

दोहोंत जो फरक असेल त्या फरकाची रक्कम एकमेकास देऊन करार पुरे करण्यांत येत असत व प्रत्यक्ष माल स्वाधीन करून ते करार कधींच पुरे करण्यांत येत नसत, अशी धालरा येथें वहिवाट पडून गेली होती. प्रतिवादीचे तर्फेनें वादीनें सदहू प्रकारचे कित्येक व्यवहार केले. त्या व्यवहारांत झालेली नुकसानी व कमिशन आणि दलाली अशी प्रतिवादीपासून घेण्यासाठीं वादीनें हल्लींचा हा दावा केला.

ठरावः—दोन किंमतींतील फरकाच्या रकमेबद्दल हा नुसता पैजेचा व्यवहार आहे आणि अशा व्यवहाराच्या संबंधाची कोणतीही रक्कम घेण्याबद्दल सन १८६५ चा मुंबईचा आक्ट ३ वरून दावा चालणार नाहीं.

एकादा करार पैजेचा करार आहे किंवा नाहीं याचा निर्णय करण्यासाठीं, कोर्ट नुसत्या लेखी करारांतील शर्तींचाच विचार करील असें नाहीं, परंतु पक्षकारांचा खरा हेतु काय होता तें शोधून काढण्यासाठीं आजुबाजुच्या अहवालांचाही कोर्ट विचार करील. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २४ पृ. २२७; न्या. पु. ३५ मुं. दि. नि. पृ. १७० ).

४. हिंदुस्थानचा करारावाबद आक्ट कलम ३० खालीं एखादा व्यवहार येण्यास, त्या व्यवहारांत निदान दोन पक्षकार असले पाहिजेत, त्यांचेमधील करार पैजेचे स्वरूपाचा असला पाहिजे, आणि ते दोघेही पक्षकार त्या पैजेचे करारांतील पक्षकार असले पाहिजेत.

एखादी अनिश्चित किंवा अनिरुपित गोष्ट घडेल किंवा न घडेल त्याप्रमाणें जिंकण्यास किंवा हरण्यास करार करणारे दोघेही इसम राजी होणें हें पैजेच्या करारास तात्विक रीतीनें जरूर असतें; म्हणजे कोणताही करार पैजेच्या स्वरूपाचा होण्यास पैजा लावण्याचा दोघांही पक्षकारांचा साधारण उद्देश असला पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २८ पृ. ६१६; न्या. पु. ३९ मुं. दि. नि. पृ. ३१५ ).

५. कराराच्या आक्टाचें कलम ३० व सन १८६५ चा मुंबई आक्ट ३ यांतील कायदा असा आहे कीं, पक्षकारांनीं आपला करार ज्या शर्तींच्या रूपानें मांडला असेल त्यांचाच मात्र विचार करून कोर्टानें स्वस्थ बसतां कामा नये, तर त्या व्यवहाराचे एकंदर स्वरूपाकडे कोर्टानें लक्ष पुरविलें पाहिजे, आणि व्यवहारांतील पक्षकारांचे दरम्यान खरोखर काय समजुतीनें ठराव झाला होता व त्यांचा खरा उद्देश काय होता हें निश्चित करण्याचे इराद्यानें एकंदर भोंवतालच्या परिस्थितीकडे कोर्टानें नजर दिली पाहिजे. कराराचा जो प्रत्यक्ष नमुना असेल त्याचें फारसें महत्व नसतें, कारण एकादी मिळकत दुसऱ्यास देण्यास ज्या योगानें कांहीं प्रसंग एकादे इसमास भाग पाडतां येईल अशा प्रकारच्या शर्ती करारांत घुसडून कोर्टास आपल्या अधिकाराचा उपयोग करण्यास ज्या योगें भाग पाडतां येईल अशी संधी जुवेबाज लोकांस देतां कामा नये.

उभय पक्षकारांचा सामान्य हेतु वास्तविक रीतीनें काय होता हें शोधून काढण्यास कोर्टानें तयार राहिलें पहिजे, आणि व्यवहाराचे वरील स्वरूपावरून त्यांतील अंतर्गत तत्व काय आहे हें समजून घेण्यासाठीं कोर्टानें जरूर तो सर्व यत्न केला पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३० पृ. ८३; न्या. पु. ४१ मुं. दि. नि. पृ. ३९ व ४० ).

६. **पैजेच्या स्वरूपाचा करार व सट्टा यांतील भेद.**—सट्टा करण्यांत पैजेच्या स्वरूपाच्या कराराचा अवश्यमेव अंतर्भाव होतो असें नाहीं, पैजेच्या स्वरूपाचा करार होण्यास करार करणाऱ्या दोन्हीं इसमांचा असा करार करण्याचा हेतु असणें अवश्यक आहे.

करार करणारांपैकीं एका इसमानें फक्त सट्टा केला असेल व त्याचा कराराप्रमाणें माल ताब्यांत देण्याचा केव्हांही हेतु नसेल व ही गोष्ट करार करणाऱ्या दुसऱ्या बाजूस माहीत असेल तरीही

माल ताब्यांत द्यावयाचा नाहीं असा करार करणाऱ्या दोन्हीं इसमांचे प्रत्यक्ष अगर आक्षिप्त रीतीनें समज असल्याशिवाय इतर दृष्टीनें कायदेशीर असलेला करार पैजेच्या स्वरूपाचा करार होत नाहीं; व बराचसा माल ताब्यांत दिला नसून त्यासंबंधानें फक्त देण्याघेण्याचा हिशोब करण्यांत आला होता येवढ्यामुळें सदर्हू करार बेकायदेशीर होत नाहीं.

पक्क्या अडतीनें व्यवहार करणें कायदेशीर आहे असें मुंबईच्या बाजारांत आतां चांगल्या रीतीनें प्रस्थापित झालेलें आहे.

हायकोर्टानें आपल्या अपेलेट अधिकारांत केलेला ठराव रद्द करून पुढील ठराव करण्यांत आलाः—

ठरावः—दाव्यांतील करार हे पैजेच्या स्वरूपाचें करार होत नाहींत. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४२ पृ. ३७३; न्या. पु. ५३ मुं. दि. नि. पृ. ३० व ३१ ).

७. वारलोन लाटरीचें तिकीट.—सन १९१७ च्या एप्रिलमध्यें वेस्टर्न इंडिया टर्फ क्लबनें अगाऊ अशी लाटरी काढण्यास हिंदुस्थान सरकारची विशेष परवानगी घेऊन वॉर लोन लाटरी काढली. या लाटरीचीं तिकिटें—१ नंबरापासूनचीं पुढें—सर्व लोकांस विक्री करण्याकरितां काढण्यांत आलीं; प्रत्येक तिकिटाची किंमत रुपये १० ठेवण्यांत आली होती. १५३१५ नंबरचें तिकीट घेण्याची वादीची इच्छा असलेमुळें त्यानें सदर्हू नंबरचें तिकीट विक्रीकरितां क्लबच्या ज्या गुमास्त्याजवळ होतें त्या गुमास्त्यापासून खरेदी घेतलें. याबद्दल वादीस रुपये १० ची पावती देण्यांत आली व त्यांत तिकिटाचा सदर्हू नंबर घालण्यांत आला. सदर्हू नंबरचें तिकीट ज्या पुस्तकांत होतें त्या पुस्तकांतील त्या नंबरापर्यंतचीं तिकीटें खपलीं नसलेमुळें त्या पुस्तकांतील सदर्हू नंबरापर्यंतचीं तिकीटें प्रत्यक्ष खपल्यानंतर सदर्हू तिकीट वादीस देऊं असें क्लबच्या गुमास्त्यानें कबूल केलें. कांहीं चुकीमुळें सदर्हू नंबरचें तिकीट ज्या पुस्तकांत होतें तें पुस्तक कलकत्त्यास पाठविण्यांत आलें व तेथें सदर्हू नंबरचें तिकीट प्रतिवादी नंबर ३ ला विकत देण्यांत आलें. आपण जें तिकीट खरेदी घेतलें आहे तेंच आपणांस पाहिजे असें वादीनें आग्रह धरला व तें तिकीट आपणांस देण्याबद्दल वादीनें क्लबला लिहिलें; यानंतर नं. १५३१५ नंबरचें तिकीट अजिबात काढून टाकावें, वादीचे रुपये १० वादीस परत द्यावे व प्रतिवादी नं. ३ ला १५३१५ अ या नंबराचें तिकीट द्यावें असें क्लबनें ठरविलें; प्रतिवादी नं. ३ नें आपल्या तिकीटाचा नं. १५३१५ अ असा केला परंतु ही व्यवस्था वादीनें कबूल केली नाहीं. नंतर वादीनें तीन प्रतिवादींवर दावा लावला. प्रतिवादी नं. १ हा क्लबचा सेक्रेटरी असून प्रतिवादी नं. २ हा क्लबचा एक सभासद होता. प्रतिवादी नं. १ व प्रतिवादी नं. २ यांनीं लाटरीमधून स्वतःकरितां व क्लबचे सभासद यांजकरितां नं. १५३१५ चें तिकीट काढून टाकूं नये अशी प्रतिवादी नं. १ व २ यांस ताकीद देण्यांत यावी व सदर्हू तिकिटास अगर त्या तिकिटाच्या बदला जें तिकीट घालण्यांत येईल त्यांस एखादें बक्षीस मिळाल्यास त्याची रक्कम प्रतिवादी नं. ३ ला देण्यांत येऊं नये असा हुकूम करण्यांत यावा अशा दादी वादीनें दाव्यांत मागितल्या होत्या.

ठरावः—(१) हिंदुस्थान सरकारनें लाटरी काढण्यास मंजुरी दिल्यामुळें फक्त त्यासंबंधानें फौजदारी काम चालविण्यास प्रतिबंध झाला. हिंदुस्थान सरकारनें व स्थानिक सरकारनें केलेल्या दिवाणी कायद्याअन्वयें पक्षकारांचे परस्पर हक्कसंबंध निश्चित होत असतात. हिंदुस्थान सरकारच्या परवानगीमुळें हे कायदे रद्द होऊं शकत नाहींत.

(२) पैजेच्या स्वरूपाचे सर्व करार निरर्थक आहेत असें कराराच्या आक्टाचें कलम ३० मधील पहिल्या भागांत ठरविण्यांत आलें आहे. त्या ठरावाकडे लक्ष देतां प्रस्तुतच्या दाव्यां-

तील करार हा पैजेच्या स्वरूपाचा करार असल्यामुळें निरर्थक होत आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४२ पृ. ६७६; न्या. पु. ५३ मुं. दि. नि. पृ. ४८ व ४९ ).

८. तेजीमंदी कराराचें स्वरूप कसें ठरवावें —करार करणाऱ्या दोन्हीं पक्षांचा सर्वसाधारण हेतु करार करतें वेळीं फक्त किंमतीमधील फरक द्यावयाचा अगर घ्यावयाचा व कोणत्याही परिस्थितीमध्यें कोणत्याही पक्षानें माल मागावयाचा नाहीं अगर द्यावयाचा नाहीं असा होता. असें शाबीत झाल्याशिवाय तेजीमंदी करार हे जुगाराच्या स्वरूपाचे आहेत असें सदर करारांचें फक्त बाह्य स्वरूप व लक्षणें यांजवरून ठरवितां येणार नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४७ पृ. २६३; न्या. पु. ५८ मुं. दि. नि. पृ. १८ ).

९. गुमास्त्याचा मुख्यापासून रक्कम वसूल करण्याचा हक्क.—पैजेच्या स्वरूपाच्या करारांत गुमास्ता या नात्यानें ज्या इसमाची नेमणूक केली असेल त्या इसमास आपल्या मुख्यापासून रक्कम वसूल करण्यास कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ ) कलम ३० प्रमाणें हरकत येत नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४५ पृ. ५०३; न्या. पु. ५८ अ. दि. नि. पृ. ३९ ).

---

## बाब ३ री.

### अवलंबी करारांविषयीं.

"अवलंबी करार" लक्षण.

**३१.** कांहीं एक गोष्ट, जी एखाद्या कराराशीं सहगामी आहे ती घडून येईल किंवा न घडून येईल तर अमूक कांहीं तरी करण्याविषयींचा किंवा न करण्याविषयींचा जो करार, त्याचें नांव अवलंबी करार.

#### उदाहरण.

ब चें घर जळालें तर ब ला १०,००० रुपये देण्याचा करार अ करितो. हा अवलंबी करार होय.

कांहीं तरी गोष्ट घडून येण्यावर अवलंबी जे करार तें अमलांत आणणें.

**३२.** कांहीं अनिश्चित भविष्य गोष्ट घडून येईल तर अमुक कांहीं तरी करण्याबद्दलचे किंवा न करण्याबद्दलचे जे अवलंबी करार ते, ती गोष्ट घडून आली नाहीं तर आणि घडून येई तोंपर्यंत कायद्याअन्वयें अमलांत आणतां येणार नाहीं.

त्या गोष्टीचें घडून येणें जर अशक्य होईल तर अशा प्रकारचे करार निरर्थक होतील.

#### उदाहरणें.

( अ. ) अ हा ब शीं असा करार करितो कीं, जर मी ( अ ) क च्या पश्चात जिवंत राहिलों तर तुझा ( ब ला घोडा विकत ) घेईन. तर हा करार क न

मरेल तर व मरेपर्यंत कायद्या अन्वयें अमलांत आणतां येणार नाहीं व क हा अ जिवंत असतां मेला पाहिजे.

( ब. ) अ हा बशीं असा करार करितो कीं, कला आपण एक घोडा विकत देऊं केला आहे तो कनें न घेतला तर तो अमुक एक किंमतीस तुला ( बला ) विकून देईन, तर हा करार, क घोडा घेत नाहीं असें न म्हणेल तर व म्हणेपर्यंत कायद्यानें अमलांत आणतां येणार नाहीं.

( क. ) अ हा बनें कशीं लग्न केलें तर बला कांहीं एक रक्कम देण्याचा करार करितो. कचें लग्न बशीं होण्यापूर्वी क मरण पावतो तर करार निरर्थक झाला.

## विशेष समजुतीची टीप.

ता. ७ आगष्ट १९०९ प्रतिवादीनें वादीस लिहून दिलेल्या पत्रांत त्यांत उल्लेख केलेलें एक पूर्णांक एक द्वितियांश लाख रुपयांचें कर्ज परत देण्याबद्दल हमी घेतलेली होती. तें पुढें दिल्याप्रमाणें होतें. " त्रिकमदास मिल्स कंपनी लिमिटेडचे सेक्रेटरी, ट्रेझरर व एजंट यांनीं जें एक पूर्णांक एक द्वितियांश लाख रुपयांचें कर्ज मागितलें होतें तें देण्याचें तुम्ही माझ्या विनंतीप्रमाणें कबूल केल्यामुळें, मिलच्या स्थावर मिळकतीच्या पहिल्या गहाणावर दोन आठवड्यांच्या आंत ११ लाख रुपये कर्ज काढून देण्यास व तुम्हीं गिरणीला जें एक पूर्णांक एक द्वितियांश लाख रुपयांचें कर्ज द्यावयाचें कबूल केलें आहे तें त्यांतून फेडण्यास मीं आपणांस यावरून बांधून घेतों. " या पत्राचा अर्थ काय हा प्रस्तुतच्या अपिलांतील प्रश्न होता. सदर पत्रांत केलेला करार मोडल्यामुळें झालेल्या नुकसानीच्या भरपाईबद्दल आणलेल्या दाव्यांत, गिरणीवर पहिलें गहाण करण्यांत आल्यास त्याबद्दल ११ लाख रुपये कर्जाऊ काढण्याची व त्यांतून वादीस एक पूर्णांक एक द्वितियांश लाख रुपये देण्याचा करार प्रतिवादीनें केला होता, असा प्रतिवादीप्रमाणें निकाल हिंदुस्थानांतील कोर्टांनीं केला.

सदर निकाल रद्द करून प्रिव्हि कौन्सिलनें पुढील ठराव केला:—

ठरावः—सदर दस्तऐवजाचा खरा अर्थ करतां, ११ लाख रुपये कर्जाऊ काढून त्यांतून वादीस एक पूर्णांक एक द्वितियांश लाख रुपये परत द्यावयाचे असा प्रतिवादीनें त्यांस करार केला होता. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३६ पृ. १८७; न्या. पु. ४७ मुं. दि. मि. पृ. २२६ ).

३३. कांहीं अनिश्चित भविष्य गोष्ट घडून येईल तर अमूक कांहीं तरी करण्याबद्दलचे किंवा न करण्याबद्दलचे जे अवलंबी करार ते, त्या गोष्टीचें घडून येणें असंभव होईल तेव्हां अमलांत आणतां येतील, त्या पूर्वी आणतां येणार नाहींत.

कांहीं तरी गोष्ट घडून येण्यावर अवलंबी जे करार ते अमलांत आणणें.

## उदाहरण.

अमकें एक जहाज परत न येईल तर बला अमुक रक्कम देईन अशी अ हा कबुलायत करितो. तें जहाज बुडालें तर जहाज बुडाल्यावर करार अमलांत आणतां येईल.

३४. ज्या भविष्य गोष्टीवर एखादा करार अवलंबी आहे ती गोष्ट कोणी म-

ज्या गोष्टीच्या घडण्यावर करार अवलंबी असेल ती जिवंत मनुष्याचें जें भविष्य वर्तन तद्रूप असल्यास तिचें घडणें अशक्य केव्हां मानावें.

नुष्य अविशेषित काळीं जें अमुक एक कृत्य करणार आहे तद्रूप असेल तर त्या गोष्टीचें घडून येणें हें अशक्य असें तेव्हां मानावें कीं जेव्हां तो मनुष्य असें वर्तन करील कीं, त्याला एकाद्या नियत काळी अथवा पुढें, आणखी कांहीं गोष्टी घडून आल्याशिवाय, तें कृत्य करावयाला अशक्य होईल.

## उदाहरण.

अ हा, बनें कशी लग्न लावलें तर, बला कांहीं पैसा देण्याची कबुलायत करितो.

क हा डशी लग्न करितो. आतां असें जरी शक्य आहे कीं, ड हा मरेल आणि नंतर क कदाचित् बशी लग्न लावील, तरी बचें कशी लग्न लावणें हें अशक्य असें तूर्त मानिलें पाहिजे.

अमुक एक गोष्ट नेमिलेल्या वेळच्या आंत घडून येण्यावर अवलंबी जे करार ते निरर्थक केव्हां होतात.

३५. स्पष्ट करून सांगितली आहे परंतु जिच्या घडण्याविषयीं निश्चय नाहीं अशी गोष्ट नेमलेल्या वेळाचे आंत घडून येईल तर अमुक कांहीं तरी करण्याविषयींचे अथवा न करण्याविषयींचे जे अवलंबी करार, ते, नेमलेल्या वेळाच्या आंत ती गोष्ट घडून आलेली नसेल अथवा जर नेमलेल्या वेळाच्या अगोदर त्या गोष्टीचें घडणें अशक्य होईल तर, निरर्थक होतात.

नेमलेल्या वेळाचे आंत अमुक एक गोष्ट घडून न येण्यावर अवलंबी जे करार ते अमलांत केव्हां आणावें.

स्पष्ट करून सांगितलेली परंतु जिच्या घडण्याविषयीं निश्चय नाहीं अशी गोष्ट नेमलेल्या वेळाच्या आंत घडून न आल्यास अमुक कांहीं तरी करण्याविषयींचे अथवा न करण्याविषयींचे अवलंबी करार, ते, नेमलेली वेळ संपून गेली असतांही ती गोष्ट घडून आली नाहीं असें होईल तेव्हां, अथवा, ती गोष्ट घडून येणार नाहीं असें निश्चित होईल तर, नेमलेली वेळ संपून जाण्याच्या पूर्वीं, कायद्यानें अमलांत आणतां येतील.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा अमुक एक जहाज एक वर्षाचे आंत परत आल्यास बला कांहीं रक्कम देईन असें वचन देतो. तर जहाज वर्षाचे आंत परत आल्यास करार अमलांत आणतां येईल आणि जर तें वर्षाचे आंत जळालें तर तो निरर्थक होईल.

( ब. ) अ हा अमुक एक जहाज एक वर्षाचे आंत परत न येईल तर बला

कांहीं रक्कम देण्याचें वचन देतो. तर जहाज वर्षाचे आंत परत न आल्यास किंवा वर्ष भरण्या पूर्वी जळून गेल्यास करार अमलांत आणतां येईल.

अशक्य गोष्टीवर अवलंबी कबुलायती निरर्थक होत.

३६. जी घडणें अशक्य आहे अशी एकादी गोष्ट घडून येईल तर अमुक कांहीं तरी करण्याविषयींच्या अथवा न करण्याविषयींच्या ज्या अवलंबी कबुलायती त्या निरर्थक होत; मग कबुलायत केली तेव्हां पक्षकारांस त्या गोष्टीच्या घडण्याची अवश्यकता ठाऊक असो किंवा नसो.

## उदाहरणें.

( अ ) अ हा, दोन सरळ रेघांनीं कांहीं जागा सर्वतः वेष्टित होईल तर, बला १००० रुपये देण्याचें कबूल करितो. तर ती कबुलायत निरर्थक होय.

( ब. ) अची मुलगी क इच्याशीं ब लग्न लावील तर बला १००० रुपये देण्याची कबुलायत अ करितो. करार झाल्या वेळीं क मरून गेली होती तर ही कबुलायत निरर्थक होय.

---

# बाब ४.

## करारांच्या पूर्ततेविषयीं.

### पुरे केले पाहिजेत ते करार.

करारांच्या पक्षकारांवरील जवाबदारी.

३७. एकादा करार पुरा करणें हें या आक्टांतील किंवा दुसऱ्या कोणत्याही कायद्यांतील ठरावांअन्वयें जरूर नसेल किंवा त्या विषयीं माफी असेल, तर तेवढें खेरीज करून, कोणत्याही करारांच्या पक्षकारांनीं आपापलीं वचनें पुरीं केलीं पाहिजेत, किंवा पुरीं करितों असें सांगितलें पाहिजे.

वचनें पुरीं करण्यापूर्वीं, वचन देणारे मेले तर त्यांचे वारचे, करारावरून अन्यथा उद्देश दिसून न येईल, तर, त्या करारानें बांधले जातात.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा अमुक दिवशीं बनें १००० रुपये दिल्यावर कांहीं माल बच्या स्वाधीन करण्याविषयीं वचन देतो. त्या दिवसा पूर्वीच अ मरून गेला. तर अच्या वारचांस तो माल बच्या स्वाधीन करणें भाग आहे आणि अच्या वारचांस १००० रुपये देणें बला भाग आहे.

(ब.:) अमुक एक किंमत घेऊन अमुक रोजीं एक तसबीर बला रंगवून देईन असें अ हा वचन देतो. अ नेमलेल्या दिवसापूर्वी मरून जातो. तर तो करार अच्या वारचांला किंवा बला अमलांत आजतां येत नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

निरंतरच्या तबदिलीविरुद्ध शर्त.—ठराव:—स्थावर मिळकतीच्या खरेदीखतांत असलेल्या शर्तींमुळें खरेदी घेणारा व त्याचे वारस यांस सदर मिळकत विकावयाची असल्यास त्यांनीं प्रथम आपला हा मनोदय खरेदी देणारा अगर त्याचे वारस यांस कळवावा अशी निरंतरची जबाबदारी टाकण्यांत आली असून सदर मिळकत अग्रक्रयाधिकारानें घेण्याचा हक्क खरेदी देणारा व त्याचे वारस यांस देण्यांत आला होता. सदरहू शर्त निरंतरच्या तबदिलीविरुद्ध असलेल्या नियमाविरुद्ध असल्यामुळें बेकायदेशीर आहे. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४५ पृ. ४७८; न्या. पु. ५८ अ. दि. नि. पृ. ३७).

३८. वचन देणारानें वचन पुरें करण्यास आपण तयार आहों असें वचन घेणारास सांगितलें आणि त्यानें तें सांगणें स्वीकारलें नाहीं, तर मग वचन पुरें न झाल्याबद्दल वचन देणारावर जबाबदारी नाहीं, परंतु तसें झालें म्हणून त्या करारासंबंधीं जे त्या वचन देणाराचे हक्क ते नाहींसे होत नाहींत.

वचन पुरें करतों असें सांगणें झालें असून तें न पत्करण्याचा परिणाम.

वचन पुरें करण्यास तयार आहे म्हणून जे सांगणें तें खालीं लिहिल्याप्रमाणें असलें पाहिजे:—

१. तें विनशर्तीचें असलें पाहिजे:

२. तें योग्य काळीं व योग्य स्थळीं आणि अशा रीतीनें झालें पाहिजे कीं, ज्यानें तें केलें असेल तो, त्यानें केलेल्या वचनाप्रमाणें कांहीं करणें त्याला भाग असेल तें सर्व करण्यास येथें आणि तात्काळ, शक्तिमान आणि खुषी आहे किंवा नाहीं, हें ठरविण्याची संधी, ज्याला तें सांगणें केलें असेल, त्याला असावी.

३. तें सांगणें जर वचन घेणाराच्या स्वाधीन कांहीं तरी करण्यास तयार असल्या विषयीं असेल, तर जी वस्तु वचन देणारानें आपल्या वचना अन्वयें दिलीच पाहिजे तीच तो आतां देतों म्हणतो आहे कीं नाहीं, हें पाहण्याची योग्य संधी वचन घेणारास मिळाली पाहिजे.

वचन घेणारे अनेक व संयुक्त असले तर त्या सर्वांस सांगणें केल्यास जें कायद्याच्या दृष्टीनें फल यावयाचें तेंच त्यांतून एकाला केल्यापासून होतें.

## उदाहरण.

अ हा अमुक प्रतीचा १०० गठ्ठे कापूस तारीख १ मार्च सन १८७३ रोजीं

बच्या वखारीजवळ बच्या स्वाधीन करण्याचा करार करितो. करार पुरा करतो म्हणून या कलमांत सांगितलें आहे त्याप्रमाणें सांगणें म्हटलें म्हणजे अनें बच्या वखारीजवळ तो कापूस नेमल्या दिवशीं आणला पाहिजे आणि तो अशा रीतीनें, कीं द्यावयाला आणलेला कापूस करार केलेल्या कापसाच्या प्रतीचा असून तो १०० गठ्ठे आहे अशाबद्दल बला आपलें समाधान करून घेण्याची योग्य संधी सांपडली पाहिजे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. या कलमांतील पहिले पारिग्राफांत ' परंतु ' असा जो शब्द आहे त्याचे बदला ' किंवा ' असा शब्द असावा, असें, इंग्रजी आक्टावरून पाहतां, दिसून येतें.

२. वेदावेपत्र तयार न करितां वेदावेपत्र करण्यास आपण तयार आहों असें वेदावेपत्र तयार करण्याची जबाबदारी असणाऱ्या इसमानें नुसतें पोस्टांतून पत्र पाठवून कळविलें असल्यास तेवढ्यामुळें कराराच्या आक्टाचें कलम ३८ मधील ठरावाप्रमाणें त्यानें आपला करार पुरा करण्यास आपण तयार आहों असें कायदेशीर रीतीनें कळविलें होतें असें ह्मणतां येत नाहीं. ( इं. ला. री. स. सी. व्हा. ३८ पृ. ९५८; न्या. पु. ५० म. दि. नि. पृ. ७६ ).

**पक्षकार सारें वचन पुरें करण्यास नाकारील तर काय होईल.**

३९. कराराच्या एखाद्या पक्षकारानें आपलें वचन एकंदर पुरें करण्याचें नाकारिल्यास किंवा आपणास पुरें करतां न यावें असें केल्यास, वचन घेणारानें तो करार चालू आहे असें मानण्यास आपली संमत्ती शब्दांनीं अगर वर्तणुकीनें दाखविली नसेल तर सदर्हू वचन घेणारा त्या कराराला बातल करूं शकेल.

## उदाहरणें.

( अ. ) अ ही कोणीएक गायन करणारी बाई आहे आणि ब हा एका नाटक शाळेचा कारभारी आहे. अनें बशीं असा करार केला कीं, आपण बच्या नाटक शाळेंत येत्या २ महिन्यांत दर आठवड्यास दोन रात्रीं याप्रमाणें गावें, आणि ब अशी बोली करितो कीं, गाईलेल्या दर रात्रीस १०० रुपये अला आपण देईन. सहाव्या रात्रीं अ ही नाटकशाळेंत न येतां मुद्दाम गैरहजर राहिली. तर बला करार बातल करण्याची मोकळीक आहे.

( ब. ) अ ही कोणीएक गायन करणारी बाई आहे आणि ब हा एका नाटकशाळेचा कारभारी आहे. अनें बशीं करार केला कीं, आपण बच्या नाटकशाळेंत येत्या दोन महिन्यांत दर आठवड्यास दोन रात्रीं याप्रमाणें गावें. आणि ब अशी बोली करितो कीं, दर रात्रीस १०० रुपये अला आपण देईन. सहाव्या रात्रीला अ ही मुद्दाम गैरहजर राहते. नंतर अ ही बच्या परवानगीनें सातव्या रात्रीला गाते. तर बनें करार चालू आहे असें मानण्यास आपली

समर्ती दिली असें झालें आणि त्याला बातल करतां येणार नाहीं; परंतु अहीं सहाव्या रात्रीस गाइली नाहीं त्याबद्दल नुकसानी बला भरून मिळाली पाहिजे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. परमुलखांतून माल आणून देणाऱ्या एखाद्या कंपनीनें माल आणून देण्याचें पतकरल्या नंतर ती कंपनी तेथून माल न आणितां येथें विकत घेऊन माल देईल तर त्यांनीं आपला करार पुरा केला असें होणार नाहीं. ( इं. ला. रि. मुं. सी. व्हा. १२ पृ. ५०; न्या. पु. २३ मुं. दि. नि. पृ. २६ ).

२. कर्ज किंवा शिल्लक राहिलेली बाकी परत घेण्यासंबंधीं असलेल्या कायद्यांत कराराच्या आक्टानें फेरफार झालेला नाहीं. ज्या इसमांमध्यें करार झाला असेल त्यांपैकीं एका इसमानें आपला करार पुरा केला नाहीं तर दुसऱ्या इसमास तो करार मोडतां येतो व कराराचा आक्ट कलम ३९ प्रमाणें नुकसानीचा दावा आणतां येतो. तथापि यामुळ वादीचें नुकसान होत असलें तरी वादीनें याच मार्गाचा अवलंब केला पाहिजे असें निष्पन्न होत नाहीं. करारामधील आपला भाग पुरा केल्यामुळें जें कर्ज येणें झालें असेल त्याबद्दल त्या इसमास वाटेल तर दावा करतां येईल. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३४ पृ. १९२; न्या. पु. ४५ मुं. दि नि. पृ. १०७ व १०८ ).

३. **भाडेपट्टा हा संपूर्ण झालेला करार असतो.**—खंडकऱ्यानें खंडानें घेतलेल्या जमिनीसंबंधानें जमिनीच्या मालकास असलेलें एक कर्ज फेडण्याचा करार भाडेपट्यांत करून दिला होता. हें कर्ज खंडकऱ्यानें न फेडल्यामुळें व गहाण घेणारानें जमिनीच्या मालकावर या कर्जाबद्दल दावा लावल्यामुळें जमिनीच्या मालकानें त्रयस्थ इसमांस या जमिनीसंबंधानें एक भोगवट्याचें गहाण करून दिलें व या गहाणावर काढलेल्या रकमेंतून सदहू कर्ज मालकानें फेडलें. नंतर खंडकऱ्यानें जमिनीचा मालक व भोगवट्याचे गहाण घेणार यांजवर खंडानें घेतलेल्या जमिनीचा कबजा मिळण्याकरितां लावलेल्या दाव्यांत भाडेपट्यांतील शर्तीप्रमाणें खंडकऱ्यानें कर्जाची फेड केली नसल्यामुळें त्यास कबजा मिळण्याचा हक्क नाहीं अशी तक्रार भोगवट्याचें गहाण घेणारानें केली.

**ठरावः**—भाडेपट्यांत कबूल केल्याप्रमाणें खंडकऱ्यानें कर्ज फेडलें नसलें तरी भाडेपट्याच्या आधारें कबजा मिळण्याचा हक्क खंडकऱ्यास आहे.

भाडेपट्टा हा संपूर्ण झालेला करार आहे; त्या कराराप्रमाणें मिळकतीची अगर मिळकतीमधील कांहीं हक्कसंबंधाची तवादिली करण्यांत येते; व करार पुरा करण्याचे संबंधांत जी विचारपद्धति लागू पडते ती सर्व तवादिलाच्या संबंधांत लागू पडतेच असें नाहीं. यामुळें कराराच्या आक्टाचें कलम ३९ मध्यें परस्पर दिलेल्या वचनासंबंधानें जो ठराव आहे तो भाडेपट्याचे बाबतींत लागू पडत नाहीं. ( इं. ला. रि. म. सी. व्हा. ४२ पृ. २०३; न्या. पु. ५४ म. दि नि. पृ. १५ व १६ ).

४. **करार कसा संपतो.**—कांहीं मालाच्या खरेदविक्रीसंबंधानें वादीप्रतिवादींच्या दरम्यान करार झाला. कांहीं विवक्षित तारखांस हा माल इंग्लंडहून आल्यानंतर तो हवाला करावयाचा असें करारांत ठरलें होतें. या ठरलेल्या तारखांपूर्वी वादीनें हा सवदा पुरा करण्याचें प्रथम नाकारिलें परंतु हें म्हणणें प्रतिवादीनें त्याचे मान्य केलें नाहीं. परंतु वादी यांच्या म

नोवृत्तींत कांहीं फरक पडत नाहीं असें पाहून वादीनें करार मोडला; या गोष्टीस संमत्ती देण्याचें प्रतिवादीनें ठरविलें व त्यांनीं याप्रमाणें वादीस कळविलें. नंतर वादी हे उलटले व त्यांनीं करारप्रमाणें माल हवालीं करण्याबद्दल आग्रह धरला. याप्रमाणें माल प्रतिवादीनें न दिल्यामुळें वादीनें सध्यांचा नुकसानीचा दावा लावला.

ठराव:—सध्यांच्या कज्यांत वादीनें आपला सर्व करार पुरा करण्याचें स्पष्टपणें व निश्चितपणें नाकबूल केलें होतें; व प्रतिवादी हे करार पुरा करून जोंपर्यंत मागत होते तोंपर्यंत करार मोडला गेला असें म्हणतां येत नव्हतें. परंतु वादी हे बदलत नाहींत असें आढळून आल्यानंतर वादी हे करार पूर्ण करण्यास तयार नाहींत या गोष्टीस संमत्ती देण्याचें ठरऊन प्रतिवादीनें जेव्हां ही गोष्ट वादीस कळविली तेव्हां वादीप्रतिवादींच्या दरम्यान झालेला करार संपला. यामुळें वादीचा दावा रद्द करण्याचा हुकूम योग्य आहे. ( इं. ला. रीं. ला. सी. व्हा. ५ पृ. ४९७; न्या. पु. ५९ ला. दि. नि. पृ. १७ व १८ ).

## करार कोणी पुरे केले पाहिजेत.

वचन कोणत्या मनुष्यानें पुरें करावें.

४०. जर एखाद्या कराराच्या स्वरूपावरून असें दिसून येईल कीं, त्यांत असलेलें वचन खुद्द वचन देणारानें पुरें केलें पाहिजे असा त्या कराराच्या पक्षकारांचा उद्देश होता, तर तें वचन वचन देणारानें पुरें केलें पाहिजे. तसें नसेल तेव्हां वचन देणारा किंवा त्याचे वारचे यांनीं तें पुरें करण्यासाठीं लायक असा एखादा मनुष्य नेमिल्यास चालेल.

### उदाहरणें.

( अ. ) अ हा बला कांहींएक रक्कम देईन असें वचन देतो. अनें तो पैसा बला आपण स्वत: देऊन अथवा दुसऱ्या कोणाहीकडून तरी देववून तें वचन पुरें केल्यास चालेल. आणि पैसा देण्याची नेमलेली वेळ येण्यापूर्वीं अ मरून जाईल, तर त्याच्या वारचांनीं स्वत: किंवा दुसऱ्या एखाद्या योग्य मनुष्या करवीं तें वचन पुरें केलें पाहिजे.

( ब. ) अ हा बला एक तसबीर रंगवून देण्याचें वचन देतो. हें वचन अनें स्वत: पुरें केलें पाहिजे.

### विशेष समजुतीच्या टिपा.

पुत्र दत्तक घेतला असतां, तो अशास्त्र होणार नाहीं, असें समजतां येत नाहीं.

१. हिंदुपैकीं वरिष्ठ ज्ञातीच्या लोकांत पुत्र दत्तक घेण्याचा जो पारलौकीक हेतु असतो तो त्यांच्यापैकींच जे तलवदा कोळी आहेत त्या ज्ञातींत नाहीं, एवढ्यावरून, कोळी ज्ञातीच्या लोकांनीं

तलबदा कोळी ज्ञातीच्या कोणे मनुष्यानें मी आपली सर्व मिळकत तुमच्या मुलास देईन, असें स्पष्ट रीतीनें वचन देऊन त्या मुलाचे आईबापाचें मन तो मुलगा दत्तक देण्याविषयीं वळवील आणि त्याप्रमाणें ती मिळकत त्या मुलास देण्याचें पूर्वी मयत होईल, तर, तें वचन विशेष रीतीनें पुरें करून घेण्याकरितां त्या मयताच्या वारसावर व कायदेशीर वारचांवर फ़िर्याद करण्याचा हक्क

मागें राहील आणि त्याचे विधवेपाशीं जी त्याची मिळकत असेल त्या मिळकतीस तो करार लागू पडेल, असा ठराव झाला.

आणि याजकरितां तो मयत झाल्यानंतर त्याचे विधवेनें ३० वर्षांनीं तो करार त्या मुलास आपले जवळील मिळकत देण्याविषयीं बक्षिसपत्र करून देऊन पुरा केला तर, तें तिचें करणें तिच्या नवऱ्याच्या दुसरे रक्तसंबंधाविरुद्ध कायदेशीर होईल, आणि तिचे मरणानंतर त्या रक्तसंबंधी मनुष्यांस खुद्द तिनें मुदतीची हरकत न घेतां जी देणगी दिलेली आहे त्या देणगीस मुदतीच्या कारणावरून हरकत सांगतां येणार नाहीं असा ठराव झाला. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २ पृ. ६७; न्या. पु. १३ मुं. दि. नि. पृ. २१ ).

२. सोअरवाय आणि कंपनी या नांवाच्या पेढींतील भागीदार उइलियम सोअरवाय आणि फ्रामजी एदलजी असे होते. त्या पेढीनें खडकी येथील दारूच्या कारखान्यांत व्हारलहौस बांधण्याचा मक्ता सरकारापासून ता. १२ नोवेंबर सन १८७७ रोजीं घेतला आणि त्या मक्त्याचें काम त्या पेढीस चालवितां येण्यासाठीं वादीनें त्यांस रुपये १५ हजारपर्यंत देण्याचा ता. २८ नोवेंबर सन १८७७ रोजीं त्यांजबरोबर करार केला. त्या करारनाम्यांतील शर्तीवरून, मक्तेदारांच्या बिलांवरून सरकारांतून ज्या कांहीं रकमा घेणें होतील त्या सर्व वादीनें घ्याव्या आणि त्यांतून आपण दिलेल्या रकमांची व्याजसुद्धां फेड करून घेऊन जी बाकी राहील ती वादी यानें त्या पेढीस द्यावी. त्या मक्त्याअन्वयें ज्या कांहीं रकमा त्या पेढीच्या सरकारी इन्जिनियराकडून घेणें होतील त्या सर्व रकमा घेण्याचा वादी यास अधिकार देऊन त्याच दिवशीं त्या पेढीनें वादी यास मुखत्यारपत्र लिहून दिलें. तें मुखत्यारपत्र वादी यानें पुणें येथील एक्झिक्युटिव इन्जिनियरच्या कचेरींत अनामत ठेवून दिलें होतें. सन १८७८ च्या मार्च किंवा एप्रिल महिन्यांत सोअरवाय इंग्लंडास गेला व त्या तारखेपर्यंत वादी यानें त्या पेढीस रक्कम रुपये ३४९०० दिले होते व एक्झिक्युटिव इंजिनियराकडून बिलाबद्दल आलेल्या रकमा वजा जातां वादी यास रक्कम रुपये १४९४२८।८।१० त्या पेढीपासून घेणें होतें. पूर्वींच्या करारांतील शर्तीवरच वादी यानें फ्रामजी एदलजी याजबरोबर पूर्वींच्या १५ हजार रुपयांशिवाय आणखी १६००० रुपयेपर्यंत जास्त देण्याबद्दल ता. २४ जुलै सन १८७८ रोजीं नवीन करार केला व त्याप्रमाणें वादी यानें मदत केल्यामुळें सन १८७९ चे अखेरीस त्या मक्त्याचें काम पुरें झालें. सन १८७८ सालीं प्रतिवादी यानें सोअरवाय याजवर एक हुकुमनामा मिळविला आणि त्या हुकुमनाम्याचे बजावणींत, त्यावेळेस सदर्हू मक्त्याचे संबंधानें जी रुपये ५०३४८।११८।९ ची रक्कम घेणें होती त्या रकमेंतील सोअरवाय याचा हक्क, दावा व संबंध यांची जप्ती करविली. वादी याची त्या पेढीकडे रक्कम रुपये १३७००।८।११ बाकी येणें असल्यामुळें त्यानें ती जप्ती दूर करावी म्हणून अर्ज केला, परंतु त्याचा तो अर्ज ता. ३० सप्टेंबर सन १८७९ रोजीं नाकबूल होऊन ती रक्कम प्रतिवादी यास देण्यांत आली. ती रुपये ५०३४८।११८।९ ची रक्कम प्रतिवादीपासून घेण्याकरितां वादीनें दावा केला. त्यांत ठराव झाला तोः—

ठरावः—वादी हा जरी अविभक्त समाईक हिंदु कुटुंबांतील एक मनुष्य आहे तरी त्या पेढीनें त्याजबरोबर तो करार त्याचे स्वतःचे संबंधानें केला होता व वादी यानें आपल्या कुटुंबाचे फायद्याकरितां तो करार केला होता असें ज्यापेक्षां त्या करारावरून दिसून येत नाहीं त्यापेक्षां वादी याला एकट्याला हा दावा करण्याचा हक्क आहे.

आणखी असाही ठराव झाला कीं, ता. २८ नोवेंबर सन १८७७ रोजचा करारनामा झाला त्याच दिवशीं त्या पेढीनें वादी यास मुखत्यारपत्र लिहून दिलें होतें. या दोन्हीं गोष्टी एकत्र

घेऊन पाहिलें म्हणजे सोअरवाय आणि कंपनी यांस एक्झिक्युटिव इंजिनीयर यांजकडून विलाबद्दल ज्या रकमा घेणें होतील त्या सर्व रकमा त्यांनीं वादी यास योग्य रीतीनें लावून दिल्या होत्या असें होतें.

आणखी असाही ठराव झाला कीं, सोअरवाय आणि कंपनी या दुकानच्या एका भागिदारानें जरी तो नंतरचा वादीशीं करारनामा केला होता तरी कज्जांतील हकीगतीवरून पाहतां, त्या भागिदारीचें काम चालविण्यास तसा करार करणें त्या भागिदारास अवश्य होतें आणि त्या पेढीच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणेंच तो करारनामा होता आणि याजकरितां त्या पेढीला तो मान्य करणें भाग आहे, आणि वादीनें जे त्यास कर्जाऊ पैसे दिले होते त्यांची व्याजसुद्धां फेड करण्यासाठीं त्या पेढीनें, सदहू मक्त्याच्या विलाबद्दल ज्या रकमा येतील त्या सर्व तारण लावून दिल्या होत्या असें ते दोन्हीं करारनामे आणि मुखत्यारपत्र यांजवरून होत आहे; सबब, वादी यानें मागितलेली रकम प्रतिवादीपासून घेण्याचा वादीस हक्क आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ९ पृ. ३११; न्या. पु. २० मुं. दि. नि. पृ. १४३).

तिऱ्हाइताकडून पुरें करून घेण्याला एक वेळ कबूल केल्यास त्याचा परिणाम.

**४१.** तिऱ्हाइत मनुष्या करवीं वचन पुरें करून घेण्यास वचन घेणारानें कबूल केलें असेल तर तें वचन वचन देणारानें पुरें करून द्यावें असें तो मागाहून मागणें करूं शकणार नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

करार ज्या इसमावर बंधक होता त्यापेक्षां अन्य इसमानें जेथें करार प्रत्यक्ष पुरा केला असेल तेथेंच कलम ४१ लागू पडतें. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ३९ पृ. १७८; न्या. पु. ५२ अ. दि. नि. पृ. १५).

संयुक्त जबाबदारी कोणावर कशी पडते.

**४२.** जर दोन अगर अधिक मनुष्यांनीं मिळून एकादें संयुक्त वचन दिलें असेल तर करारावरून अन्यथा उद्देश दिसून येत नसल्यास, ते सर्व जिवंत आहेत तोंपर्यंत त्या सर्वांनीं, आणि त्यांतून कोणताही एकादा मेल्यावर त्या मयताचे वारचे व बाकी जिवंत राहिलेला अथवा राहिलेले जे त्यांनीं मिळून आणि, बाकी कोणी जिवंत राहिले नाहींत असें झाल्यावर, सर्वांच्या वारचांनीं मिळून, तें वचन पुरें केलें पाहिजे.

संयुक्त वचन देणारांपैकीं कोणतीही एकानें पुरें करावें असें करितां येईल.

**४३.** जर दोन अगर अधिक मनुष्यांनीं मिळून एकादें संयुक्त वचन दिलें असेल, तर, अन्यथा स्पष्ट कबुलायत नसल्यास, संयुक्त वचन देणारांपैकीं कोणत्याही एका अगर अनेक मनुष्यांनीं एकंदर वचन पुरें करावें असें, वचन घेणारा भाग पाडूं शकेल. (हा प्यारा सन १८९१ चा आक्ट १२ परिशिष्ट २ वरून दुरुस्त केला आहे).

करारावरून अन्यथा उद्देश दिसून येत नसल्यास, दोन अथवा अधिक

प्रत्येक वचन देणारा वर्गणीचें मागणें करूं शकेल.

संयुक्त वचन देणारांतून प्रत्येकास असें मागणें करण्याचा हक्क आहे कीं, वचन पुरें करण्याकरितां तो स्वतः जी वर्गणी देत असेल त्याच मानानें दुसऱ्या सर्व संयुक्त वचन देणारांनीं द्यावें.

एकाद्यानें वर्गणी न दिल्यास तोटा सारखे भाग करून सोसणें.

दोन किंवा अधिक संयुक्त वचन देणारांपैकीं कोणीही एकानें तशी वर्गणी न दिल्यास त्यापासून जो तोटा होईल तो उरलेल्या संयुक्त वचन देणारांनीं सारखे भाग करून सोसला पाहिजे.

**खुलासा.**—मालक तर्फेनें जामिनानें ज्या रकमा भरल्या असतील त्या, जामीन मालकाकडून उगवूं लागल्यास त्याला या कलमांतील कोणत्याही मजकुरानें हरकत येणार नाहीं, अथवा मालकानें ज्या रकमा भरल्या असतील त्या ऐवजीं जामिनाकडून कांहींही उगविण्याचा हक्क या कलमांतील कोणत्याही मजकुरानें मालकास येणार नाहीं.

## उदाहरणें.

(अ.) अ, ब आणि क हे डला ३,००० रुपये देण्याचें संयुक्त वचन देतात. तर ड हा अनें किंवा बनें किंवा कनें ३,००० रुपये आपणास (डला) द्यावे असें भाग पाडूं शकेल.

(ब.) अ, ब आणि क हे डला ३,००० रुपये देण्याचें संयुक्त वचन देतात. कला सगळे रुपये देणें भाग पडलें आहे. अ नादार झाला आहे, परंतु त्याची जिंदगी त्या निम्मे कर्ज फेडण्या इतकी आहे. तर कला अच्या जिंदगींतून ५०० रुपये आणि ब कडून १,२५० रुपये घेण्याचा हक्क आहे.

(क.) अ, ब आणि क यांनीं डला ३,००० रुपये देण्याचें संयुक्त वचन दिलें आहे. क हा रक्कम देण्याला अगदीं असमर्थ आहे. तर अला ब कडून १,५०० रुपये घेण्याचा हक्क आहे.

(ड.) अ, ब आणि क यांनीं डला ३,००० रुपये देण्याचें संयुक्त वचन दिलें आहे. अ आणि ब हे कला जामीन आहेत आणि क यानें रुपये फेडले नाहींत. अ आणि ब यांना सगळी रक्कम भरावी लागली तर त्याला ती कपासून उगवून घेण्याचा हक्क आहे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. **समाईक कुळांपैकीं एक मयत झाल्यास वारसांवरील जबाबदारी.**—अनेक समाईक कुळांपैकीं एकावर भाडें देण्याची जबाबदारी असल्यास अशा कुळांपैकीं एखादें कूळ मयत होऊन त्याचे पश्चांत त्याचे अनेक वारस हयात असतील तर वारसांवर येणारी जबाबदारी ही जतीमतीची आहे अगर स्वतंत्रपणें प्रत्येकावर आहे हा प्रश्न उत्पन्न होणें संभवनीय नसतें; कारण,

एका समाईक कुळास जे हक्क व ज्या जबाबदाऱ्या होत्या त्या सर्व कायद्याप्रमाणें अनेक हिस्सेदारांकडे येतात व हे सर्व हिस्सेदार मिळून कायद्याप्रमाणें एक वारस होत असतो. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ५० पृ. ७३७; न्या. पु. ५८ क. दि. नि पृ. १८ ).

२. ठरावः—ठरलेला खंड देऊन जमीन वहाणाऱ्या कुळांवर खंड देण्याची पात्रता फक्त समाईक नसून शिवाय प्रत्येकावर निरनिराळी असते. यामुळें, वादीनें ठरलेला खंड देऊन जमीन वहाणाऱ्या अनेक कुळांवर आणलेल्या दाव्यांत, एका मयत प्रतिवादीचे सर्व वारस वादीनें दाखल केले नाहींत येवढ्यामुळें बाकीच्या प्रतिवादींवर दावा चालण्यास हरकत येत नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३४ पृ. ६०४; न्या. पु. ४७ अ. दि. नि. पृ. ४८ ).

३. दुकानच्या येण्याबद्दल एका भागिदारावर दावा.—जी. एस. हा युनियन ब्यांक आफ इंडियाचा एक भाग धारण करणारा होता. आर. आर. डी. आर. या नांवाच्या दुकानांत हाच जी. एस. एक भागीदार होता. आर. आर. डी. आर. या दुकानास ब्यांकेनें प्रामिसरी नोटांवरून कांहीं रकमा कर्जाऊ दिल्या होत्या. या प्रामिसरी नोटांवर जी. एसच्या सह्या असून त्यांस रक्कम मिळाली होती. ब्यांक आपखुषीनें निकालांत निघाल्यानंतर लिक्विडेटरनें जी. एस. यांजवर भाग धारण करणारा या नात्यानें भागाची भरावयाची शिल्लक राहिलेली रक्कम व प्रामिसरी नोटांवरून येणें असलेली रक्कम यांजबद्दल मागणें केलें. लिक्विडेटर व आर. आर. डी. आर. या नांवाचें दुकान यांचे दरम्यान आपसांत तडजोड झाली आहे व जी. एस. हा सदर दुकानचा एक भागीदार असून त्यानें या नात्यानें रक्कम कर्जाऊ घेतली असल्यामुळें निदान कंपनीज आक्टाचें कलम १८६ मध्यें दिलेल्या संक्षिप्त मार्गानें ही रक्कम वसूल करितां येणार नाहीं अशी जी. एसनें तक्रार केली.

ठरावः—कराराच्या आक्टाचें कलम ४३ मध्यें घालून दिलेलें तत्व सध्यांच्या प्रश्नांत लागू पडतें आणि यामुळें रिणको दुकानचा एक भागीदार जी. एस. यांस पसंत करून भागाची रक्कम भरण्याची जबाबदारी असलेला इसम या नात्यानें सर्व रक्कम देऊन टाकण्याबद्दल जी. एस. यांजजवळ मागणें करण्याचा व कंपनीच्या आक्टाचें कलम १८६ मध्यें ठरविलेल्या संक्षिप्त मार्गानें ही रक्कम वसूल करण्याचा अधिकार लिक्विडेटरला आहे. ( इं. ला. री. ला. सी. व्हा. ४ पृ. २३९; न्या. पु. ५८ ला. दि. नि. पृ. १४ ).

४. अज्ञान व सज्ञान खरेदीदार यांचा संयुक्त व्यवहार.—वादीनें एक घर एस. डी. व एस. आर यांस रु. ३१०० ला खरेदी दिलें. या रुपयांपैकीं रु. १०० विसारादाखल घेतले असून रु. १००० पूर्वीच्या गहाण घेणारास द्यावयाचे होते व हा रु. २००० खरेदीचा कागद नोंदतेवेळीं द्यावयाचें होते. खरेदी घेणारानें दस्तऐवज नोंदून घेण्याचें नाकारिलें. खरेदी घेणारानें दस्तऐवज नोंदून घेतला व दोन्हीं खरेदी घेणारावर खरेदीची रक्कम मिळण्याकरतां सध्यांचा दावा लावला.

ठरावः—प्रत्येक खरेदी घेणाराचा हिस्सा काय आहे हें नमूद करण्यांत आलें असलें तरी खरेदीच्या रकमेपैकीं प्रत्येक खरेदी घेणारानें किती रक्कम द्यावयाची हें नमूद करण्यांत आलें नसलेमुळें सदर व्यवहार हा संयुक्त व्यवहार होत आहे. सदर व्यवहार हा अज्ञान खरेदी घेणाराविरुद्ध बेकायदेशीर होत असला तरीं कराराच्या आक्टाचें कलम ४३ प्रमाणें सज्ञान खरेदी घेणाराविरुद्ध सदर व्यवहार अमलांत आणतां येईल. ( इं. ला. री. ला. सी. व्हा. ४ पृ. २३४; न्या. पु. ५८ ला. दि. नि. पृ. २३ ).

५. दोहोंपैकीं एकावरच दावा लावणें.—हातचिठ्ठी लिहून देणाऱ्या दोन इसमांपैकीं एका इसमावर लावलेला दावा हा दुसऱ्या इसमास पक्षकार न केल्यामुळें बेकायदेशीर होत नाहीं. ( इं. ला. री. पा. सी. व्हा. २ पृ. ४६६; न्या. पु. ५८ पा. दि. नि. पृ. २० ).

एक संयुक्त करारदार मोकळा केल्यास त्याचा परिणाम.

४४. जर दोन अथवा अधिक मनुष्यांनीं संयुक्त वचन दिलें असेल आणि तशा संयुक्त वचन देणारांपैकीं एकाची मोकळीक वचन घेणारानें केली, तर उरलेला संयुक्त वचन देणारा किंवा वचन देणारे त्यामुळें जबाबदारीपासून मुक्त होतात असें नाहीं; आणि सदर्हू प्रमाणें मुक्त केलेल्या संयुक्त वचन देणाराची उरलेल्या संयुक्त वचन देणाराला अथवा संयुक्त वचन देणारांना जी जबाबदारी तिजपासून तो त्यामुळें मुक्त होतो असें नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. चौ. ज. सँडरसनः—अनेक संयुक्त गहाण देणारांपैकीं एका गहाण देणारास सोडून दिलें असेल व दुसऱ्या गहाण देणारांविरुद्ध गहाण घेणारास असलेले हक्क कायम ठेवण्यासंबंधानें स्पष्ट करार झाला नसेल तर तेवढ्यामुळें बाकीचे गहाण देणारे आपोआप आपल्या जबाबदारीमधून मुक्त होतात असें नाहीं. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४४ पृ. १६२; न्या. पु. ५२ क. दि. नि. पृ. ७ ).

२. हुकुमनामेवाल्यानें फैसल्यांतील अनेक रिणकोंपैकीं कांहीं रिणकोंस सोडून देऊन त्यावर हुकुमनाम्याअन्वयें असलेल्या पात्रतेंतून त्यांस मुक्त केलें तर त्यामुळें बाकीच्या फैसल्यांतील रिणकोंवर हुकुमनाम्याअन्वयें येणारी पात्रता नष्ट होत नाहीं.

सह-करार करणाराच्या पात्रतेसंबंधानें इंग्लंडांतील कायद्यांत जो नियम आहे त्याच्या आधारें इंग्लंडांतील कायद्यांतील नियम घालून दिलेला आहे. हिंदुस्थानच्या कराराच्या आक्टाचे कलम ४४ मध्यें इंग्लंडांतील नियमांपेक्षां भिन्न असा नियम घालून दिला आहे. इंग्लंडांतील नियम न्याय, न्यायतत्वें व योग्य सदसद्विचार यांस अनुसरून नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३९ पृ. ५४८; न्या. पु. ५१ म. दि. नि. पृ. २९ ).

संयुक्त हक्क कसे उतरतात.

४५. जेव्हां एकाद्या मनुष्यानें दोन अथवा अधिक मनुष्यांस मिळून कांहीं वचन दिलें असेल, तेव्हां, करारावरून अन्यथा उद्देश दिसून येत नसल्यास, वचन पुरें करावें असें मागणें करण्याचा हक्क, तो आणि ते त्यांच्यामधील संबंधानें पाहिलें असतां, ते सर्व जिवंत आहेत तोंपर्यंत, त्यांचा आहे, आणि, त्यांतून कोणी एकदां मेल्यानंतर, मयताचे वारचे आणि जिवंत उरलेला अथवा जिवंत उरलेले जे असतील त्या सर्वांचा मिळून आहे, आणि कोणी जिवंत उरला नाहीं असें झाल्यावर, सर्वांचे जे वारचे त्यांचा मिळून आहे.

## उदाहरण.

अ ला ब आणि क यांनीं ५,००० रुपये कर्जाऊ दिले आहेत त्याबद्दल अ हा ब आणि क या दोघांस मिळून असें वचन देतो कीं, तो पैसा व्याजासहित

अमूक एका नेमलेल्या दिवशीं तुमचा फेडींन. इतक्यां व मरून जातो. तर वचन पुरें करावें असे सागण्याचा हक्क क जिवंत असे पर्यंत बचा वारचा आणि क यांचा मिळून आहे, आणि क मेल्यावर, ब आणि क यांचे जे वारचे त्यांचा मिळून आहे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. ( १ ) सन १८७२ च्या हिंदुस्थानच्या कराराच्या आक्टाचें कलम ४५ यांत कसाही मजकूर असला तथापि, जेव्हां, सदरील ठरावा अन्वयें दोन किंवा अधिक असामींस किंवा असामींवर एकाद्या पेढीच्या नांवानें दावा करतां येत नसून अशा असामींपैकीं कोणताही असामी दावा करण्याचेपूर्वी किंवा दावा चालू असतां मरण पावेल, तेव्हां मयताच्या कायदेशीर वारचे असामींस त्या दाव्यांत पक्षकार म्हणून सामील करणें जरूर पडणार नाहीं.

( २ ) पोट-कलम ( १ ) यांतल्या कोणत्याही मजकुरावरून, मयताच्या कायदेशीर वारचे असामीस,—

( अ. ) आपणांस, दाव्यांत पक्षकार म्हणून सामील करविण्याबद्दल अर्ज करण्याचा, किंवा

( ब. ) मयताच्या मार्गे जिवंत राहिलेल्या एक किंवा अधिक मनुष्यांवर कोणत्याही मागणीची अम्मलबजावणी करण्याचा,

जो कोणताही हक्क असेल तो मर्यादित होतो अगर त्यास इतर प्रकारें बाध येतो असें समजूं नयें. ( सि. प्रो. कोड [ सन १९०८ चा ५ ] आ. ३० का. ४ ).

२. मुंबईचा शहर म्युनिसिपालिटीबाबद आक्ट कलम ११० ब.—

( १ ) सन १८७२ चा हिंदुस्थानचा करारावाबद आक्ट कलम ४५ यांत कांहींही ठराव असला तथापि, या आक्टाअन्वयें किंवा शहराच्या म्युनिसिपालिटीसंबंधानें पूर्वी झालेल्या एखाद्या आक्टाअन्वयें काढलेले एखादें डिबेंचर दोन किंवा अधिक इसमांस मिळून देणें होत असेल आणि त्या दोघांपैकीं एक किंवा त्यांपैकीं कोणी एखादा मयत होईल तर, सदर इसमाचे मार्गे जो अगर जे कोणी जिवंत असतील त्याला किंवा त्यांना त्या डिबेंचरची रक्कम देणें प्राप्त होईल.

( २ ) परंतु, त्या मयत इसमाच्या वारच्या इसमास, त्या मार्गे जिवंत राहणारे एका अगर अधिक इसमांवर व मयतावर मिळून त्या डिबेंचरासंबंधानें जो विरुद्ध हक्क असेल त्यास या कलमांतील ठरावामुळें बाध येणार नाहीं.

मुंबई शहर म्युनिसिपालिटीबाबद आक्ट कलम ११० क.—

सन १८७२ चा हिंदुस्थानचा करारावाबद आक्ट कलम ४५ यांत कांहींही ठरविलें असलें तथापि, या आक्टाअन्वयें किंवा शहरचे म्युनिसिपालिटीसंबंधानें पूर्वी झालेल्या एखाद्या आक्टाअन्वयें काढलेले एखादें डिबेंचर दोन अगर अधिक इसम समाईक रीतीनें धारण करीत असतील तर, त्या धारण करणारांपैकीं दुसऱ्या कोणी कमिशनरास उलट अर्थाची नोटीस दिली नसेल तर, अशा धारण करणारे इसमांपैकीं कोणाही एकाला अशा डिबेंचरासंबंधाचें येणें असलेलें व्याज किंवा नफा घेण्याचा व त्याबद्दल कायदेशीर पावती देण्याचा हक्क पोहोंचतो ( सन १९१० चा मुंबई आक्ट १ परिशिष्ट १ भाग ३ ).

३. **मुंबई पोर्ट ट्रस्ट आक्ट कलम ५८ अ.—**

(१) सन १८७२ चा हिंदुस्थानचा करारांविषयीं आक्ट, याच्या ४५ व्या कलमांत कोणताहीं ठराव असला तरी, ह्या आक्टाच्या ठरावाअन्वयें काढलेल्या कोणत्याहीं डिबेंचराची अगर सिक्युरिटीची रक्कम दोन अगर अधिक मनुष्यांस सामायिक रीतीनें द्यावयाची असेल आणि त्या दोघांपैकीं एक किंवा त्यांपैकीं कोणी मरण पावेल, तर त्या डिबेंचराची अगर सिक्युरिटीची रक्कम त्यांपैकीं ह्यात राहिलेल्या मनुष्यास अगर मनुष्यांस देणें होईल.

(२) अशा मयताच्या वारच्याचा, ह्यां ह्यात राहिलेल्या मनुष्यावर अगर मनुष्यांवर, त्याला अगर त्यांना व त्या मयताला सामायिक रीतीनें देणें असलेल्या त्या डिबेंचराच्या अगर सिक्युरीटीच्या रकमेसंबंधानें जो दावा असेल त्यास ह्यांतील कोणत्याही ठरावावरून बाध येणार नाहीं.

(३) सदहू डिबेंचराची अगर सिक्युरिटीची रक्कम ज्या मनुष्यास सामायिक रीतीनें द्यावयाची असेल त्या मनुष्याचा मृत्यु हा आक्ट अमलांत येण्याच्या आधीं घडून आला किंवा नंतर घडून आला तरी हें कलम लागू होईल असें समजावें. (सन १९१३ चा मुंबई आक्ट १ [ पोर्ट ट्रस्ट आक्ट सुधारण्याचा ] कलम २२ ).

**मुंबई पोर्ट ट्रस्ट आक्ट कलम ५८ ब.—**

सन १८७२ चा हिंदुस्थानचा करारावाबद आक्ट कलम ४५ यांत कांहींही ठरविलें असलें तथापि, या आक्टाअन्वयें काढलेलें एखादें डिबेंचर किंवा सिक्युरिटी दोन अगर अधिक इसम सामायिक रीतीनें धारण करीत असतील तर, त्या धारण करणारांपैकीं दुसऱ्या कोणी बोर्डास उलट अर्थाची नोटीस दिली नसेल तर, अशा धारण करणारे इसमांपैकीं कोणाही एकाला अशा डिबेंचरासंबंधाचें येणें असलेलें व्याज किंवा नफा घेण्याचा व त्याबद्दल पक्की पावती देण्याचा अधिकार आहे. (सन १९१३ चा मुंबई आक्ट १ [ पोर्ट ट्रस्ट आक्ट सुधारण्याचा ] कलम २२ ).

४. सरकतीच्या व्यवहारांतील एखादा भागीदार जिवंत असतांना जें कर्ज घेणें त्या पेढीला येणें झालें असेल तें घेण्यासाठीं, तो भागीदार मयत झाल्यावर दुसऱ्या भागिदारांनीं दावा केला असेल तर त्या दाव्यांत त्या मयत भागिदाराच्या वारचांस पक्षकार करणें अवश्य असतें असें नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १७ पृ. ६; न्या. पु. २८ मुं. दि. नि. पृ. २ ).

५. सरकतीनें व्यापार करणाऱ्या भागिदारांपैकीं एकादा भागीदार मयत झाल्यावर दुसरा भागीदार त्या व्यापाराचें काम पुढें चालवीत असला तरी त्या मयत भागिदाराचे वारचे इसमास त्या व्यापाराचे संबंधानें दुसरे लोकांकडून यावयाचीं कर्जे घेणीं वसूल करण्यासाठीं दावा करण्याचा हक्क पोंचतो. मग, राहिलेल्या भागिदाराचे हातीं त्या भागिदारीची असलेली जायदाद, त्या मयत भागिदाराचे तर्फे केलेल्या सर्व मागण्यांची फेड करण्यास पुरेशी असली आणि तो मागें जिवंत राहिलेला भागीदार तशी फेड करण्यास तयार असला आणि मयत भागिदाराचे वारचे इसमानें आणलेला दावा त्यास पसंत नसला व त्या दाव्यांत सामील होण्यास तो नाकबूल असला तथापि हरकत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २१ पृ. ४१२; न्या. पु. ३२ मुं. दि. नि. पृ. १९७ ).

६. **कलम ४५ कोठें लागू पडत नाहीं.—ठरावः—**व्यापार करणाऱ्या भागीदारचें जें येणें असतें त्याबाबद कराराच्या आक्टाचें कलम ४५ लागू पडत नाहीं; व भागीदारीच्या येण्या-

बद्दल लावलेल्या दाव्यांत हयात असलेल्या भागीदारास मयत भागीदाराच्या वारच्या असामींची नांवें दाव्यांत दाखल करणें अवश्यक नसतें. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४ पृ. १४२; न्या. पु. ५८ मुं. दि. नि. पृ. ८).

## पुरें करण्याची वेळ आणि ठिकाण.

वेळ नेमिली नाहीं आणि पूर्वी विनंती करावयाची नाहीं तेव्हां वचन केव्हां पुरें करावें.

**४६.** पुरें करावें म्हणून विनंती वचन घेणाराकडून न होतां वचन देणारानें वचन पुरें करावयाचें असें जेव्हां करारांत असेल, आणि वचन पुरें करण्याकरितां करारांत वेळ नेमिली नसेल तेव्हां वचन योग्य काळाचे आंत पुरें झालें पाहिजे.

**खुलासा.**—'योग्य काळ म्हणजे काय' ही प्रत्येक विशेष प्रसंगीं एक गोष्ट समजून तिजविषयीं ठराव केला पाहिजे.

## विशेप समजुतीची टीप.

**मुदत ही करारांतील अवश्य भाग करण्याचा वादीचा अधिकार.**—ता. २ आक्टोबर सन १९१९ रोजीं प्रतिवादीनें आपलें घर वादीस विकण्याचा करार केला व विसाराची रक्कम घेतली. सहा महिन्यांत विक्री पूर्ण करून देण्याचें व कोणतीही योग्य शंका न राहील अशा रीतीनें खरेदी देतां येण्यासारखे मालकीहक्कसंबंध आपणांस आहेत असें दाखऊन देण्याचें प्रतिवादीनें कबूल केलें होतें. खरेदी घेणारा अगर त्याचे अटर्नी यांस खरेदीखत करून देण्यांत जे इसम सामील होणें अवश्य आहे असें वाटेल अशा सर्व इसमास खरेदीखतांत खरेदी देणारे या नात्यानें सामील करून देण्याचें प्रतिवादीनें कबूल केलें होतें. कराराच्या वेळीं सदर मिळकत एका हिंदू कुटुंबाची असून त्यांत चार हिस्सेदार भाऊ होते. प्रतिवादी, नरोत्तम व दुसरे दोन असे अज्ञान होते. वादीस प्रथम या गोष्टीची खबर नव्हती, परंतु त्यांस ही गोष्ट कळल्यानंतर त्यानें अवश्य असलेल्या सर्व इसमांची खरेदीखतास संमत्ती मिळविण्याबद्दल व अज्ञानांचे हिस्से खरेदी देण्याचा अधिकार देण्याबद्दल कोर्टाचा हुकूम मिळविण्याबद्दल वादीनें प्रतिवादीस सांगितलें. परंतु हा हुकूम प्रतिवादीनें मिळविला नाहीं व ठरलेल्या मुदतींत विक्री पुरी केली नाहीं. यानंतर वादीप्रतिवादींच्या दरम्यान पत्रव्यवहार सुरूं होऊन चार दिवसांत खरेदीचा व्यवहार पुरा करण्याबद्दल वादीनें ता. २२ जून सन १९२० रोजीं प्रतिवादीस पत्र लिहिलें. ता. २८ जून सन १९२० रोजीं खरेदीचा व्यवहार सात दिवसांत पुरा करण्याबद्दल वादीनें प्रतिवादीस पुन्हां पत्र लिहिलें व या पत्रीं सदर मुदत ही करारांतील एक अवश्य भाग आहे असें वादीनें प्रतिवादीस कळविलें. प्रतिवादीनें अद्यापीही या बाबतींत जीं कामें करावयास पाहिजे होतीं तीं केलीं नाहींत. ता. २२ नोव्हेंबर सन १९२० रोजीं वादीनें करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्याकरितां सध्यांचा दावा लावला. विसारादाखल दिलेली रक्कम परत मिळावी; मालकी हक्काबद्दल चौकशी करण्याकरितां लागलेला खर्च व नुकसानीदाखल रुपये ४०,००० अशा दादी वैकल्पिक म्हणून वादीनें मागितल्या असून शिवाय करार रद्द करण्याबद्दल, विसारादाखल दिलेली रक्कम परत मिळण्याबद्दल, दाखल दिलेली रक्कम परत मिळण्याबद्दल व नुकसानभरपाई मिळण्याबद्दलच्याही दादी वैकल्पिक रीतीनें वादीनें मागितल्या होत्या. दावा चालू असतां मिळकतीची किंमत कमी झाली, झालेला व्यवहार पुरा करण्यास प्रतिवादी हा उद्युक्त झाला. अज्ञानाच्या हितसंबंधाची विक्री करण्याबद्दलचा अ-

वश्य तो हुकूम त्यानें नंतर कोर्टाकडून मिळविला; व विक्री पुरी करण्यास आपण तयार आहों असें कळविलें. दाव्याच्या चौकशीच्या वेळीं करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्यावद्दलचें आपले मागणें वादीनें सोडून दिलें; व नं. १ च्या वैकल्पिक दादी मागितल्या होत्या त्यांवद्दलचा दावा विशेष जोरानें वादीनें कोर्टासमोर मांडला.

ठरावः—( १ ) जो मालकीहक्क खरेदी देण्याचा प्रतिवादीनें करार केला होता तो मालकीहक्क आपणांस आहे हें प्रतिवादी हा दाखऊं शकलेला नाहीं, व ही गोष्ट कराराच्या अगदीं मुळाशीं गेलेली आहे.

( २ ) मुदत ही करारांतील एक अवश्य भाग नसल्यामुळें करार पुरा करण्यास कराराच्या आक्टाचें कलम ४६ मधील अर्थाप्रमाणें मुदत ठरलेली नव्हती असें समजलें पाहिजे. अशा स्थळीं करार पुरा करण्यास योग्य मुदत कोणती हें करार करणाऱ्या पक्षांचें वर्तन व प्रत्येक करारांतील हकीगत यांजवरून ठरविलें पाहिजे.

घडलेल्या गोष्टींवरून पुढील ठराव करण्यांत आलाः

ठरावः—मुदत ही करारांतील एक अवश्य भाग करण्याचा वादीस अधिकार आहे व त्याप्रमाणें वादीनें मुदत हा एक कराराचा अवश्य भाग केला होता. प्रस्तुतच्या कज्जांत जी हकीगत दिसून येत आहे त्यावरून वादीनें विक्रीचा करार पुरा करण्याकरितां ठरविलेली सात दिवसांची मुदत योग्य होती. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४८ पृ. २५९; न्या. पु. ५९ मुं. दि. नि. पृ. १४ व १५ ).

**४७.** जेव्हां वचन नेमलेल्या दिवशीं पुरें करावयाचें आहे आणि वचन घेणाराची विनंती आल्याशिवाय पुरें करतो असा वचन देणारानें पतकर घेतला असेल, तेव्हां तें त्या दिवशीं, उद्योग करण्याचें जे साधारण तास त्यांतून कोणत्याही वेळीं, आणि ज्या ठिकाणीं तें वचन पुरें करावयाचें आहे त्या ठिकाणीं वचन देणारानें पुरें करावें.

वेळ नेमली आहे परंतु पुरें करा ह्मणून विनंती करावयाची नाहीं असें असेल तेव्हां वचन पुरें करण्याची वेळ आणि ठिकाण.

## उदाहरण.

अ हा बच्या वखारीजवळ तारीख १ जानेवारी दिवशीं कांहीं माल स्वाधीन करतो असें वचन देतो. त्या दिवशीं वखार बंद होण्याचा नेहमींचा तास होऊन गेल्यावर अ सदरहू माल बच्या वखारीजवळ आणितो. तो माल स्वाधीन करून घेतला नाहीं, तर अनें आपलें वचन पुरें केलें असें झालें नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

ता. १५ जानेवारी सन १९१४ रोजच्या कराराअन्वयें प्रतिवादीनें वादीपासून मार्च १५ ते २५ च्या दरम्यान कापसाचे २०० गठ्ठे विकत घेण्याचा करार केला. सदरहू करारास सर्व बाबतींत बांबे काटन ट्रेड असोसिएशनचे नियम लागू पडतील, मात्र सदर करार कोणत्याही कारणावरून रद्द करतां येणार नाहीं असें सदर करारांत स्पष्ट शब्दांनीं लिहिलें होतें. बांबे काटन ट्रेड असोसिएशनच्या नियमांपैकीं नियम १७ प्रमाणें ज्या तारखेस माल द्यावयाचा असेल त्या तारखेस दुपारीं एक वाजण्याच्या पूर्वी खरेदी देणारानें माल व त्या सोवत माल देण्या-

बद्दलचा हुकूम हजर केला पाहिजे. खरेदी देणारानें ही गोष्ट न केल्यास खरेदी घेणारास तीन मार्ग मोकळे असतः—(१) करार रद्द करणें, (२) खरेदी देणाराच्या जोखमीवर दुसरा माल विकत घेणें, व (३) अगर त्या दिवशीं जो भाव (असोसिएशननें) ठरविला असेल त्या भावानें करार पुरा करावा. ता. १९ मार्च सन १९१४ रोजीं वादीनें प्रतिवादीच्या स्वाधीन १०० गठ्यांबद्दलची रेलवे रिसीट केली. ता. २५ मार्च सन १९१४ रोजीं प्रतिवादीनें माल मिळण्याबद्दल रेलवेच्या अधिकाऱ्यांकडे मागणी केली, परंतु प्रतिवादीस माल न दिल्यामुळें प्रतिवादीनें दुसऱ्या दिवशीं वादीकडे रेलवेची रिसीट परत पाठविली व वादीनें कराराचा आपला भाग पुरा केला नसल्यामुळें प्रतिवादीनें सदर करार रद्द केला आहे असें प्रतिवादीनें वादीस कळविलें. कोणत्याही परिस्थितींत करार करणाऱ्या दोघां इसमांपैकीं कोणासही करार रद्द करण्याचा अधिकार नाहीं अशी शर्त करारांत होती. त्या शर्तीच्या आधारें वादीनें प्रतिवादीजवळ कराराचा कापसाच्या गठ्याचा भाव व बाजारांतील भाव यांजमधील फरकाच्या मानानें १०० गठ्यांबद्दल प्रतिवादीजवळ रुपये २२७९८।३ मागितले. रेलवे रिसीट स्वाधीन करणें हें माल स्वाधीन करण्यासारखेंच आहे व प्रतिवादीनें रेलवेची रिसीट स्वीकारिल्यामुळें व ठरलेल्या तारखेपूर्वी माल हातांत आला नाहीं ही गोष्ट प्रतिवादीनें वादीस कळविली नसल्यामुळें बांबे काटन ट्रेड असोसिएशनचा नियम १७ प्रमाणें वादीनें प्रतिवादीच्या ताब्यांत देण्याकरितां माल हजर केला नाहीं अशी तक्रार करण्यास प्रतिवादीस प्रतिबंध आला आहे असें वादीचें ह्मणणें होतें.

ठरावः—(१) ज्या मालाबद्दल रेलवेची रिसीट होती तो माल ठरलेल्या तारखेपूर्वी वास्तविक आला होता अशाबद्दल आपली खात्री करून घेणें हें वादीचें काम होतें; व वादीनें ही गोष्ट केली नसल्यास कराराप्रमाणें मालाबरोबर माल देण्याबद्दलचा हुकूम हजर करण्याची कर्दीवर जी पात्रता होती त्या पात्रतेमधून वादी मुक्त होणार नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. ५१७; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. २५० व २५१).

**४८.** जेव्हां वचन नेमलेल्या दिवशीं पुरें करावयाचें आहे, आणि वचन घेणाराची विनंती आल्या शिवाय, पुरें करतो असा वचन देणारानें पतकर घेतला नसेल, तेव्हां पुरें करण्याची विनंती योग्य स्थळीं आणि उद्योग करण्याचे नेहमींचे जे तास त्यांच्या आंत करणें, हें वचन घेणाराचें काम आहे.

*पुरें करण्याविषयीं विनंती योग्य काळीं व योग्य स्थळीं झाली पाहिजे.*

खुलासाः—'योग्य काळ आणि स्थळ म्हणजे काय' ही प्रत्येक विशेष प्रसंगीं एक गोष्ट समजून तिजविषयीं ठराव केला पाहिजे.

**४९.** जेव्हां वचन घेणाराकडून विनंती आल्याशिवाय वचन पुरें करावयाचें आहे, आणि पुरें करावयाचें ठिकाण नेमलें नसेल, तेव्हां वचन पुरें करण्या करितां योग्य ठिकाण नेमण्याची विनंती वचन घेणारास करणें, आणि तशा ठिकाणीं तें पुरें करणें हें वचन देणाराचें काम आहे.

*विनंती करावयाची नसेल आणि ठिकाण नेमलेलें नसेल तेव्हां वचन पुरें करण्याची जागा.*

### उदाहरण.

अ हा नेमलेल्या दिवशीं १००० मण जूट बच्या स्वाधीन करण्याचा पतकर घेतो. तर तें घेण्याकरितां योग्य ठिकाण नेमावें अशी अनें बला विनंती करावी, आणि त्या ठिकाणीं तें त्याच्या स्वाधीन करावें.

वचन घेणारानें नेमलेल्या अथवा पसंत केलेल्या प्रकारानें किंवा वेळीं पुरें करणें.

५०. जो कोणताही प्रकार व जी कोणतीही वेळ वचन घेणारा नेमील अथवा पसंत करील त्या प्रकारानें आणि त्या वेळीं कोणतेंही वचन पुरें केल्यास चालेल.

### उदाहरणें.

(अ.) बनें अचे २,००० रुपये देणें आहेत. अ बला विनंती करतो कीं, आपला पेढीवाला क याजवळ तो पैसा आपल्या नांवावर भरावा. कच्या पेढीवर बचाही हिशेब आहे आणि त्यामुळें ब आपल्या नांवावरचे तेवढें रुपये काढून अच्या नांवें जमा करावे असा हुकूम देतो, आणि क त्याप्रमाणें करतो. त्यानंतर, आणि पैसा जमा झाल्याविषयीं अला समजण्यापूर्वींच कनें आपलें दिवाळें काढिलें. तर बनें योग्य रीतीनें पैसा दिला असें समजलें पाहिजे.

(ब.) अ आणि ब यांनीं एकमेकांचें कर्ज देणें आहे. अ आणि ब हे रकमेला रकम वजा करून एकमेकांचा हिशेब करितात आणि हिशेबाअंतीं बकडे बाकी निघाली ती तो अला देतो. तर इतक्यानें अ आणि ब यांनीं एकमेकांचें देणें असलेलें अनें बला आणि बनें अला दिलें असें झालें.

(क.) अनें बचे २,००० रुपये द्यावयाचे आहेत. ब हा कर्जाच्या कांहीं भागा ऐवजीं अचा कांहीं माल अनें दिल्यावरून घेतो. तर माल स्वाधीन केला तेणें करून कर्जापैकीं कांहीं भाग फेडला असें झालें.

(ड.) बनें अचे १०० रुपये द्यावयाचे आहेत. त्याबद्दल १०० रुपयांची नोट टपालांतून आपणास पाठवावी अशी अ बची विनंती करतो. तर ब यानें नोट आंत घालून वर अचा पत्ता बरोबर लिहून लखोटा टपालांत टाकतांच कर्ज फिटलें.

### परस्पर वचनांच्या पूर्ततेविषयीं.

परस्पर वचन घेणारा आपलें वचन पुरें करण्यास तयार आणि कबूल नसल्यास वचन देणारास आपलें वचन पुरें करण्यास भाग नाहीं.

५१. जेव्हां एकादा करार समकाळीं पुरीं करावयाचीं अशा परस्पर वचनांबद्दलचा असेल, तेव्हां वचन घेणारा त्या परस्पर वचनांपैकीं आपलें वचन पुरें करावयाविषयीं तयार आणि कबूल नसेल तर, कोणत्याही वचन देणारास आपलें वचन पुरें करणें भाग पडणार नाहीं.

## उदाहरणें.

(अ.) अ आणि ब हे असा करार करितात कीं, अनें कांहीं माल बच्या स्वाधीन करावा व स्वाधीन केल्यावर बनें त्याची किंमत द्यावी.

माल स्वाधीन केला असतां ब हा त्याची किंमत द्यावयास तयार आणि कबूल नसेल तर अनें माल स्वाधीन केला पाहिजे असें नाहीं.

किंमत दिल्यास अ हा माल स्वाधीन करून देण्यास तयार आणि कबूल नसेल तर बनें किंमतीचा पैसा भरला पाहिजे असें नाहीं.

(ब.) अ आणि ब असा करार करितात कीं, अनें कांहीं एका किंमतीस कांहीं माल बच्या स्वाधीन करावा, आणि किंमत हप्त्यांनीं पोंचवावी आणि पहिला हप्ता माल स्वाधीन होतांच द्यावा.

ब हा माल स्वाधीन केल्यास पहिला हप्ता देण्यास तयार आणि कबूल नसेल तर अनें माल स्वाधीन केला पाहिजे असें नाहीं.

पहिला हप्ता दिल्यास माल स्वाधीन करण्यास अ हा तयार आणि कबूल नसेल तर बनें पहिला हप्ता दिला पाहिजे असें नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

वांटणी करण्याबद्दल एक हुकुमनामा झाला. पक्षकारांनीं एक करारनामा करून त्या हुकुमनाम्याची तोडजोड केली आणि त्यांनीं ती तोडजोड तो हुकुमनामा करणाऱ्या कोर्टास कळविली.

**ठरावः**—तो करारनामा झाल्यामुळें त्या हुकुमनाम्याचा अम्मल नाहींसा झाला आहे. तो करारनामा नवीन दावा करून मात्र अमलांत आणतां येईल आणि पूर्वीच्या हुकुमनाम्याची बजावणी करण्याकरितां दरखास्त देऊन तो अमलांत आणितां येणार नाहीं.

ज्या करारनाम्यांत वादी व प्रतिवादी यांनीं आपलीं परस्पर वचनें पुरीं करण्याबद्दल ठराव असेल त्या करारनाम्यावरून आपण पुरीं करावयाचीं वचनें पुरीं करण्यास वादी नाकबूल नसतील तेव्हां वादी यांस प्रतिवादींवर दावा करितां येईल, मग आम्हीं आपले तर्फेचीं वचनें पुरीं करण्यास तयार व उत्सुक आहों असें त्यांनीं आपल्या फिर्यादअर्जीत लिहिलें नसलें तथापि हरकत नाहीं व अशा प्रकारचे दाव्यास सन १८७२ च्या कराराचे आक्टाचें कलम ५१ वरून प्रतिबंध येत नाहीं.

करारनाम्यांतील ज्या भागांत वादींचा संबंध आहे तो भाग पुरा करून घेण्यासाठीं दावा करण्याचा वादींस हक्क असेल आणि तो सर्व करारनामा अमलांत आणण्याबद्दल प्रतिवादी म्हणत असतील आणि तसें करण्यास वादींची हरकत नसेल तेव्हां सर्व करार पुरा करण्याबद्दल कोर्टानें हुकुमनामा करावा आणि प्रतिवादींचें मागणें नाकबूल करूं नये. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १९ पृ. ५४६; न्या. पु. ३० मुं. दि. नि. पृ. २३२).



५२. जेव्हां परस्पर वचनें कोणत्या क्रमानें पुरीं करावयाचीं तो क्रम करारांत

परस्पर वचनें पुरीं करण्याचा क्रम.

स्पष्टपणें ठरविला असेल तेव्हां तीं त्या क्रमानें पुरीं केलीं पाहिजेत; आणि जेव्हां क्रम करारानें स्पष्टपणें ठरविला नसेल, तेव्हां त्या व्यवहाराच्या स्वरूपावरून जो क्रम जरूर असेल तर क्रमानें तीं पुरीं केलीं पाहिजेत.

## उदाहरणें.

(अ.) अ आणि ब असा करार करितात कीं, कांहींएक ठरविलेल्या किंमतीला अनें ब करितां एक घर बांधावें, तर अनें घर बांधण्याविषयींचें दिलेलें वचन, बनें किंमत देण्याविषयीं दिलेल्या वचनाचे अगोदर पुरें झालें पाहिजे.

(ब.) अ आणि ब असा करार करितात कीं, अनें आपला व्यापाराचे जिनसांचा संग्रह कांहींएक ठरविलेल्या किंमतीला बच्या हवाली करावा, आणि ब हा किंमतीच्या पैशाबद्दल तारण देईन असें वचन देतो. तर तारण दिलें नाहीं तोंपर्यंत अला आपलें वचन पुरें करणें भाग पडणार नाहीं, कारण कीं त्या व्यवहाराचें स्वरूप असें आहे कीं अ यानें आपला व्यापाराचे जिनसांचा संग्रह स्वाधीन करण्यापूर्वीं त्याचे हातीं तारण आलें पाहिजे.

ज्या गोष्टीच्या घडण्यावरून करार पुरा व्हावयाचा तिला कोणी पक्षकारानें हरकत केल्यास त्याची जबाबदारी.

५३. जेव्हां एकाद्या करारांत परस्पर वचनें असतील, आणि करारांतील एक पक्षकार दुसरा पक्षकार आपलें वचन पुरे करूं लागल्यास त्याला हरकत करील, तर ज्याला तशी हरकत झाली त्या पक्षकाराचे इच्छेवरून, तो करार निरर्थक करण्याजोगा असा होतो आणि करार पुरा न झाल्यामुळें जो त्याचा तोटा होईल त्याबद्दल हरकत करणाऱ्या पक्षकाराकडून त्याला नुकसानी भरून घेण्याचा हक्क आहे.

## उदाहरण.

अ आणि ब हे करार करितात कीं ब यानें अ करितां अमुक एक काम एक हजार रुपयांला करावें. त्याप्रमाणें काम करण्यास ब हा तयार आणि कबूल आहे, पण अ हा त्याला तें करण्यास हरकत करतो. तर हा करार, बच्या इच्छेस येईल तर निरर्थक करण्याजोगा असा झाला, आणि त्याच्या मनांत तो रद्द करण्याचा असेल तर तो पुरा न झाल्यामुळें त्याचा जो तोटा झाला त्याबद्दल अ पासून नुकसानी भरून घेण्याचा त्याला हक्क आहे.

परस्पर वचनाबद्दलचा करार असून जें वचन अगोदर पुरें झालें पाहिजे तें

५४. जेव्हां एकादा करार परस्पर वचनाबद्दलचा असतो आणि तीं वचनें अशीं कीं, त्यांतून एक पुरें झालें नाहीं तोंपर्यंत दुसरें पुरें होऊं शकत नाहीं अथवा पुरें व्हावें असें मागणें होऊं शकत नाहीं आणि सदरील प्रथम सांगितलेलें वचन

पुरें न झाल्याचा परिणाम. देणारा तें पुरें करण्यास चुकतो, तेव्हां तो वचन देणारा त्या परस्पर वचनांपैकीं दुसऱ्यानें दिलेलें जें वचन तें पुरें करावें म्हणून मागणें करूं शकणार नाहीं, आणि पुरें न झाल्यामुळें करारांतील त्या दुसऱ्या पक्षकाराचा जो तोटा झाला त्याबद्दल त्यानें नुकसानी भरून दिली पाहिजे.

उदाहरणें.

( अ. ) अ हा कांहीं माल कलकत्याहून मारिशिअस बेटाला भरून पाठविण्याकरितां बचें जहाज नुरानें घेतो. जहाजावर भरण्याकरितां माल अनें द्यावयाचा आणि माल नेण्याबद्दल बला कांहीं नूर मिळावयाचा आहे. अ हा जहाजावर भरण्याकरितां कांहींच माल देत नाहीं. तर बनें आपलें वचन पुरें करावें असें अ मागणें करूं शकत नाहीं, आणि करार पुरा न झाल्यामुळें बचा तोटा झाला त्याबद्दल नुकसानी अनें भरून दिली पाहिजे.

( ब. ) अ हा कांहीं एका नेमलेल्या किंमतीला घराचें सुतार-काम करून देतो; असा बशीं करार करतो; त्या कामास जरूर असलेल्या परांच्या आणि लांकडें बनें आणून द्यावयाची. नंतर ब हा परांच्या किंवा लांकडें हें कांहींच देत नाहीं म्हणतो, आणि त्यामुळें काम होणें अशक्य झालें आहे. तर अनें तें काम करणें जरूर नाहीं, आणि करार पुरा न झाल्यानें अचा कांहीं तोटा झाला असेल त्याबद्दल नुकसानी बनें भरून दिली पाहिजे.

( क. ) अ हा कांहीं अमुक एक व्यापाराचा माल कांहीं ठरलेल्या किंमतीस बच्या स्वाधीन करण्याचा करार करतो; तो माल एका जहाजावर असून तें येऊन पोहोंचण्यास एक महिना तरी लागणार आहे आणि ब हा कराराच्या तारखेपासून एक आठवड्याच्या आंत सदहू मालाची किंमत देण्याची बोली करतो. बनें आठवड्याच्या आंत पैसा दिला नाहीं तर अनें माल स्वाधीन करण्याचें दिलेलें वचन पुरें करणें जरूर नाहीं, आणि बनें नुकसानी भरून दिली पाहिजे.

( ड. ) अ हा बला असें वचन देतो कीं, मी मालाचे शंभर गठे तुला विकतो आणि ते उद्या तुझ्या स्वाधीन करीन, आणि ब हा त्याबद्दलची किंमत एक महिन्याचे आंत देईन असें वचन देतो. अ हा आपल्या वचनाप्रमाणें माल स्वाधीन करून देत नाहीं. तर बनें पैसा भरण्याचें आपलें वचन पुरें करणें अवश्य नाहीं आणि अनें नुकसानी भरून दिली पाहिजे.

विशेष समजुतीची टीप.

ज्यां दोन इसमांच्या दरम्यान करार झालेला आहे त्यांनीं आपआपलीं वचनें पाळलीं नसून त्यां पैकीं एकानें मुद्दाम आपलें वचन पाळलें नसून त्यानें आपल्या वचनाप्रमाणें काम केल्याशिवाय

दुसऱ्यास आपलें वचन पुरें करावयाचें कारण नसल्यामुळें दुसऱ्यानें आपलें वचन पुरें केलें नसेल तर ज्या इसमाचा कांहीं दोष नाहीं अशा इसमास नुकसानी मिळण्याची बाब सोडून बाकीच्या सर्व बाबतींत झालेला करार संपतो.

करार पुरा करण्याची कबुली बिनशर्तीची असेल तेव्हांच त्याचा परिणाम करार पुरा केल्याप्रमाणें होतो. ( इं. ला. रीं. म. सी. व्हा. ३८ पृ. ९५८; न्या. पु. ५० म. दि. नि. पृ. ७६ ).

ज्यांत वेळ न चुकणें हें तात्विक आहे असा करार नेमलेल्या वेळेवर पुरा न केल्याचा परिणाम.

५५. जेव्हां करारांतील एखादा पक्षकार नेमलेल्या वेळेवर अथवा तिजपूर्वीं अमुक एक गोष्ट करण्याचें, अथवा नेमलेल्या ज्या वेळा त्या वेळांवर अगर त्या पूर्वीं कांहीं एक गोष्टी करण्याचें, वचन देतो, आणि नेमलेल्या वेळेवर अथवा त्या पूर्वीं तशी कोणतीही गोष्ट तो करीत नाहीं तेव्हां तो करार अथवा त्याचा जितका भाग पुरा झाला नसेल तितका भाग, जर वेळ न चुकणें हें पक्षकारांच्या उद्देशाप्रमाणें करारास तात्विक होत असेल तर, वचन घेणाराच्या इच्छेस आल्यास, निरर्थक करण्याजोगा असा होतो.

वेळ न चुकणें हें तात्विक नसेल तर नेमलेल्या वेळेवर करार पुरा न झाल्याचा परिणाम.

जर वेळ न चुकणें हें पक्षकारांच्या उद्देशाप्रमाणें तात्विक नव्हतें असें असेल तर नेमलेल्या वेळेवर अथवा त्या पूर्वीं तशी गोष्ट न केल्यानें करार निरर्थक करण्याजोगा असा होत नाहीं; परंतु तशी गोष्ट न झाल्यामुळें वचन घेणाराचा कांहीं तोटा झाला असेल त्याबद्दल नुकसानी वचन देणाराकडून भरून मिळणें हा त्याचा हक्क आहे.

नेमलेल्या वेळेहून अन्य वेळेस वचन पुरें केल्यास आपणास चालेल असें मान्य केलें तर त्याचा परिणाम.

जेव्हां एखादा करार अशा प्रकारचा असेल कीं, नेमलेल्या वेळेवर वचन देणारानें आपलें वचन पुरें न केल्यामुळें तो निरर्थक करण्याजोगा असा व्हावयाचा, तेव्हां जर नेमलेल्या वेळेहून अन्य वेळेस तें वचन पुरें केल्यास आपणास चालेल असें वचन घेणारा मान्य करील, तर मग, नेमलेल्या वेळेस वचन पुरें न झाल्यामुळें कांहीं तोटा झाल्यास त्याजबद्दल वचन घेणारास नुकसानीचें मागणें करतां येणार नाहीं; मात्र मान्य करिते वेळीं वचन घेणारा नुकसानीबद्दल मी मागणें करीन असें वचन देणारास जर कळवील, तर त्याला नुकसानीचें मागणें करतां येईल.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. सीनें एका जमिनींमधील आपले हक्कसंबंध आयला विकण्याचा करार केला. सेक्रेटरी आफ स्टेट फार इंडिया यांजकडून भाडेपट्यानें सीनें सदर मिळकत घेतली होती. पिकाकरतां जमिनींत सुधारणा करणें; व या शर्ती पूर्ण झाल्याशिवाय ठाण्याच्या कलेक्टरच्या परवानगीशिवाय सदर जमिनी पोट-भाड्यानें न देणें अगर तिजवरील आपले हक्क वेचन न देणें वगैरे संबंधानें भाडेपट्यांत शर्ती होत्या. ८५००० रुपयांस सदर हक्कसंबंध खरेदी द्यावयाचे असून सोबत साठेखत झाल्य-

वर ४००० रुपये दिले होते. साठेखताच्या तारखेपासून दोन महिन्यांत खरेदीखत करून द्यावें व खरेदीखत झाल्यावर ८०५०० रुपये द्यावे व खरेदीखत नोंदून जमीन कबजांत दिल्यावर ५०० रुपये द्यावे असें ठरलें होतें. आयनें ठरविलेल्या मुदतींत खरेदीची रक्कम न दिल्यास विसारादाखल दिलेल्या रकमेवरील त्याचा हक्क नष्ट व्हावा व सीला दुसऱ्यास मिळकत विकण्याची मोकळीक असावी असा करार साठेखतांत झाला होता.

**ठरावः**—करारांत मुदत हें महत्वाचें अंग आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३८ पृ. ७७; न्या. पु. ४९ मुं. दि. नि. पृ. ३२ ).

२. प्रतिवादीनें (रेस्पांडेंट) सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया यांजपासून एक जमीन खंडानें घेतली होती. त्या जमिनीमधील आपले हक्कसंबंध वादीस ८५००० रुपयांस खरेदी देण्याबद्दलचा करार ता. ८ जुलै सन १९११ रोजीं प्रतिवादीनें वादीस करून दिला. करार झाल्यानंतर रु. ४००० प्रतिवादीस देण्यांत आले होते; व कराराच्या तारखेपासून दोन महिन्यांत प्रतिवादीनें वादीस खरेदीचा दस्तऐवज करून दिल्यानंतर रु. ८०५०० वादीनें प्रतिवादीस द्यावे असें ठरलें होतें; व बाकीचे रुपये ५०० खरेदीचा दस्तऐवज नोंदून जमीन वादीच्या कबजांत दिल्या नंतर देण्यांत यावे असें ठरलें होतें. खरेदी घेणारानें ठरल्याप्रमाणें खरेदीची रक्कम न दिल्यास त्याचा विसारादाखल दिलेल्या रकमेवरील हक्क नष्ट व्हावा व खरेदी देणारास जमीन दुसऱ्यास खरेदी देण्याची मोकळीक असावी अशी शर्त करारांत होती. ता. ३ आक्टोबर सन १९११ रोजीं अपेलेंटानें रेस्पांडेंटाजवळ त्याच्या मालकीसंबंधाचे कागदपत्र मागितले. याप्रमाणें आपलेजवळील कागदपत्र न देतां सदर करारांत वेळ हा महत्वाचा भाग आहे व अपेलेंटानें ठरलेल्या मुदतींत खरेदी पुरी केली नसल्यामुळें ४००० रुपयांची जी रक्कम अनामत ठेवण्यांत आली आहे तिजवर आपला हक्क आहे असा हक्क ता. ६ आक्टोबरला रेस्पांडेंटानें सांगितला. करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्याकरितां आणलेल्या दाव्यांत हायकोर्टाचा निकाल रद्द करून प्रिव्हिकौन्सिलनें पुढील ठराव केलाः

**ठरावः**—सदर करारांत वेळ हा महत्वाचा भाग होत नाहीं.

जमिनी खरेदी देण्यासंबंधानें केलेल्या करारासंबंधानें करार करणारांनीं करार विशिष्ट मुदतींत पुरा व्हावा असें करारांत नमूद केलें असलें तरी करार योग्य मुदतींत पुरा करावा इतकाच करार करणारांचा मुख्यत्वें खरा हेतु होता किंवा नाहीं हें इक्किटीप्रमाणें बघतां येतें. इक्विटीप्रमाणें हा खरा हेतु बघण्यास खरेदीच्या करारास जीं तत्वें लागू करण्यांत येतात त्यापेक्षां एखादें भिन्न तत्व कराराचा आक्ट (सन १८७२ चा ९) कलम ५५ मध्यें घालून देण्यांत आलेलें नाहीं.

कलम ५५ मध्यें जें तत्व मान्य करून समाविष्ट करण्यांत आलें आहे तें जमिनीच्या खरेदीच्या करारास लागू पडतें असें पुढील कज्जांतील ठरावांत ठरविण्यांत आलेलें आहे, म्हणून त्यांचा या संबंधांत उल्लेख करण्यांत आला. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. २८९; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. १३३).

३. कलम ५५ व कलम २ हीं बरोबर वांचलीं असतां सदर कलमांचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें होतोः—करार करून देणारानें ठेवलेल्या मुदतींत करार पुरा न केल्यास करार पुरा करून घेण्याचा म्हणजे कराराअन्वयें त्यास मिळणारा फायदा मागण्याचा त्याचा हक्क नष्ट होतो. करार अमलांत आणणें किंवा न आणणें हें करार करून घेणाराच्या मर्जीवर असतें. करार करून घेणारानें करार पुरा करून घेण्याचें टाळल्यास करार मोडल्यामुळें स्वाभाविक रीतीनें जें नुकसान होईल असें करार करणारास कराराच्या वेळीं माहीत असेल असें नुकसान कलम ७३ अ-

न्तर्ये करार करून घेणारास भरून मिळेल. करार मोडल्यावर करार करून घेणाराच्या एखाद्या कृत्यामुळें अगर त्यानें एखादें कृत्य न केल्यामुळें नुकसानी वाढली असल्यास सदर वाढलेल्या नुकसानीची भरपाई करार करून घेणारास मिळणार नाहीं. ( इं. ला. रि. म. सी. व्हा. ३७ पृ. ४१२; न्या. पु. ४९ म. दि. नि. पृ. २४ ).

४. **मुदतीमध्यें माल न दिल्यामुळें झालेल्या नुकसानीची भरपाई.**—मालाची विक्री करणाऱ्या इसमानें ठरलेल्या मुदतींत माल न दिल्यानंतर माल खरेदी घेणाऱ्या इसमानें माल घेण्याची मुदत वाढविल्यास व या वाढविलेल्या मुदतीमध्येंही खरेदी देणारानें माल न दिल्यास नेहमींच्या रीतीप्रमाणें नुकसानभरपाई मिळण्याचा हक्क कराराच्या आक्टाचें कलम ५५ प्रमाणें खरेदी घेणारास प्राप्त होतो. जें वचन पुरें न केल्यावद्दल नुकसान मागतां येत नाहीं असें कराराच्या आक्टाचें कलम ५५ पारिग्राफ ३ मध्यें ठरविण्यांत आलें आहे तें वचन म्हणजे, मूळ ठरलेल्या वेळीं माल देणें हें होय. खरेदी घेणारानें खरेदी घेतलेल्या मालाच्या विक्रीसंबंधानें तिऱ्हाईत इसमाबरोबर केलेल्या कराराप्रमाणें माल दिला असता तर, खरेदी घेणारास जो फायदा झाला असतां तो फायदा माल वेळेवर न दिल्यामुळें झाला नाहीं; म्हणून, फायद्याची रक्कम नुकसानीदाखल मागितली असल्यास खरेदी घेणाराजवळ अगोदर कोठ्यांत जो माल होता तो त्यानें करारामध्यें देऊन नफा मिळविला आहे व खरेदी देणारानें माल वेळेवर दिला असता तर, जो नफा झाला असतां तेवढाच नफा खरेदी घेणारास झाला आहे या गोष्टीस कांहीं महत्व रहात नाहीं. ( इं. ला. रि. अ. सी. व्हा. ४३ पृ. २५७; न्या. पु. ५६ अ. दि. नि. पृ. १२ ).

अशक्य कृत्य करण्याविषयींची कबुलायत निरर्थक.

**५६.** जें कृत्य मुळींच अशक्य तें करण्याची कबुलायत निरर्थक होय.

जें कृत्य मागाहून अशक्य अगर गैरकायदेशीर झालें तसें कृत्य करण्याचा करार केव्हां निरर्थक होतो.

एकादें कृत्य करण्याचा करार केला, आणि करार केल्यानंतर तें कृत्य अशक्य झालें, अथवा वचन देणाराच्यानें बंद करतां आली नसती अशी कांहीं एकादी गोष्ट घडून आल्यामुळें, तें कृत्य गैरकायदेशीर झालें, तर तो करार, कृत्य अशक्य अगर गैरकायदेशीर होईल तेव्हां, निरर्थक होतो.

जें कृत्य करणें अशक्य अगर गैरकायदेशीर आहे असें समजलें होतें तें न केल्यानें तोटा झाल्यास तो भरून देणें.

अमूक गोष्ट अशक्य अगर गैरकायदेशीर आहे हें ज्याला समजलें होतें किंवा साधारण हुषारी राखिली असती तर समजलें असतें, अशा कोणी एकानें ती गोष्ट करण्याचें वचन दिलें व ती गोष्ट अशक्य अगर गैरकायदेशीर आहे असें वचन घेणारास समजलें नव्हतें, तर तें वचन पुरें न झाल्या कारणानें वचन घेणारास जो कांहीं तोटा होईल त्याची नुकसानी वचन देणारानें वचन घेणारास भरून दिली पाहिजे.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा जादू करून द्रव्य शोधून काढण्याची कबूली बशी करतो. तर हा करार निरर्थक होय.

( ब. ) अ आणि ब ही एकमेकांशीं लग्न करण्याचा करार करितात. लग्नाला नेमलेली वेळ येण्यापूर्वींच अला वेड लागतें, तर हा करार निरर्थक झाला.

( क. ) अचें कशीं अगोंदरच लग्न झालेलें आहे आणि जो कायदा अस लागू आहे त्या कायद्यानें अनेक बायका करण्याची त्याला मोकळीक नसून, तो बशीं लग्न करण्याचा करार करतो. तर अचें वचन पुरें न झाल्यानें जो बचा तोटा झाला त्याबद्दल अनें तिला नुकसानी भरून दिली पाहिजे.

( ड. ) अ हा ब करितां परअमलांतील एका बंदरीं कांहीं माल जहाजावर घेण्याचा करार करतो. त्यानंतर अच्या देशचें सरकार तें बंदर ज्या राज्यांत आहे त्या राजाशीं युद्ध करण्याचा जाहिरनामा प्रगट करतें. तर युद्धाचा जाहिरनामा प्रगट होतांच करार निरर्थक झाला.

( ई. ) अला बनें कांहीं पैसा दिला आहे. त्याबद्दल अ हा सहा महिने नाटकशाळेंत सोंगें घेण्याचा करार करतो. कित्येक प्रसंगीं अ इतका आजारी पडतो कीं, त्याच्यानें सोंगें घेववत नाहींत. तर त्या प्रसंगीं सोंगें घेण्याचा करार निरर्थक झाला.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. वादीच्या स्टुरा नामक जहाजांतून सिंगापूर येथून जे पांचशें यात्रेकरू मुंबईस यावयाचे होते, त्या यात्रेकरूंस आपल्या मोबाइल नांवाच्या आगबोटींतून मुंबईहून जेद्दा येथें पोंचविण्याविषयीं प्रतिवादींनीं वादींबरोबर करार केला होता. दरएक यात्रेकरूबद्दल प्रतिवादी यांस रुपये २६ यावयाचे व मोबाइल नांवाचे जहाजावर ते यात्रेकरू ता. ३ मे सन १८८८ रोजीं चढवावयाचे, असा करार होता. स्टुरा नामक जहाज ता. १ माहे मे रोजीं ६०० यात्रेकरूंस घेऊन मुंबईस येऊन पोंचलें, आणि कराराप्रमाणें ता. २ मे रोजीं त्यां पैकीं ५०० यात्रेकरू मोबाइल नांवाचे जहाजावर चढण्यास तयार आहेत अशाबद्दल वादींनीं ता. २ मे रोजीं प्रतिवादींस नोटीस दिली. सदर्हू यात्रेकरू स्टुरा नामक जहाजांतून मुंबईस आले आहेत आणि तें जहाज मुंबईस असतांना वाटेंत त्याजवरील उतारू लोकांस देवीची सांथ आली; आणि ज्या लोकांस देवी आल्या होत्या त्या लोकांबरोबर ते ५०० यात्रेकरू त्या जहाजांतून आले आहेत व आजरोजीं त्या यात्रेकरू लोकांस देवी येत आहेत; सबब ते ५०० यात्रेकरू लोक आम्हीं मोबाइल जहाजावर घेत नाहीं असें प्रतिवादींनीं सांगितलें. अशा प्रसंगीं त्या ५०० यात्रेकरू लोकांस जहाजावर घेऊन जाण्याचें आम्हांस भाग नाहीं; कारण ( १ ) त्या ५०० यात्रेकरू लोकांस देवी किंवा दुसरा एखादा भयंकर आजार नसावा अशी त्या करारांत गर्भित शर्त आहे, आणि ( २ ) ह्या अहवालामुळें तो करार पुरा करणें बेकायदेशीर झालें आहे. ( इं. पि. कोड कलम २६९ आणि सन १८७२ चा आक्ट ९ कलम ५६ ) पहा.

ठरावः—प्रतिवादी यांस तो करार पुरा करणें भाग होतें. यात्रेकरूंस नेण्या आणण्याच्या व्यापाराच्या रुढीवरून, न्यावयाचे किंवा आणावयाचे यात्रेकरूंस देवी आलेल्या नसाव्या अशी गर्भित शर्त असतेच, अशाबद्दल पुरावा नसेल तर तशी शर्त आहे अशी कल्पना करण्याचें कारण नाहीं. त्या ५०० उतारूंपैकीं कांहीं उतारू उतरल्या वाईट हवेत असल्यामुळें त्यांचे आंगीं

रोगाचें बीज असण्याचा संभव असल्यामुळें त्यांस नेण्याचे कामीं जास्त खर्च व जास्त त्रास हो-ण्याचा संभव आहे, परंतु ह्या व्यापाऱ्याच्याच स्वरूपावरून पाहतां असा प्रसंग येईल ही गोष्ट प्रति-वादींस माहीत होती असें समजलें पाहिजे आणि ती अडचण टाळण्याची जर प्रतिवादींची इच्छा होती तर त्यांनीं आपल्या करारांत तशी शर्त स्पष्टपणें घातली पाहिजे होती.

आणखी असाही ठराव झाला कीं, तो करार पुरा करणें बेकायदेशीर झालें नव्हतें. ज्या जहाजावर पुष्कळ उतारु आहेत त्या जहाजावर अवश्यमेव येणाऱ्या रोगांपेक्षां ह्यांची रोगाची सांथ फार भयंकर नव्हती. परंतु अशा प्रसंगीं कांहीं विशेष तजवीज करण्याची जर इच्छा होती तर, प्रतिवादींनीं विन शर्तीचा करार केल्यामुळें त्यांनींच ती केली पाहिजे होती. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १४ पृ. १४७; न्या. पु. २५ मुं. दि. नि. पृ. ७३ ).

२. वादी हे इंग्लंडांतील रहिवाशी झालेले जर्मन लोक असून त्यांची व्यापार करण्याची एक पेढी होती व ते लंडनमध्यें व्यापार करीत असत. वादीच्या दुकानानें ता. २४ जुलै सन १९१४ रोजीं प्रतिवादींच्या दुकानाबरोबर त्यांच्या लंडन येथील गुमास्त्याच्या मार्फत एक क-रार केला. त्या कराराप्रमाणें प्रतिवादी दुकानानें १००० टन माल दर टनास ११ शि. ६ पे. प्रमाणें देण्याचें कबूल केलें. प्रतिवादीनें वादीस मॅंगेनीज पुरवावयाचें होतें व तें सप्टेंबरमध्यें मुं-बईस जहाजावर चढवून अँटवर्पला पाठवावयाचें होतें. ता. ४ आगष्ट सन १९१४ रोजीं इंग्लंड व जर्मनी यांचे दरम्यान लढाईस सुरवात झाली. ता. ७ आगष्ट सन १९१४ रोजीं हिंदुस्थान सरकारनें मुंबईत सी कस्टम्स आक्टाअन्वयें एक जाहिरनामा प्रसिद्ध करून दारुगोळा, त्या-लाग्राही पदार्थ व हे पदार्थ तयार करण्यास लागणाऱ्या सर्व वस्तु त्यांच्या निर्गतीस मनाई केली. सी कस्टम्स आक्टाप्रमाणें हिंदुस्थान सरकारास फक्त विशिष्ट रीतीनें नमूद केलेला माल अगर वस्तू यांच्या निर्गतीसच मनाई करण्याचा अधिकार आहे. माल नमूद करावयाचा तो बिनचूक व नांवें देऊन नमूद केला पाहिजे. वर उल्लेख केलेल्या जाहिरनाम्यांत मॅंगेनीज या पदार्थाचा स्पष्ट रीतीनें उल्लेख केला नसल्यामुळें हिंदुस्थान सरकारानें ता. ५ अगष्टचा जाहिरनामा रद्द क-रून ता. १७ आक्टोबर सन १९१४ रोजीं आणखी एक जाहिरनामा काढला व त्या जाहिर-नाम्यांत ज्या वस्तूंच्या निर्गतीस त्यांचीं नांवें देऊन मनाई करण्यांत आली होती त्यांत मॅंगेनीज हें नांव होतें. पहिल्या जाहिरनाम्याच्या आधारें हिंदुस्थान सरकारच्या हुकुमामुळें करार रद्द झाला अशी तार प्रतिवादीनें ता. ७ सप्टेंबर सन १९१४ रोजीं वादीस केली. वादीनें करार रद्द झाला आहे असें समजण्याचें नाकबूल केलें व करार पुरा करण्याबद्दल आग्रह धरला. नंतर वादीनें नुकसानीदाखल पौंड ५२५ अथवा रु. ७९३७ मिळण्याबद्दल प्रतिवादीवर दावा लावला. ( १ ) ता. ५ आगस्ट सन १९१४ रोजीं हिंदुस्थान सरकारनें काढलेला जो जाहिरनामा मुंबईत ता. ७ आगस्ट सन १९१४ रोजीं प्रसिद्ध करण्यांत आला होता त्या अन्वयें मॅंगेनीजच्या निर्ग-तीस मनाई करण्यांत आली होती. ( २ ) सप्टेंबरमध्यें मुंबईहून अँटवर्पला माल भाड्यानें ने-ण्यास कोणी तयार नव्हते व ( ३ ) मुंबईहून अँटवर्पला माल भाड्यानें नेण्यास कोणी तयार अ-सले पाहिजे ही करारांतील गर्भित शर्त असून तो करारांतील महत्वाचा भाग होता व असाच करार करणाऱ्या दोन्ही पक्षांचा समज होता.

ठरावः—( १ ) ता. ५ आगष्ट सन १९१४ च्या पहिल्या नोटिशीमधील शब्दांकडे लक्ष देतां, कोणत्याही प्रकारें कायदा न मोडतां अगर करार केल्यानंतर कराराच्या आक्टाचें कलम ५५ प्रमाणें तो करार बेकायदेशीर झाला असल्यामुळें आपणांस रद्द करतां येण्यासारखा आहे अशी प्रतिवादीस तक्रार करतां न येतां ता. ७ आगस्ट सन १९१४ रोजीं प्रतिवादीस करारांतील आपला भाग पुरा करतां येत होता, ही वादीची तक्रार बरोबर आहे.

(२) प्रतिवादीनें करार जेव्हां रद्द केला तेव्हां व्यापारी दृष्टीनें मुंबईहून अँटवर्पला माल भाड्यानें नेण्यास कोणी तयार नव्हते येवढ्यामुळें कराराच्या आक्टाचें कलम ५६ मधील अर्थाप्रमाणें करार अवश्य झाला असें म्हणतां येत नाहीं.

(३) माल भाड्यानें पाठविण्यासंबंधानें जी नेहमीं साधारणपणें परिस्थिती असते ती चालू असली पाहिजे अशी करारांत गर्भित शर्त होती असें मानतां येत नाहीं.

(४) आपला माल सप्टेंबरमध्यें १००० टन मँगेनीज अँटवर्पला पाठविण्याचा हेतु होता असें वादीनें शाबीत केलें नसल्यामुळें व माल न पाठविल्यामुळें वादीचें कांहीं नुकसान झालें नसल्यामुळें प्रतिवादीनें फक्त तात्विक दृष्ट्या करार मोडल्यासारखें झालें आहे.

कराराप्रमाणें जीं कृत्यें करावयाचीं तीं करणें अशक्य झालें होतें या मुद्यावर करार रद्द करतां येण्यापूर्वीं तीं कृत्यं करणें शारीरिक रीतीनें अशक्य झालें होतें अशी कोर्टाची अगदीं खात्री झाली पाहिजे. जबर किंमत यावी लागणें अगर करार पुरा करणें कठीण होणें यापेक्षां शारीरिक अशक्यतेचीं पायरी फार पुढची आहे.

करार जेव्हां करण्यांत आला तेव्हां कराराचा हेतु कायदेशीर असून करार पूर्ण करण्यापूर्वी कायदेशीर निर्बंधामुळें करार पूर्ण करणें जेथें बेकायदेशीर झालें असेल अशा परिस्थितीचा विचार कराराच्या आक्टाचे कलम ५६ च्या अखेरच्या भागांत करण्यांत आला आहे व त्याप्रमाणें कलम २३ मध्यें सर्व करारांस लागू पडणारें जें सर्वसाधारण तत्व देण्यांत आलें आहे तें याप्रकारच्या करारांसही लागू करण्यांत आलें आहे. (इं. लॉ. री. मुं. सी. व्हॉ. ४० पृ. ३०१; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. १४२ तें १४).

३. ता. १ एप्रिल १९१५ रोजी प्रतिवादी स्टीमर कंपनीनें सी. ॲण्ड को बरोबर करार केला. सी. ॲण्ड को ही कंपनी जहाजें माल नेण्याकरतां कंत्राटानें भाड्यानें घेण्याचा धंदा करीत असे. सी. ॲण्ड कोनें सदर कराराप्रमाणें प्रतिवादी स्टीमर कंपनीपासून हेजाझ नांवाचें जहाज मुंबईहून नेपल्स, जिनोआ आणि अगर मार्सेल येथें समुद्रमार्गानें नेण्याकरतां भाड्यानें घेतलें. या जलप्रवासांत भाड्यानें जहाज घेणाराच्या मर्जीप्रमाणें कोणत्याही दोन बंदरांत माल उतरावयाचा होता. नंतर हेजाझच्या ऐजंटीं जेव्हा हें जहाज ठरविण्यांत आलें. सी. ॲण्ड कोनें वादीचे कापसाचें २५०० गठ्ठे सदर जहाजांतून भाडें घेऊन पाठविण्याचें कबूल केलें; व सी. ॲण्ड कोनें सदर गठ्ठे जहाजावर चढविण्याबद्दलचे हुकूम वादीच्या स्वाधीन केले व ते हुकूम वादीनें प्रतिवादीकडे हजर केले. वादीनें जेव्हा जहाजावर कापसाचे २५०० गठ्ठे चढविले; व प्रतिवादीनें त्या कापसाच्या गठ्ठ्यांबद्दल २५ लेडिंगचीं बिलें तयार केलीं. सदर कापसाच्या गठ्यांच्या भाड्याबद्दल रु. ३२६१०८६८२ प्रतिवादीस अगाऊ देण्यांत आले होते. जीनोआ येथें कापूस नेण्याचें सरकारनें हुकूम काढून मना केल्यामुळें जेहाजानें बंदर सोडलें नाहीं व सदर जलप्रवासाचा बेत सोडून द्यावा लागला. नंतर जहाजावर चढविलेला माल मिळण्यापूर्वी जहाजाचा खर्च व झालेला तोटा याबद्दल वादीस १२५०० रु. भरावे लागले. ही रकम वादीनें तक्रार करून भरली. नंतर वादीनें भाड्याबद्दल दिलेले रु. ३२६१०८६८२ प्रतिवादीजवळ परत मागितले व प्रतिवादीनें सदर रकम देण्याची आपणावर पात्रता नाहीं असें सांगितल्यामुळें भाड्याबद्दल दिलेली रकम परत मिळण्याकरितां व माल उतरविण्याच्या खर्चाबद्दल वादीनें प्रतिवादीस जे १२५०० रु. दिले होते त्यांचा हिशोब मिळण्याकरितां वादीनें प्रतिवादीवर दावा लावला.

ठरावः—(१) कराराच्या आक्टाचें कलम ५६ प्रमाणें सदहू करार पुरा करणें अशक्य झाले व यामुळें सदर आक्टाचें कलम ६५ प्रमाणें प्रतिवादीस या करारापासून झालेला फायदा

ह्मणजे रुपये ३२६१०८६८२ वादीस परत करणें हें प्रतिवादीवर बंधक आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. ५२९; न्या. पु. ५१ मुं. सि.-नि. पृ. २५२ व २५३).

४. प्रतिवादी ही एक जर्मन संयुक्त भांडवलाची मंडळी होती. ती मंडळी हॅनोवर येथील कायद्याप्रमाणें प्रस्थापित झाली असून तिची एक शाखा मुंबईस होती. मुंबईच्या शाखेची सर्व व्यवस्था सी. बी. या नांवाच्या एका जर्मन रहिवाशाकडे होती. वादी व प्रतिवादीतर्फे त्यांचे म्यानेजर यांचे दरम्यान ता. १८ फेब्रुवारी सन १९१४ रोजीं एक लेखी करार झाला. त्या करारा-अन्वयें ता. ३१ डिसेंबर सन १९१४ रोजीं संपणाऱ्या सालांत वादीच्या गिरण्यांत तयार होणाऱ्या मालापैकीं ज्या मालाचें वर्णन करारांत करण्यांत आलें आहे त्या निरनिराळ्या मालांचा सर्व गाळ करारांत प्रत्येक मालाच्या गाळाची जी किंमत दिलेली होती त्या किंमतीस विकत घेण्याचें व निदान दरमहा एकदां जो गाळ सांचला असेल तो आपल्या ताब्यांत घेण्याचें प्रतिवादीनें वादीबरोबर कबूल केलें होतें. करार पुरा होईपर्यंत वादीकडे अनामत म्हणून ठेवण्याकरितां प्रतिवादीनें वादीच्या स्वाधीन रुपये २२०० दर्शनी किंमतीच्या तीन पूर्णांक एक द्वितियांश टक्याच्या सरकारी प्रामिसरी नोटी केल्या. ता. ४ आगष्ट सन १९१४ रोजीं ग्रेट ब्रिटन व जर्मनी यांचे दरम्यान लढाईस सुरुवात झाली. ता. १८ आगष्ट रोजीं वादीच्या ताब्यांत असलेला गाळ माल घेण्याबद्दल वादीनें प्रतिवादीस लेखी कळविलें. ता. २२ आगष्टला सध्यांच्या राजकीय परिस्थितींत प्रतिवादीस हिंदुस्थानांत व्यापार करण्याची मोकळीक नाहीं असें प्रतिवादी कंपनीच्या म्यानेजरानें वादीस लेखी कळविलें व व्यापार पुन्हां सुरू होईपर्यंत ग.ळ माल ताब्यांत घेण्याचें तहकूब ठेवण्याबद्दल त्यानें वादीस विनंती केली. ता. ५ सप्टेंबरला परकी शत्रू या नात्यानें प्रतिवादी कंपनीच्या म्यानेजरास अटकेंत ठेवण्यांत आलें व प्रतिवादी कंपनीचा मुंबईमधील सर्व व्यापार बहुतेक बंद झाला. ता. ११ नोव्हेंबर रोजीं वादीनें गाळ माल आपल्या ताब्यांत घेणेबद्दल पुन्हां प्रतिवादीस लिहिलें व तह होईपर्यंत माल ताब्यांत घेण्याची आपणांस कांहीं व्यवस्था करतां येत नाहीं असें प्रतिवादीनें उत्तर दिलें. ता. १४ नोव्हेंबरला होस्टाइल फारेनर्स ट्रेडिंग आर्डर या नांवाचा एक हुकूम सरकाराकडून प्रसिद्ध करण्यांत आला व त्याप्रमाणें गव्हर्नर जनरल इन् कौन्सिल हे ज्या परकी शत्रू इसमास अगर परकी शत्रू कंपनीस व्यापार करण्याचा परवाना अगर अधिकार ज्या शर्ती अगर अटी घालून अथवा देखरेखी-संबंधाचे अधिकार आपल्या हातांत ठेऊन गव्हर्नर जनरल इन् कौन्सिल यांनीं दिला असेल त्या शर्ती वगैरे कायम ठेऊन ब्रिटिश हिंदुस्थानांत व्यापार अगर धंदा करण्याची मोकळीक ठेवण्यांत आली व बाकीच्या सर्व परकी शत्रू इसमांस अगर कंपन्यांस ब्रिटिश हिंदुस्थानांत व्यापार अगर धंदा करण्याची मनाई करण्यांत आली. ता. ३ डिसेंबर रोजीं, वादीनें आपल्या ता. ११ नोव्हेंबरच्या नोटिशीप्रमाणें ता. ८ डिसेंबरला अगर त्यापूर्वी वर्तन करण्याबद्दल प्रतिवादीस पुन्हां लेखी कळविलें व यानंतर गाळ मालाचा ताबा देण्यासंबंधाची मुदत वादीनें ता. १६ डिसेंबरपर्यंत वाढविली. प्रतिवादीनें याचा जबाब ता. १८ डिसेंबरला पाठविला व त्यांत प्रतिवादीच्या म्यानेजरास अटक करण्यांत आली आहे हें नमूद करून हिंदुस्थानच्या कराराच्या आक्टाचें कलम ५६ (२) प्रमाणें कराराचा आपला भाग पुरा करण्याची जबाबदारी आतां प्रतिवादीवर राहिली नाहीं असें त्यानें वादीस कळविलें. सरकारी देखरेखीखालीं आपला मुंबईमधील व्यापार आटोपून बंद करण्याबद्दल प्रतिवादीनें ता. ८ फेब्रुवारी सन १९१० रोजीं परवाना मिळविला. प्रतिवादीनें कराराप्रमाणें ज्या गाळाचा ताबा घ्यावयास पाहिजे होता तो गाळ वादीनें विकून टाकला आहे व त्या कामीं वादीस रुपये ४२७०८१३ तोटा आला आहे; व या रकमेंतून वादीकडे प्रतिवादीचे अनामत असलेले रुपये वजा जातां प्रतिवादीनें वादीस रुपये २०७२८१२८२ द्यावे असें वादीनें ता. १६ फेब्रुवारीला प्रतिवादीस कळविलें. प्रतिवादीकडून रुपये २२७०८१३ मिळण्याकरितां व तीन पूर्णांक

एक द्वितियांश हक्कांच्या सरकारी प्रामिसरी नोटा आपल्या ताब्यांत ठेऊन त्याची किंमत हुकुमना-म्यावरून येणें असलेल्या रकमेंत मजुरा करण्याचा वादीस हक्क आहे असें ज्ञापित करण्याकरितां वादीनें ता. ११ मार्च रोजीं प्रस्तुतचा दावा लावला; (१) लढाई सुरू झाल्यावर करार बेकाय-देशीर झाला; (२) करार पुरा करणें अशक्य झालें व (३) ता. १६ डिसेंबर सन १९१४ प-र्यंत करार पुरा करण्याची मुदत वादीनें वाढविली असल्यामुळें वादीनें करार मोडल्यामुळें प्राप्त होणारे हक्क सोडून दिले आहेत अशा तक्रारी प्रतिवादीनें केल्या.

**ठरावः**—(१) लढाईस सुरुवात झाल्यावर दाव्यांतील करार बेकायदेशीर झाला; व तो ता. ४ आगष्ट सन १९०३ रोजीं संपला.

(२) लढाईमुळें नंतर जी परिस्थिती उत्पन्न झाली त्यामुळें कराराचा आपला भाग पुरा करणें प्रतिवादीस अशक्य झालें.

(३) ता. १४ नोवेंबर सन १९१४ रोजीं करार पुरा करणें प्रतिवादीस अशक्य झालें असें मानलें तरी माल ताब्यांत घेण्याबद्दल वादीनें प्रतिवादीस ता. १६ डिसेंबरपर्यंत मुदत दिल्यामुळें त्या तारखेपूर्वी करार मोडल्यामुळें वादीस प्राप्त होणारे हक्क त्यानें सोडून दिलेले आहेत.

(४) कराराच्या आक्टाचें कलम ६५ प्रमाणें प्रतिवादीनें अनामत ठेवलेली रक्कम मिळ-ण्याचा त्यास हक्क आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. ५७०; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. २७३ ते २७५).

५. **लढाईमुळें करार पुरा करणें अशक्य होणें.**—ता. २ फेब्रुवारी सन १९१४ सालीं प्रतिवादी कंपनीनें वादीस पोलादी वार १५० मिळण्याचा करार केला. सदर करार सी. आय. एफ्. शर्तीवर झाला असून माल हुबळी येथें आणून पावता करावयाचा होता. जून, जुलै व आक्टोबर या महिन्यांत मा रु जहाजांतून पाठवावयाचा असून माल उतरल्यापासून तीन दिव-सांत खरेदी घेणाराच्या ताब्यांत द्यावयाचा होता. शिवाय पक्षकारांच्या दरम्यान वादीच्या ता-ब्यांत माल दिल्यापासून वादीनें ४५ दिवसांत मालाची किंमत प्रतिवादीस द्यावी असें ठरलें होतें. ता. २ जुलै सन १९१४ रोजीं स्टीनटर्म नांवाच्या जर्मन जहाजांतून अँटवर्प येथून जुलै महिन्यांत पाठवावयाचा माल पाठविण्यांत आला. या मालापैकीं कांहीं माल बेल्जम देशांत त-यार झाला असून कांहीं जर्मनींत तयार झालेला होता. ता. ४ आगष्ट सन १९१४ रोजीं इंग्लंड व जर्मनी यांचे दरम्यान युद्ध सुरू झालें त्यावेळीं स्टीनटर्म हें जहाज समुद्रावरच होतें. नंतर एका ब्रिटिश क्रूझरानें तें जहाज आंतील मालासकट पकडलें व निकालाकरतां तें कोलंबो येथें ने-ण्यांत आलें. प्राईज कोर्टानें जहाज निकामी करण्याबद्दल हुकूम केला परंतु त्यावरील माल सोडून दिला. सरकारी खर्चानें सदहू माल कलकत्यास आणण्यांत आला. नंतर माल आला आहे असें सरकारनें खरेदी देणारास कळविलें व त्यानें खरेदी घेणारानें सरकारांत कांहीं जादा रक्कम भरून आपला माल ताब्यांत घ्यावा असें तावडतोब खरेदी घेणारास कळविलें. वादीनें असें न केल्यामुळें प्रतिवादीनें खरेदी घेणाराच्या जोखमीवर व खरेदी घेणाराच्या करितां म्हणून मालाची विक्री केली. करार मोडल्याबद्दल व नुकसानीबद्दल आणलेल्या दाव्यांत पुढील ठराव करण्यांत आलाः

**ठरावः**—रक्कम देण्याच्या कालसंबंधानें जी शर्त होती तींत बदल केल्यामुळें सी. आय. एफ्. शर्तीवर झालेल्या करारानें स्वरूप बदललें नाहीं.

ता. २ फेब्रुवारी सन १९१४ रोजीं झालेल्या करारांत प्रतिवादींनीं माल जहाजांतून पाठवि-ण्यासंबंधाचा करार करून त्या करारप्रमाणें माल हुबळी येथें पोंचवावा असा एक गर्भित करार होता.

वादी व प्रतिवादींच्या दरम्यान झालेल्या करारांत माल जहाजांतून पाठविण्यासंबंधाचा करार करून तो हुबळी येथें पोंचता करणें या कृत्याचा समावेश होत होता व कराराच्या आक्टाचें कलम ५६ मधील अर्थाप्रमाणें लढाईस सुरवात झाल्यावर हा करार पुरा करणें अशक्य झालें, आणि यामुळें ता. २ फेब्रुवारी सन १९१४ चा करार निरर्थक झाला. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४५ पृ. २८; न्या. पु. ५३ क. दि. नि. पृ. २ व ३).

६. **जमीन सरकारनें सक्तीनें घेतल्यामुळें भाडेकऱ्याचें झालेलें नुकसान.**— स्थावर मिळकतीसंबंधाचा भाडेपट्टा चालू असतां सदर स्थावर मिळकत जमिनी घेण्याबाबद आक्टाअन्वयें (सन १८९४) सरकारनें सक्तीनें घेतल्यास व त्यामुळें करार पूर्ण करणें अशक्य झाल्यास भाड्यानें घेतलेल्या जमिनीचा कबजा गेल्यामुळें झालेली नुकसानी भाडेपट्टा करून घेणारापासून भरून घेण्याचा हक्क भाडेकऱ्यास आहे. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४४ पृ. २२९; न्या. पु. ५७ अ. दि. नि. पृ. १७.).

कायदेशीर गोष्ट करण्याची वचनें जर प्रथम आहेत आणि मग गैरकायदेशीर गोष्टी करण्याची वचनें आहेत, तर प्रथम चीं करारांदाखल, आणि दुसरी निरर्थक कबुलीदाखल होत.

**५७.** जर मनुष्य परस्पर वचनें देतील आणि तीं अशीं कीं, पहिलीं, कांहीं अमुक गोष्टी करावयाच्या अशीं, आणि त्या गोष्टी कायदेशीर आहेत, आणि दुसरी, अमूक कांहीं झालें किंवा असले तर, दुसऱ्या अमूक कांहीं गोष्टी करावयाच्या अशीं, पण त्या गोष्टी गैरकायदेशीर आहेत, तर पहिलीं वचनें जीं असतील तीं करारादाखल समजावीं, परंतु दुसरीं वचनें निरर्थक कबुलायतीदाखल समजलीं पाहिजेत.

## उदाहरण.

अ आणि ब हे, अनें बला १०,००० रुपयास एक घर विकत द्यावें, पण जर ब त्यांत जुगार खेळण्याचा अड्डा घालील तर बनें त्या घराचे अला ५०,००० रुपये द्यावे अशी कबुलायत करितात.

यांतील पहिलीं परस्पर वचनें करारादाखल होत, म्हणजे तीं हीं कीं, घर विकत द्यावें आणि त्याचे १०,००० रुपये द्यावे.

दुसरीं परस्पर वचनें गैरकायदेशीर विषयाची आहेत, आणि तो गैरकायदेशीर विषय हा कीं बनें त्या घरांत, जुगाराचा अड्डा घालावा. आणि तीं निरर्थक कबुलीदाखल समजावीं.

## विशेष समजुतीची टीप.

एखादी गोष्ट घडल्यानंतर, करारांतील शर्तीप्रमाणें दरांतील फरकाची रक्कम घेण्याची अथवा देण्याची पात्रता उत्पन्न होईल एवढ्यावरून, सदर गोष्ट न घडल्यास तो करार पैजेच्या स्वरूपाचा होईल, असा नियम स्थापित करण्यास अधिकार नाहीं. कराराच्या आक्टाचें कलम ५७ च्या अंतर्भूत तत्वाशीं सदर परिणाम विरोधी आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३४ पृ. ५१९; न्या. पु. ४५ मुं. दि. नि. पृ. २६९).

विकल्पी वचन असून एक पक्ष गैर कायदेशीर आहे तर कायदेशीर पक्ष मात्र अमलांत आणतां येईल.

५८. जें वचन विकल्पी आहे आणि त्याचा एक पक्ष कायदेशीर असून दुसरा गैर कायदेशीर आहे तर कायदेशीर पक्ष मात्र अमलांत आणतां येईल.

### उदाहरण.

अ आणि ब करार करितात कीं, अनें बला १,००० रुपये द्यावे, आणि त्याबद्दल अनें मागाहून तांदूळ अथवा कायद्याविरुद्ध आणलेली अफू द्यावी.

तर तांदूळ देण्याविषयीं हा कायदेशीर करार झाला, पण अफूविषयींची निरर्थक कबुलायत होय.

### विशेष समजुतीची टीप.

आपण जी रक्कम देत आहों ती अमूक एक दर्जाच्या फेडींत देत आहों असें रिणकोनें रक्कम देतांना सांगितलें पाहिजे; अथवा सरकारनें आपण सदर रक्कम अमूक कर्जाच्या फेडींत घेत आहों असें रक्कम घेतांना सांगितलें पाहिजे. याप्रमाणें दोघांपैकीं कोणीही सदहू रक्कम एखाद्या विशिष्ट कर्जाच्या फेडींत लावली नसल तर कायद्याप्रमाणें सदर रक्कम सर्वांत पहिल्यां कर्जाच्या फेडीकडे लावली पाहिजे. (इ. ला. री. अ. सी. व्हा. ३७ पृ. ६४८; न्या. पु. ५० अ. दि. नि. पृ. ५१).

### दिलेल्या पैशाचा विनियोग.

अमूक कर्ज फेडण्याकरितां ही रक्कम देतों असें दर्शविलें असल्यास त्या रकमेचा विनियोग.

५९. जर रिणकोनें एकाच मनुष्याचीं अनेक पण अगदीं पृथक् अशीं कर्जें द्यावयाचीं आहेत, आणि तो रिणको कांहीं पैसा त्याला देईल व अमूक एक कर्ज फेडण्याकरितां ही रक्कम देतों असें स्पष्टपणें कळवील अगर ती रक्कम अशा रीतीनें देईल कीं, अमूक कर्ज फेडण्याबद्दल ती आहे असें अनुमान होईल तर त्री दिलेली रक्कम घेतल्यास तिचा विनियोग तें विशेष कर्ज फेडण्याकडेस केला पाहिजे.

### उदाहरणें.

(अ.) अनें बचीं कित्येक कर्जें द्यावयाचीं आहेत, त्यांत कदवा लिहून देऊन घेतलेलें १,००० रुपयांचें एक कर्ज आहे, आणि तें तारीख १ जून रोजीं फेडलें पाहिजे. त्यानें बचें त्याच रकमेचें दुसरें कर्ज द्यावयाचें नाहीं. जूनच्या पहिल्या तारखेस अ हा बला १,००० रुपये आणून देतो. तर ह्या रकमेचा सदहू कदव्याची फेड करण्याकडे विनियोग केला पाहिजे.

(ब.) अनें बचीं कित्येक कर्जें द्यावयाचीं आहेत, त्यांत ५६७ रुपयांचें

एक आहे. व हा अला लिहून ती रक्कम देण्याविषयीं मागणें करतो. अ हा ५६७ रुपये बला पाठवितो. तर ह्या रकमेचा विनियोग, बनें ज्या कर्जाविषयीं मागणें केलें होतें तें फेडण्याकडेस, केला पाहिजे.

कोणत्या कर्जाच्या फेडण्याकडेस लावावी असें कळविलें नसल्यास दिलेल्या रकमेचा विनियोग.

६०. कोणतें कर्ज फेडण्याकडेस दिलेल्या पैशाचा विनियोग करावा हें रिणकोनें कळविलें नसेल, आणि तें समजण्यास दुसरीं कांहीं कारणें नसतील, तर धनकोनें ती रक्कम आपल्या मर्जीप्रमाणें, त्या रिणकोनें त्याचें खरोखर देणें आणि त्याला द्यावयाचें असें कोणतेंही जें कायदेशीर कर्ज असेल तें फेडण्याकडेस योजावी; मग त्यावेळीं दाव्यांच्या मुदतीविषयीं चालू असलेल्या कायद्यावरून तें कर्ज मिळण्याजोगें असो किंवा नसो.

## विशेष समजुतीची टीप.

दोन गहाणां पैकीं एका गहाणांत दरसाल दर शेंकडा १२ टक्के प्रमाणें चक्रवाढ व्याज देण्याबद्दल ठराव होता व दुसऱ्या गहाणखतांत सरळ व्याज देण्याबद्दल ठराव होता. रिणकोनें दिलेले पैसे सरळ व्याजाच्या गहाणखताच्या फेडीकडे धनकोनें लावले आणि दुसऱ्या गहाणखतांतील चक्रवाढ व्याज वाढूं दिलें. तो रिणको मयत झाल्यावर चक्रवाढ व्याज देण्याबद्दलच्या गहाणावरून रिणकोच्या वारच्यांवर दावा करण्यांत आला. पूर्वी केलेल्या फेडीच्या रकमा या गहाणखताचे फेडीकडे न लावतां सरळ व्याजाच्या गहाणखताच्या फेडीकडे धनकोनें लाविल्या तें त्यानें बरोबर केलें नाहीं अशी तक्रार करण्यांत आली.

ठरावः—रिणकोनें दिलेल्या पैशाचा विनियोग कोणतें कर्ज फेडण्याकडेस धनकोनें करावा तें रिणकोनें कळविलें नसेल, तर धनकोनें ती रक्कम आपल्या मर्जीप्रमाणें त्याला घ्यावयाचें असें कोणतेंही जें कायदेशीर कर्ज असेल तें फेडण्याकडेसच लावावी असा सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम ६० यांत जो ठराव आहे तो नेहमींचा साधारण नियम आहे. चक्रवाढ व्याज देण्याबद्दलचें गहाणखत करून देण्यापूर्वी तें करून देण्यास रिणको नाखूष होता असें शाबीत केलें असतां तेवढ्यावरून, त्यानें धनकोस ज्या रकमा दिल्या त्या त्याच गहाणाची पहिल्यानें फेड करण्याचे उद्देशानें दिल्या होत्या असें म्हणतां येणार नाहीं. ( इं॰ ला. री. क. सी. व्हा. २६ पृ. ३९; न्या. पु. ३४ क. दि. नि. पृ. १ ).

जर दोहोंतून एकाही पक्षकाराकडून विनियोग झाला नसेल तर दिलेली रक्कम कशी योजावी.

६१. जर दिलेल्या रकमेचा दोहोंतून एकाही पक्षकाराकडून विनियोग झाला नसेल तर ती रक्कम कालानुक्रमानें कर्जें फेडण्याकडेस योजिली पाहिजे, मग तीं कर्जें दाव्यांच्या मुदतीविषयीं त्या वेळीं चालू असलेल्या कायद्यावरून रद्द झालेलीं असोत अथवा नसोत. जर कर्जें एकाच काळचीं असतील तर प्रत्येक कर्ज हिस्सेरसीनें फेडण्याकडेस त्या रकमेचा विनियोग केला पाहिजे.

## जे करार पुरे करण्याची जरूर नाहीं त्याविषयीं.

ज्या ऐवजीं दुसरे केले, जे रहित केले, जे बदललें, ते करार पुरे करण्याची जरूर नाहीं.

६२. जर एखाद्या करारांतील पक्षकार त्या कराराबद्दल नवा करार करण्यास, किंवा तो करार रहित करण्यास किंवा बदलण्यास कबूल होतील, तर तो मुळचा करार पुरा करणें जरूर नाहीं.

( अ. ) अनें कांहीं कराराअन्वयें बचे रुपये द्यावयाचे आहेत. नंतर अ, ब आणि क यांजमध्यें अशी कबुलायत होते कीं, त्या वेळापासून बनें अला सोडून देऊन कला आपला कर्जदार असें समजावें. तर अनें बचें देणें असलेलें जें पूर्वील कर्ज त्याचा यावरून निकाल झाला, आणि कनें बला द्यावयाचें असें एक नवीन कर्ज करारानें ठरलें.

( ब. ) अनें बचे १०,००० रुपये द्यावयाचे आहेत. अ, बचीं तोड करतो आणि १०,००० रुपयांच्या पूर्वील कर्जाऐवजीं ५,००० रुपयांस आपली इस्टेट बजवळ गहाण ठेवितो. तर हा नवा करार झाला आणि तेणेंकरून मुळच्या कराराचा निकाल झाला.

( क. ) अनें बचे कांहीं कराराअन्वयें १,००० रुपये देणें आहेत. बनें कचे १,००० रुपये द्यावयाचे आहेत. अनें आपल्या हिशोबीं १,००० रुपये कच्या नांवें जमा करावे असा ब हा अला हुकूम देतो, परंतु त्या गोष्टीला अ हा आपली संमति देत नाहीं. तर बनें अचे १,००० रुपये अजून द्यावयाचे आहेत असें समजलें पाहिजे आणि नवा करार उत्पन्न झाला असें नाहीं.

### विशेष समजुतीच्या टिपा.

१. वादीच्या कोणत्याही फर्स्टक्लास आगबोटींतून, बीं व गहूं वगैरे मिळून ३७५ टन धान्य भाड्यानें पाठविण्याबद्दल प्रतिवादीनें सन १८९१ सालच्या एप्रिल महिन्यांत वादीबरोबर करार केला. तो माल वादीनें सुरक्षितपणें पोंचविण्याचें कबूल केलें होतें हें उघड आहे. तो माल जून महिन्यांत पाठवावयाचा होता. माल भरून घेण्यास आगबोट तयार आहे, अशी वादीकडून नोटीस झाल्यावर दुसरे दिवशीं त्याचे अगोदर प्रतिवादीनें सर्व माल वेळेवारी बंदरांवर तयार ठेवावा ह्मणजे तो सर्व माल एकदम भरतां येईल आणि प्रतिवादीनें तसें केलें नाहीं, तर ठरलेला भाड्याचा दर आणि त्या दिवसाचा बाजारभावाचा भाड्याचा दर यांत जा फरक असेल त्या मानानें प्रतिवादीनें वादीचें नुकसान भरून द्यावें, अशी शर्त होती. जी आगबोट यावयाची आहे तिचें नांव काय व ती बहुतकरून कधीं येईल तें कळविल्यास मेहेरबानी होईल, अशा मजकुराचें पत्र प्रतिवादीनें वादी यास ता. २९ मे सन १८९१ रोजीं लिहिलें. जी आगबोट यावयाची आहे तिचें नांव एस. एस. कौंटी आफ यार्क असें आहे, असें वादीनें प्रतिवादीस ता. ३ जून रोजीं उत्तर पाठविलें आणि त्याच पत्रांत खालीं ताजाकलमांत असें लिहून कळविलें कीं, ता. १२ जून रोजीं किंवा त्या सुमारास माल भरण्यास ती आगबोट तयार होईल. ती आगबोट ता. १० जून रोजीं मुंबईचे बंदरांत येऊन पोंचली, परंतु कांहीं न समजलेल्या कारणावरून तींत माल घे-

ण्यास जागा रिकामी नव्हती व ता. २३ जून पर्यंत माल घेण्यास ती तयार झाली नव्हती. दरम्यान ता. १८ जून रोजीं प्रतिवादीनें वादीस असें लिहून कळविलें कीं, ता. १२ जून रोजीं माल भरण्यास ती आगबोट तयार होईल, असें तुम्हीं कळविल्यावरून त्या तारखेस माल तयार ठेवण्याबद्दल मी टेलिग्राफ करून व्यवस्था केली, परंतु तुमची आगबोट त्या दिवशीं तयार नसल्यामुळें माझे करार पुरे करण्यासाठीं मला तो माल दुसऱ्या आगबोटींतून पाठविणें भाग पडलें, याप्रमाणें पत्र लिहून प्रतिवादीनें तो करार नाकबूल केला. तेव्हां, वादीनें ती आगबोट प्रतिवादीकरितां दुसऱ्यास भाड्यानें दिली आणि तसें करण्यांत आलेलें नुकसान घेण्याकरितां हा दावा आणिला.

ठरावः—प्रतिवादीस आगबोट पुरविण्यास वादीस सर्व जून महिन्याची मुदत होती. सबब मुळच्या करारांत बदल होण्यास कांहींच घडून आलें नव्हतें. आणि याजकरितां या दाव्यांत आपल्यासारखा निकाल करून घेण्याचा वादीस हक्क आहे. ती आगबोट कोणत्या तारखेस येण्याचा संभव आहे, याबद्दल प्रतिवादीनें चौकशी केल्यावरून, ती आगबोट ता. १२ जून रोजीं किंवा त्या सुमारास माल घेण्यास तयार राहील म्हणून वादी यानें प्रतिवादी यास ता. ३ जून रोजीं जो जबाब पाठविला होता, तो एकादा नवीन करार नसून त्यानें आपला अभिप्राय प्रदर्शित केला होता. सबब प्रतिबंधाचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं.

आंपल्या आगबोटीवरून माल पाठविणारे लोकांस ह्मणजे प्रतिवादीसुद्धां सर्व लोकांस वादी यानें ता. २२ जून सन १८९१ रोजीं पुढें लिहिल्याप्रमाणें नोटीस दिली:—"कौंटी आफ याके नांवची आगबोट माल घेण्याकरितां उद्यां ज्या पेक्षां गोदींत येणार आहे त्यापेक्षां ता. २८ च्या आंत तुह्मीं आपला सर्व माल बंदरावर घेऊन यावा अशी आमची विनंती आहे वगैरे." (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १६ पृ. ३८९; न्या. पु. २७ मुं. दि. नि. पृ. १२६ व १२७).

२. कापूस व बी विकत देण्याबद्दलचे व घेण्याबद्दलचे करारनाम्यावरून बाकी येणें राहिलेल्या रकमा घेण्यासाठीं वादी यांनीं, शिवजी प्रागजी याचे असायनी या नात्यानें प्रतिवादीवर दावा केला. सदहू करार सट्याच्या पैजेच्या स्वरूपाचा असल्यामुळें त्याजवरून दावा चालत नाहीं अशी प्रतिवादीनें तक्रार केली.

प्रतिवादी हा प्रत्यक्ष माल देऊन किंवा घेऊन व्यापार करणारा नव्हता व त्यानें सदहू करार केवळ सट्यानें केले होते. करार करण्याची त्याची अशी रीत असे कीं कोणताही माल खरेदी देणें किंवा घेणें याजबद्दल करार करावयाचा आणि तोच माल पुन्हां मालकास खरेदी द्यावयाचा किंवा त्याजपासून घ्यावयाचा आणि कराराचा दिवस येण्यापूर्वीच आपल्यास नफा किती झाला किंवा नुकसान किती आलें तें ठरवावयाचें. ते करार व्यापारी रीतीप्रमाणें करावयाचे व करार पुरे होईपर्यंत दलाल मार्फत व्यवहार करावयाचा व मालकांचा एकमेकांशीं संबंध ठेवूं द्यावयाचा नाहीं. शिवाजी प्रागजी याचाही व्यवहार असाच होता. शिवाजी हा एक मुकदम होता व वादी हमी भरणारा तो दलाल होता व तोही या प्रमाणेंच सट्याचें व्यापार करी परंतु जरूर पडलीच तर प्रत्यक्ष माल देण्यास व घेण्यास तयार असे.

ठरावः—ज्या करारावरून दावा झाला आहे ते करार पैजेच्या स्वरूपाचे नाहींत. अशा प्रकारचा धंदा हा अगदीं सट्याचे स्वरूपाचा आहे, परंतु पैजेच्या स्वरूपाच्या कराराबद्दल जसा विरुद्ध कायदा आहे तसा सट्याचे स्वरूपाच्या व्यवहारा विरुद्ध कायदा नाहीं. करार करणारा दोघांही पक्षकारांचा उद्देश कोणतेही प्रसंगीं माल एकमेकांस देण्याचा किंवा घेण्याचा न-

सेल तर मात्र तो करार पैजेच्या स्वरूपाचा होतो, एरव्ही होत नाहीं. हल्लींच्या या कज्जांत, आपले दलाल आपले तर्फेनें कोणाबरोबर करार करतील हें प्रतिवादीस माहीत नसल्यामुळें केव्हां तरी आपल्यास माल द्यावा किंवा घ्यावा लागण्याचा संभव आहे असें प्रतिवादीसही माहीत होतें असें समजलें पाहिजे.

प्रतिवादीनें आणखी अशीही तक्रार केली आहे कीं, सदहू करार माझे संमतिवांचून वादीस लावून देण्याचा शिवाजी प्रागजी यास अधिकार नव्हता आणि तशी संमति देण्याविषयीं त्यानें मला विचारलें नव्हतें किंवा मी तशी संमति दिली नव्हती, सबब वादीचा हा दावा चालत नाहीं.

**ठराव:**—प्रतिवादीची ही तक्रार चांगली आहे. कोणताही करार दुसऱ्यास लावून देण्याचें काम कायदेशीर होण्यास त्या करारांतील दुसऱ्या पक्षकाराची संमति घेणें जरूर असतें.—सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम ६२.

तथापि शिवाजी प्रागजी यास वादींत सामील करून ती चूक दुरुस्त करण्याची परवानगी देण्यांत आली.

अशा प्रकारच्या करारावर शेरा मारून तो करार दुसऱ्याचे स्वाधीन केला असतां त्याचा कायदेशीर परिणाम काय होतो याजबद्दल या कज्जांत विचार झालेला आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १६ पृ. ४४१; न्या. पु. २७ मुं. दि. नि. पृ. १३५ व १३६ ).

३. एका रिणकोनें आपली सर्व स्थावर जंगम मिळकत एका इसमास तबदील करून दिली. सदर तबदिलीबद्दल जो नोंदलेला दस्तऐवज झाला होता त्यांत सावकारास द्यावयाचें कर्ज फेडण्याची जबाबदारी आपणावर आहे हें तबदील करून घेणारानें कबूल केलें होतें. ही कबुली सावकारास कळविली होती; व ती त्यानें मान्य केली होती.

**ठराव:**—( १ ) सावकार व तबदील करून घेणारा यांजमध्यें झालेल्या व्यवस्थेमुळें कराचाचा आक्ट कलम ६२ मधील अर्थाप्रमाणें नवीन करार होत नाहीं. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४१ पृ. १३७; न्या. पु. ४९ क. दि. नि. पृ. ५ ).

४. **कलमाचा हेतू.**—करार मोडल्यानंतर एका कराराच्या जागीं दुसरा करार करणें, करार रद्द करणें अगर करारांत फेरबदल करणें या गोष्टीस मोबदला पाहिजे असें ज्यावरून ध्वनित होईल अशी कोणतीही गोष्ट कराराच्या आक्टाचें कलम ६२ मध्यें नाहीं. यासंबंधानें इंग्लंडांतील कायद्यांतील तत्व हिंदुस्थानांत लागू पडत नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४५ पृ. १८०; न्या. पु. ५७ म. दि. नि. पृ. ७ ).

५. **पहिल्या हुंडीच्या ऐवजी दुसरी अपुरा स्टांप लावलेली हुंडी दिली होती.**—**ठराव:**—पूर्वीच्या हुंडीच्या ऐवजीं अपुरा स्टांप लावलेली हुंडी देण्यांत आली होती. सदर हुंडीवरून लावलेला दावा हुंडीस योग्य स्टांप नाहीं या मुद्यावर चालण्यासारखा नसेल तर, सावकारास पूर्वीच्या हुंडीचा आधार घेतां येईल. वादीस असें करण्यास कराराच्या आक्टाचें कलम ६२ मधील ठरावामुळें हरकत येत नाहीं. दुसऱ्या हुंडीची कायद्याप्रमाणें अम्मलबजावणी करतां आली असती तरच त्यामुळें पहिली हुंडी रद्द झाली असती. ( इं. ला. री. ला. सी. व्हा. ४ पृ. १५१; न्या. पु. ५८ ला. दि. नि. पृ. ८ व ९ ).

**६३. वचन घेणारास दिलेलें वचन पुरें करावयाचें त्या प्रतिज्ञेविषयीं प्रत्येक**

वचन घेणारा वचनाच्या पूर्ततेविषयीं मुक्त करील किंवा माफी देईल.

वचन घेणारा मुक्त करूं शकेल, अथवा एकंदर किंवा अंशतः माफी देऊं शकेल, अथवा पुरें करण्याची मुदत वाढवूं शकेल, अथवा त्याला योग्य वाटेल त्याप्रमाणें त्या ऐवजीं पाहिजे तें घेऊन निकाल करूं शकेल.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा बला एक तसबीर रंगवून देण्याचें वचन देतो. ब हा मागाहून त्यास रंगवूं नको म्हणून सांगतो. तर यानंतर तें वचन अनें पुरें करणें जरूर नाहीं.

( ब. ) अनें बचें ५,००० रुपये देणें आहेत. जेथें आणि जेव्हां ५,००० रुपये द्यावयाचे होते तेथें आणि तेव्हां, सर्व ५,००० रुपयांबद्दल, अ २,००० रुपये बला देतो, आणि ब ते स्वीकारून घेतो, तर सर्व कर्ज फिटलें असें समजलें पाहिजे.

( क. ) अनें बचे ५,००० रुपये देणें आहेत. क हा बला १,००० रुपये देतो, आणि बचें अ जवळ जें कर्ज येणें त्या सर्वाऐवजीं तो ब तें स्वीकारून घेतो. तर येणेंकरून सर्व कर्ज फिटलें असें झालें.

( ड. ) कांहीं कराराअन्वयें अनें बचा कांहीं पैसा द्यावयाचा आहे. हा किती तें ठरलें नाहीं. पैसा किती द्यावयाचा आहे तें ठरविल्याशिवाय अ हा बला २,००० रुपये देतो आणि ब येणें असलेल्या सर्व पैशा ऐवजीं ते रुपये स्वीकारून घेतो. तर सर्व कर्ज किती असेल तें असो; तें आतां सर्व फिटलें असें समजलें पाहिजे.

( ई. ) अनें बचे २,००० रुपये द्यावयाचे आहेत, आणि दुसऱ्या लोकांचेंही कर्ज द्यावयाचें आहे. अ हा ब सुद्धां आपल्या धनकोंची तोड करतो: आणि रुपयास आठ आणे प्रमाणें त्यांच्या त्याच्या कर्जाबद्दल द्यावे असें करतो. बला १,००० रुपये दिले तर बचें कर्ज फिटलें असें समजावें. ( हें उदाहरण सन १८९१ चा आक्ट १२ परिशिष्ट २ वरून दुरुस्त केलें आहे ).

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम ६३ वरून पाहतां, वचन देऊन मात्र पूर्ततेविषयीं मुक्तता अथवा माफी देतां येते. मुक्ततेविषयीं किंवा माफीसंबंधी सूचना केली असली पाहिजे व ती मान्य केली असली पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २८ पृ. ६६; न्या. पु. ३९ मुं. दि. नि. पृ. ४० ).

२. ची. ज. व्हाईटः—करार करणारांनीं जी मुदत ठरविली असेल ती मुदत करार करून देणाराच्या संमत्तीशिवाय करार करून घेणारास वाढविण्याचा हक्क कराराचा आक्ट कलम ६३ अन्वयें करार करून घेणारास नाहीं. त्याचप्रमाणें करार मोडल्यामुळें जबर नुकसानी मि-

ळण्याच्या आशेनें मोडलेला करार कायम ठेवण्याचा अधिकार कलम ५५ अन्वयें करार करून घेणारास नाहीं.

ज. एलिंगः—करार करून देणारास ज्यांचा फायदा मिळेल अशा ज्या सवलती करार करून घेणारास देतां येतात त्यांचा विचार कलम ६३ मध्यें केला आहे. करार करून घेणारानें आपल्या फायद्याकरितां कराराची मुदत वाढविली असल्यास सदर कृत्याचें समर्थन कलम ६३ अन्वयें करतां येणार नाहीं. ( इं. ला. रि. म. सी. व्हा. ३७ पृ. ४१२; न्या. पु. ४९ म. दि. नि. पृ. २४ ).

३. चेक स्वीकारल्यानें कबुली ठरत नाहीं.—धनको हे एक विशिष्ट रक्कम मागत आहेत हें माहीत असून रिणकोनें त्यापेक्षां कमी रकमेबद्दलचा चेक देण्याच्या पूर्ण फेडीस्तव म्हणून पाठविला होता. धनकोनें हा चेक स्वीकारून पाठविला व चेक ज्या शर्तीवर पाठविला होता ती शर्त आपणांस कबूल नाहीं असें धनकोनें रिणकोस कळविलें होतें.

ठरावः—धनकोनें चेक स्वीकारिला यामुळें धनकोस शर्त कबूल होती असें निर्णायक रीतीनें शाबीत होत नाहीं व बाकी राहिलेल्या रकमेबद्दल दावा करण्यास यामुळें धनकोस प्रतिबंध होत नाहीं. ( इं. ला. रि. अ. सी. व्हा. ४४ पृ. ७१८; न्या. पु ५७ अ. दि. नि. पृ. ५३ ).

**६४.** जेव्हां एकाद्या मनुष्याचे इच्छेवरून एकादा करार निरर्थक करण्याजोगा आहे, आणि तो मनुष्य सदरहू करार रहित करतो, तेव्हां त्या करारांतील दुसरा पक्षकार त्यांतील कोणत्याही वचनाचा ' वचन देणारा ' असेल तें वचन त्या दुसऱ्याला पुरें करणें जरूर नाहीं. निरर्थक करण्याजोगा असा करार जो पक्षकार रहित करील त्याला त्या करारांतील दुसऱ्या एकाद्या पक्षकाराकडून त्या करारामुळें कांहीं नफा झाला असेल, तर त्यानें तो नफा, ज्याजकडून तो झाला असेल, त्याला शक्त्यनुसार परत दिला पाहिजे.

निरर्थक करण्याजोगा करार रहित करण्याचा परिणाम.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. एनें ता. २४ फेब्रुवारी सन १९०३ रोजीं बीबरोबर बीच्या मालकीच्या जमिनी रुपये ४१००० ला खरेदी घेण्याचा करार केला. या रकमेपैकीं रुपये ४००० आगाऊ देण्यांत आले. बाकीची रुपये २०००० ची रक्कम गहाणावर उभी करून यावयाची व बाकीची रक्कम ता. २४ मे सन १९०३ च्या पूर्वीं द्यावयाची व खरेदीखत ता. २४ मे सन १९०३ रोजीं करून द्यावयाचें असें ठरलें होतें. खरेदी घेणारानें बाकीची रक्कम देण्यास विलंब लावल्यास त्याचा ४००० रुपयांवरील हक्क नष्ट व्हावा अशी करारांत शर्त होती. खरेदी देणारानें खरेदीखत खरेदी घेणाराच्या अथवा तो सांगेल त्या इसमाच्या नांवें करून द्यावें असें ठरलें होतें विक्रीचा हा करार अंशतः पुरा करण्याकरितां सदर जमिनींपैकीं कांहीं जमीन ता. २८ मार्च सन १९०३ रोजीं एमच्या नांवानें खरेदी करून देण्यांत आली रक्कम देण्यासाठीं जो दिवस मुक्रर ठरला होता त्या दिवसापूर्वीं एक दिवस ठरलेल्या दिवशीं एनें रक्कम न दिल्यास आपण करार रद्द झाला असें समजूं अशी नोटीस बीनें एला दिली. एनें ठरलेल्या तारखेपूर्वीं करार पुरा केला नाहीं. नंतर बीनें सदर जमिनी त्रयस्थ इसमास विकल्या. एनें सदर जमिनीबद्दल जी किंमत

द्यावयाची ठरविली होती त्यापेक्षां सदर व्यवहारांत बीला १५०० रुपये जास्त मिळालें. करार विशिष्ट रीतीनें पुरा करण्याकरितां अगर अगाऊ दिलेले ४००० रुपये परत मिळण्याकरितां एनें बीवर दावा लावला. सबार्डिनेट जज्जानें करार विशिष्ट रीतीनें पुरा करण्याबद्दलचें वादीनें मागणें न देतां रुपये ४००० प्रतिवादीनें वादीस परत द्यावे असा हुकुमनामा केला. बीनें यावर अपील केलें.

ठराव:—( ज. सदाशिव अय्यर यांचे भिन्न मत होतें ) रु. ४००० परत मिळण्याचा हक्क वादी ए यास नाहीं. अशा रीतीनें अगाऊ दिलेल्या रकमेस कराराचा आक्ट ( सन १८७२ चा ९ ) कलम ६४ अगर ७४ लागू पडत नाहीं; करारांतील शर्त मोडल्यास सदर रकमेवरील हक्क नष्ट होण्याबद्दलची शर्त दंडाच्या स्वरूपाची नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३८ पृ. १७८; न्या. पु. ५० म. दि. नि. पृ. १५ व १६ ).

२. **विक्रीपासून उत्पन्न होणारा फायदा.**—एका पालन करणारानें जीं कारणें पाल्यावर बंधनकारक होणार नाहींत अशा कारणाकरितां पाल्याच्या जमिनी विकल्या व या विक्रीच्या रकमेंतून नंतर पाल्याकरितां पालन करणारानें दुसऱ्या जमिनी खरेदी घेतल्या. परंतु या विशिष्ट जमिनी खरेदी घेणें हा विचार पालकाच्या मनांत जमिनी विकल्या त्यावेळीं नव्हता; व पहिल्या विक्रीच्या व्यवहाराचा दुसरा खरेदीचा व्यवहार हा एक भाग होता असें म्हणतां येत नव्हतें. अशा रीतीनें खरेदी घेतलेल्या जमिनी या कराराच्या आक्टाचे कलम ६४ प्रमाणें विक्रीपासून उत्पन्न होणारा फायदा या सदरांत येत नसून विक्री रद्द होण्यापूर्वी सदर्हू जमिनी खरेदी घेणारास परत देणें हें पाल्यांवर बंधक नव्हतें. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४२ पृ. ३६; न्या. पु. ५४ म. दि. नि. पृ. ५ ).

३. एखादें अल्पवयी मुलानें गहाणाचा व्यवहार केला असेल तर तो व्यवहार निरर्थक होण्याजोगा आहे इतकेंच नाहीं परंतु तो सर्वथैव निरर्थक आहे.

अधिकार असलेल्या पक्षकारांचे दरम्यान झालेल्या करारास मात्र सन १८७२ च्या कराराच्या आक्टाचीं कलमें ६४ व ६५ लागू पडतात आणि ज्या बाबतींत करार झालेला नाहीं किंवा मुळांचं करार होऊं शकत नाहीं त्या बाबतींस तीं कलमें लागू पडत नाहींत. ( इं. ला. री. म. सी. व्हा. २६ पृ. ३४२; न्या. पु. २९ अ. दि. नि. पृ. २३ ).

निरर्थक कबुलायतीमुळें अथवा जो करार निरर्थक होतो त्यामुळें ज्याला फायदा झाला असेल त्याची जबाबदारी.

६५. जेव्हां एखादी कबुलायत निरर्थक आहे असा शोध लागेल, अथवा जेव्हां एखादा करार निरर्थक होईल, तेव्हां त्या कबुलायतीमुळें किंवा करारामुळें ज्या कोणास कांहीं फायदा झाला असेल त्यानें सदर्हू फायदा ज्यापासून झाला असेल त्याला, तो परत दिला पाहिजे अथवा त्याऐवजीं त्याची नुकसानी भरून दिली पाहिजे.

## उदाहरणें.

( अ. ) अची मुलगी क हिच्याशीं आपण लग्न करितो असें बनें वचन दिलें, त्याबद्दल अ हा बला १,००० रुपये देतो. वचन झालें त्या वेळीं क मरून

गेली होती. तर कबुलायत निरर्थक होय; पण बनें ते १,००० रुपये अला परत दिले पाहिजेत.

(ब.) अ हा मेच्या पहिल्या तारखेपूर्वी २५० मण तांदूळ बला देण्याविषयीं बशीं करार करतो. अनें त्या तारखेपूर्वी १३० मण तांदुळाचें माप घेतलें, आणि त्यानंतर कांहीं नाहीं. बनें १३० मण तांदूळ ता. १ ली मेच्या नंतर आपल्या ताब्यांत ठेवून घेतले. तितक्याबद्दल किंमत बनें अला दिली पाहिजे.

(क.) अ ही कोणी एक गायन करणारी बाई आहे आणि ब हा एका नाटकशाळेचा कारभारी आहे. अनें बशीं असा करार केला कीं, आपण बच्या नाटकशाळेंत येत्या दोन महिन्यांत दर आठवड्यास दोन रात्रीं याप्रमाणें गावें; आणि ब अशी बोली करता कीं, गाईलेल्या दर रात्रीस रु. १०० अला आपण देईन. सहाव्या रात्रीं अही मुद्दाम नाटकशाळेंतून गैरहजर रहाते, आणि त्या कारणानें ब करार रहित करितो. तर अनें पांच रात्रीं गाणें गाईलें त्याबद्दल बनें तिला पगार दिला पाहिजे.

(ड.) अ १,००० रुपयांला ब करितां एका संगीतसमयीं गाण्याचा करार करते, आणि ते १,००० रुपये तिला आगाऊ दिले आहेत. अ इतकी आजारी पडते कीं, तिच्यानें गाणें होत नाहीं. तर जर अच्यानें गावलें असतें तर बचा जो फायदा झाला असता, त्याबद्दल नुकसानी बला अनें भरून द्यावयाची नाहीं, पण जे १,००० रुपये तिला आगाऊ दिले होते ते तिनें परत केले पाहिजेत.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. प्रतिवादी यानें सन १८९६ चे एप्रिल महिन्यांत आपल्या वखारींतील एक खोली १२ महिने पर्यंत माल ठेवण्यासाठीं रक्कम रुपये १४५९ यांस वादींस भाड्यानें दिली व त्याचप्रमाणें त्याच वखारींतील दुसरी एक खोली रक्कम रुपये १३६८ यांस १२ महिन्यांचे करारानें दिली. वादींनीं त्या खोल्यांचा ताबा घेतला. नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें सन १८९६ चें आगष्ट महिन्यांत वादींनीं प्रतिवादी यास भाड्याच्या दोन्हीं रकमा आगाऊ दिल्या व प्रतिवादीपासून त्याजबद्दल पावती घेतली. वादींकडून कांहींएक कसूर न होता ता. ३० आक्टोबर सन १८९७ रोजीं त्या दोन खोल्यांसुद्धां ती सर्व वखार आग लागून जळून गेली व माल ठेवण्याच्या अगदीं निरुपयोगी झाली. तेव्हां वादी यांनीं भाड्याबद्दल भरलेल्या पैशाची हिस्सेरशीनें बाकी घेण्यासाठीं प्रतिवादीवर दावा केला. ट्रान्सफर आफ प्रापर्टी आक्टाचें कलम १०८ रक्कम (इ) आणि सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम ६५ याजवर वादींचा भरंवसा होता.

ठरावः—ती रक्कम परत घेण्याचा वादींस हक्क आहे. सर्व वर्षाकरितां ती रक्कम देण्यांत आली होती. ती भाडेचिठ्ठी निरर्थक झाली आहे आणि याजकरितां कराराच्या आक्टाचें कलम ६५ वरून बाकीच्या मुदतीचें भाडें परत देणें प्रतिवादीस भाग आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २३ पृ. १५; न्या. पु. ३४ मुं. दि. नि. पृ. १).

२. प्रतिवादीनें आपल्या पुतणीचा वादीचे पुत्राशीं विवाह करण्याबद्दल वचन दिलें होतें व मोबदल्याबद्दल प्रतिवादीला १८०० रुपये देण्याचे वादीनें कबूल करून सदर पक्षकारांचे दरम्यान एक करार झालेला होता, परंतु तो विवाह घडून येण्यापूर्वी वादीचा पुत्र लग्नापूर्वीच मयत झाला, परंतु त्या कराराप्रमाणें, वादीचा पुत्र मरण पावण्यापूर्वी वादीनें प्रतिवादीला रक्कम रुपये ७५० दिले होते. त्या नंतर, ती रक्कम परत घेण्यासाठीं वादीनें दावा केला त्या वेळेस, सदहू करार लमंदलालीच्या स्वरूपाचा असल्यामुळें तो राजनीतीविरुद्ध झाला होता, आणि म्हणून तो निरर्थक होता, आणि म्हणून कराराच्या आक्टाचें कलम ६५ प्रमाणें पहातां, सदर करारास अनुसरून दिलेला पैका परत मागतां येत नाहीं, अशी प्रतिवादीनें तक्रार केली.

**ठरावः**—पक्षकारांचे दरम्यानच्या करारांचें स्वरूप लक्षांत घेतां, सदर रक्कम प्रतिवादीपासून परत घेण्याचा वादीस हक्क पोंचतो.

एकाद्या करारावरून मिळलेला फायदा परत करण्याविषयीं कराराच्या आक्टाचे कलम ६५ यांत ठराव आहे. करार व कबुलायत यांमध्यें आक्टांत जो फरक केला आहे तो फरक त्या कलमांतही कायम ठेवला आहे. जेव्हां एकादी कबुलायत निरर्थक आहे असा शोध लागेल—इतकेंच त्या कलमामध्यें सामान्य रीतीनें झटलें आहे व त्यामध्यें ती कबुलायत निरर्थक होण्याचे कारणासंबंधानें स्पष्ट निर्देश केलेला नाहीं; आणि म्हणून कायद्याच्या तत्वाच्या कारणामुळें जी कबुलायत निरर्थक झाली असेल ती कबुलायत कारणामुळें त्या कलमाच्या व्याप्तीच्या बाहेर पडणार नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३३ पृ. ४११; न्या. पु. ४४ मुं. दि. नि. पृ. १३३ व १३४).

३. **ज. शहा यांचा ठरावः**—भागदारी आक्टाप्रमाणें करार निरर्थक आहे असें जेथें जेथें आढळून येईल तेथें तेथें कोर्टानें नुकसानभरपाई दिलीच पाहिजे असें कराराचा आक्ट (सन १८७२ चा आक्ट ९) कलम ६५ प्रमाणें अगर जिजीभाई विरुद्ध नागजी (११ मुं. ला. री. पृ. ६९३) च्या कज्जांतील ठरावाप्रमाणें कोर्टावर बंधक नाहीं. करार निरर्थक आहे असें आढळून आलें आहे काय, व कलम ६५ मध्यें ठरविल्याप्रमाणें कोणत्याही इसमाचा सदर करारामुळें फायदा झाला आहे किंवा काय, अगर कज्जांतील कराराप्रमाणें नुकसानभरपाईचा हुकूम करणें योग्य आहे काय, हें प्रत्येक कज्जांत ठरविलें पाहिजे. नुकसानभरपाईची रक्कमही प्रत्येक कज्जांतील परिस्थितीकडे लक्ष देऊन ठरविली पाहिजे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३८ पृ. २४९; न्या. पु. ४९ मुं. दि. नि. पृ. ८९ व ९०).

४. **अज्ञान प्रतिवादी बरोबर केलेल्या करारास हें कलम लागू पडत नाहीं.**—प्रतिवादीस विकलेल्या मालाच्या किंमतीची रक्कम वसूल करण्याकरितां वादीनें प्रतिवादीवर दावा लावला. व्यवहाराचे वेळीं आपण अज्ञान होतों अशी प्रतिवादीनें तक्रार केली. प्रतिवादी हा अज्ञान होता असें कोर्टानें ठरविलें व वादीचा दावा रद्द केला. यावर हायकोर्टाकडे केलेल्या अर्जांत माल परत देणें अगर त्याची किंमत देणें ही गोष्ट कराराच्या आक्टाचें कलम ६५ प्रमाणें प्रतिवादीवर बंधनकारक आहे अशी तक्रार करण्यांत आली. सदहू रूल काढून टाकण्यांत येऊन पुढील ठराव करण्यांत आलाः

**ठरावः**—करार करण्यास कायद्याप्रमाणें ज्या इसमास अधिकार आहे अशा इसमांच्या दरम्यान करार झालेला आहे असें गृहीत धरून त्याच्या आधारें कलम ६५ मधील ठराव करण्यांत आला आहे. जेथें करार झालेला नाहीं अगर करार होणें शक्य नव्हतें अशा स्थलीं सदहू कल-

मोतील ठराव लागू पडत नाही. ( इं. लॉ. री. मुं. सी. व्हा. ४५ पृ. २२५; न्या. पु. ५६ मुं. दि. नि. पृ. १९ ).

५. **निरर्थक करारांचे बाबतींत मोबदला परत मिळण्याबद्दल दावा.**—हिंदू विधवेच्या ताब्यांत स्थावर मिळकत असून त्या मिळकतीचा त्या वेळीं जो सर्वांत नजीकचा उत्तराधिकारी वारस होता अशा हिंदू इसमानें सदर मिळकत खरेदी देण्याबद्दल व कबजा मिळाल्यावर मिळकतीची तबदिली करून देण्याबद्दल केलेला करार बेकायदेशीर आहे. वर नमूद केलेल्या करारासारखा करार अमलांत आणतां येईल तर ट्रान्सफर आफ प्रापर्टी आक्टाचें ( सन १८८२ ) कलम ६ ( अ ) मध्यें भविष्यकाली कदाचित् मिळणाऱ्या हक्काच्या तबदिली विरुद्ध जो ठराव करण्यांत आला आहे तो निरर्थक होईल.

. . विशिष्ट परिस्थितीच्या अभावीं करार बेकायदेशीर आहे असें निदर्शनास आल्यामुळें दिलेली रक्कम परत घेण्याबद्दल कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ ) कलम ६५ प्रमाणें घडणारें दाव्याचें कारण अशा कराराच्या बाबतींत कराराच्या तारखेसच घडतें. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ५० पृ. ९२९; न्या. पु. ५८ क. दि. नि. पृ. २२ ).

६. **लग्नाच्या मध्यस्तीबद्दल दिलेली रक्कम.**—लग्नाच्या मध्यस्तीबद्दल रक्कम देण्याचा करार हा बेकायदेशीर व मूळपासूनच निरर्थक असतो; व लग्नाच्या मध्यस्थीबद्दल दिलेली रक्कम करार अगर त्याचा महत्वाचा भाग पूर्ण केला नसल्यास परत मिळवितां येत. अशा कराराचा अंतर्भाव कराराच्या आक्टाचें कलम ६५ मध्यें होत नाहीं. येथें इंग्लंडातील कायद्याचा नियम लागू करावयाचा असतो.

कराराप्रमाणें मिळकतीची केलेली तबदिली पोकळ असली अगर खरी असली तरी हा नियम लागू पडतो. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४१ पृ. १९७; न्या. पु. ५३ म. दि. नि. पृ. ११ ).

७. **करार फेरबदल करणाऱ्या पक्षास नुकसान मागण्याचा हक्क.**—दुसऱ्या पक्षाच्या संमतीशिवाय व त्यास न कळवितां एका पक्षानें लेखी झालेल्या करारांत महत्वाचा फेरबदल केल्यास करारांत फेरबदल करणाऱ्या पक्षास करार मोडल्याबद्दल नुकसानी मिळण्याचा हक्क रहात नसून फक्त विसारादाखल दिलेली रक्कम परत मिळण्याचा हक्क राहतो. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४३ पृ. ७०३; न्या. पु. ५५ क. दि. नि. पृ. ३५ ).

८. **अज्ञान प्रतिवादीपासून खर्च देवविणें.**—ज्या व्यवहारावरून दावा लावला आहे तो व्यवहार ज्या वेळीं झाला त्या वेळीं प्रतिवादी हा अज्ञान होता अशी प्रतिवादीनें तक्रार केली असून त्याचा निकाल प्रतिवादीतर्फे झाला असेल तर प्रतिवादीपासून वादीचा खर्च देवविण्यास हें पुरेसें कारण होत नाहीं; कारण, प्रतिवादीच्या कोणत्याही कृत्यामुळें अगर विधानामुळें प्रतिवादीच्या खऱ्या वयाबद्दल वादीचा गैरसमज करण्यांत आला होता असें ज्यावरून ध्वनित होईल अशी कोणतीही गोष्ट येथें अस्तित्वांत नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४० पृ. ५५८; न्या. पु. ५३ अ. दि. नि. पृ. ३५ ).

९. **सट्टयाच्या व्यवहाराकरितां ठेवलेली रक्कम.—ठराव:**—सट्टयाच्या व्यवहाराकरितां दुसऱ्याजवळ ठेवलेली रक्कम परत मिळण्याकरितां लावलेला दावा चालत नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४२ पृ. ४४९; न्या. पु. ५५ अ. दि. नि. पृ. २८ ).



१०. **खरेदीची रक्कम परत मिळण्याचा हक्क.**—काही ... मिळकतीमधील फैस-

त्यांतील रिणकोचे हितसंबंध हुकुमनाम्याच्या बजावणींत जप्त होऊन विकण्यांत आले. विक्री कायम होण्यापूर्वी फैसल्यांतील रिणकोनें खाजगी रीतीनें तीच मिळकत विकली. खरेदी देणारांनीं केलेल्या कोणत्याही कृत्यामुळें अगर खरेदी देणारांनीं एखादी गोष्ट न केल्यामुळें खरेदी घेणारास खरेदी घेतलेल्या मिळकतीचा कबजा न मिळाल्यास खरेदी घेणारास खरेदीची रक्कम व्याजासकट परत मिळण्याचा हक्क राहील अशी एक शर्त सदहू खरेदीच्या वेळीं घातलेली होती. खरेदी घेणारानें बजावणीच्या कामीं झालेली विक्री रद्द करण्याबद्दल अर्ज केला परंतु त्यांत त्यास यश न येतां विक्री कायम झाली. नंतर खाजगी रीतीनें मिळकत विकत घेणाऱ्या इसमानें मोबदल्याची रक्कम परत मिळण्याकरितां खरेदी देणारावर दावा लावला.

ठरावः—करारांतील शर्तींमध्यें यासंबंधानें स्पष्टपणें तर्तूद केलेली नसली तरी कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ ) कलम ६५ मधील ठरावाप्रमाणें खरेदी घेणारास खरेदीची रक्कम परत मिळण्याचा हक्क आहे. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४२ पृ. ७; न्या. पु. ५५ अ. दि. नि. पृ. १ व २ ).

६६. निरर्थक करण्याजोगा करार रहित केल्यास तसें केल्याचें वर्तमान कळविणें असेल तर, किंवा रहित केलेलें फिरविलें असें कळविणें असेल तर, तें कळविणें, सूचना कळविण्याचा अथवा रद्द करण्याचा जो प्रकार आणि त्याविषयींचे जे नियम, त्या प्रकारानें आणि त्या नियमांस अनुसरून केल्यास चालेल.

निरर्थक करण्याजोगा करार रहित केला असें किंवा फिरविलेले रहित केलें असें कळविणें झाल्यास त्याचा प्रकार.

## विशेष समजुतीची टीप.

ज. सदाशिव अय्यर.—ज्या दोन इसमांच्या दरम्यान करार झाला होता त्यां पैकीं एका इसमाचें आपण करार रद्द केला होता असें म्हणणें असलें तरी करार अस्तित्वांत नाहीं या गोष्टीच्या आधारें सदर इसमास कायद्याच्या कोर्टांकडून दुसऱ्या कांहीं दादी मिळवयाच्या असतील तर त्यानें सदर करार कायद्यानें दिलेल्या मुदतींत व या देशांतील कायद्यास अनुसरून कोर्टांकडून रद्द करून घेतलाच पाहिजे. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३८ पृ. ३२१; न्या. पु. ५० म. दि. नि. पृ. २८ व २९ ).

६७. जर वचन घेणारा हा वचन देणारास आपलें वचन पुरें करण्यास जी योग्य सवड पाहिजे ती त्याला देण्यास हयगय किंवा तक्रार करील तर त्या हयगयीमुळें अथवा नकारामुळें वचन पुरें होणें राहिल्यास त्याविषयीं वचन देणारास माफी आहे.

करार पुरा करण्यास जी योग्य सवड वचन देणारास पाहिजे ती देण्यास वचन घेणारानें हयगय केल्यास त्याचा परिणाम.

## उदाहरण.

अ हा बचें घर दुरुस्त करण्याचा करार बशीं करतो.

पर कोणकोणते ठिकाणीं दुरुस्त करावयाचें तें दाखविण्यास ब हयगय

किंवा नकार करतो, तर त्या हयगयीमुळें अथवा नकारामुळें करार पुरा करणें राहिल्यास त्याविषयीं बरी माफी आहे.

## बाब ५ वी.

### करारामुळें उत्पन्न झालेल्या संबंधासारखे जे कित्येक संबंध त्यांविषयीं.

करार करण्यास जो नालायक त्याला किंवा त्या तर्फे दुसऱ्या कोणास दिलेल्या अन्नवस्त्राबद्दल हक्क.

६८. जो मनुष्य करार करण्यास लायक नव्हे त्यास, अथवा ज्याचे पालन-करणें त्या नालायकास कायद्यावरून भाग आहे, अशा मनुष्यास, त्याच्या योग्यतेनुसार कोणी दुसरा मनुष्य अन्नवस्त्र देईल तर तें देणारास त्या नालायक मनुष्याच्या मालमत्तेंतून त्याबद्दलचा खर्च मिळाला पाहिजे.

#### उदाहरणें.

(अ.) ब हा मनुष्य वेडा आहे, त्याच्या योग्यतेनुसार त्याला अ अन्नवस्त्र देतो. तर बच्या जिंदगींतून अला खर्च भरून मिळाला पाहिजे.

(ब.) अ हा ब ह्या वेड्याच्या बायकोस व मुलांस त्यांच्या योग्यतेनुसार अन्नवस्त्र देतो. तर त्याबद्दल अला बच्या जिंदगींतून खर्च भरून मिळाला पाहिजे.

#### विशेष समजुतीची टीप.

अ यानें ता. २० एप्रिल सन १८८६ रोजीं एका अल्पवयी मनुष्यास कांहीं रक्कम कर्जाऊ दिली व त्याजकडून रोखा लिहून घेतला व तो योग्य रीतीनें नोंदविला. दरवड्याच्या चार्जावरून त्या अल्पवयी मनुष्यावर जी फौजदारींत कामें चालविलीं होतीं त्या कामांत जबाब देण्यासाठीं त्या अल्पवयी मनुष्यानें ते पैसे कर्जाऊ घेतले होते व त्या पैशाचा त्यानें त्याच कामाकडे उपयोग केला. अ यानें त्या रोख्यावरून ता. १८ जून सन १८९२ रोजीं त्या अल्पवयी मनुष्यावर एक दावा केला. तो दावा झाला ते वेळेस तो अल्पवयी मनुष्य वयात आला नव्हता. सबब त्या अल्पवयी मनुष्याचे तर्फे अशी तक्रार करण्यांत आली कीं, अनें दिलेली रक्कम अ यास परत देण्यास तो पात्र नाहीं; ते पैसे जरूरीचे कामाकरितां काढले नव्हते; त्या रोख्यावरून त्या अल्पवयी मनुष्यास जबाबदार धरितां येत नाहीं आणि तो रोखा नोंदला आहे एवढ्या गोष्टीवरून वादीस मदत होऊं शकत नाहीं आणि जरूरीचे कारणाकरितां ते पैसे घेतले होते असें जरी मानलें तरी ते पैसे दिल्याचे तारखेपासून तीन वर्षांहून जास्त मुदत होऊन गेली असल्यामुळें त्या दाव्यास मुदतीची हरकत आली आहे.

**ठराव:**—त्या अल्पवयी मनुष्यावर दरवडा घातल्याच्या गुन्ह्याचा आरोप असल्यामुळें त्याच्या स्वतंत्रतेस बाध येणार असल्यामुळें त्यास जे पैसे देण्यांत आले ते कराराच्या आक्टाचें कलम ६८ प्रमाणें जरूरीच्या कारणाकरितां त्यानें कर्जाऊ घेतले होते; असें समजलें पाहिजे. (इं. ला. री. क. सी. व्हा. २१ पृ. ८७२; न्या. पु. २९ क. दि. नि. पृ. ३८ व ३९).

कोणी मनुष्यानें पैसा द्यावयाचा असून तो त्याजकडून दिला जातो कीं नाहीं अशाशीं ज्याचा संबंध आहे त्यानें तो दिल्यास त्याचा खर्च भरून देणें.

६९. कोणी मनुष्यानें कांहीं पैसा कायद्यावरून दिलाच पाहिजे, आणि तो त्याजकडून दिला जातो किंवा नाहीं या गोष्टीशीं ज्याचा संबंध आहे असा एक तिसरा मनुष्य आहे, आणि त्यामुळें तो तिसरा मनुष्य ती रकम देईल, तर त्याबद्दल त्याचा खर्च त्या पहिल्या मनुष्याकडून भरून आला पाहिजे.

## उदाहरण.

ब हा बंगालमध्यें अ ह्या जमिनदाराचा धारेकरी आहे. अनें सरकारास द्यावयाचा सारा बाकी राहिल्यामुळें त्याच्या जमिनीचें लिलांव होणार आहेत अशी सरकारांतून जाहिरांत लागली. ते लिलांव झाले तर मुलकी कायद्याअन्वयें बचा धारेकरीपणा रद्द होईल. म्हणून लिलांव होऊन त्यामुळें आपला धारेकरीपणा रद्द न व्हावा म्हणून अ जवळून सरकारचा जो सारा यावयाचा आहे, तो बनें दिला तर बनें दिलेला तो पैसा त्याला अनें भरून दिला पाहिजे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. या कलमांचे पहिले पारिग्राफांत ‘ आणि तो त्याजकडून दिला जातो किंवा नाहीं या गोष्टीशीं ज्याचा संबंध आहे ’ म्हणजे तो पैसा त्याजकडून देण्यांत आला तर ज्याचा फायदा होणार आहे व तो न देण्यांत आला तर ज्याचें नुकसान होणार असा एक तिसरा मनुष्य.

२. वादी हा पत्री संस्थानचा मुख्य आहे आणि कमिजला गांव हा त्या संस्थानच्या गांवांपैकीं एक गांव आहे. वादीच्या पूर्वजानें पुष्कळ वर्षांपूर्वी प्रतिवादींचे पूर्वजास ‘ जिवकगिरास ’ हकानें तो गांव दिला असल्यामुळें तो प्रतिवादींकडे होता. ‘ जिवकगिरास ’ म्हणजे राजकर्त्यां कुटुंबांतील इतर लोकांस अन्नवस्त्राकरितां दिलेली मिळकत. सन १८६९ चा मुंबई आक्ट ३ ( लोकलफंड आक्ट ) पास झाल्याचे तारखेपासून तो सन १८८४ सालापर्यंत, सदर्हू आक्टाअन्वयें त्या गांवावर बसविलेला लोकलफंड, वादी सरकारांत भरीत असे आणि नंतर तो प्रतिवादींपासून वसूल करीत असे. सन १८८४ चा मुंबई आक्ट १ ( लोकलबोर्ड आक्ट ) पास झाल्यानंतर, प्रतिवादींपासून लोकलफंड वसूल करण्याचे वादीचे हकाबद्दल तंटे उपस्थित झाले. त्या गांवचा “ वरिष्ठ धारणकरणारा ” वादी नसून प्रतिवादी आहेत आणि तसे ते असल्यामुळें सरकारांत लोकलफंड भरण्यास प्रतिवादी जबाबदार आहेत, असें सन १८८८ सालीं मुंबई सरकारनें ठरविलें, पुढें तो ठराव स्टेट सेक्रेटरींनीं कायम केला. तेव्हां, प्रतिवादी हे त्या गांवचे वरिष्ठ धारणकरणारे नाहींत आणि परभारे सरकारांत लोकलफंड भरण्याचा त्यांस हक नाहीं, परंतु त्यांजपासून लोकलफंड वसूल करण्याचा आणि तो सरकारांत भरण्याचा आपल्यास हक आहे, असें ठरवून घेण्याकरितां वादीनें हा दावा केला. सन १८८८ सालापासून सन १८९५ सालापर्यंत त्या गांवाबद्दल वादीनें जो लोकलफंड भरला होता तो घेण्याबद्दल आणि प्रतिवादींनीं परभारे सरकारांत लोकलफंड भरूं नये, अशी त्यांस ताकीद देण्याबद्दलही वादीनें मागणें केलें होतें.

ठरावः—असा ठराव झाला कीं, वादी हा त्या संस्थानचा मुख्य असल्यामुळें, प्रति-

वादींनीं सरकारास लोकलफंड न दिल्यामुळें त्यांचा गांव खालसा होण्याची भीती उत्पन्न होईल ते वेळेस लोकलफंड सरकारांत देण्याचा वादीस हक्क प्राप्त होईल. तशा प्रसंगीं सन १८७२ चा कराराचा आक्ट ९ कलम ६९ वरून लोकलफंडाची रक्कम प्रतिवादींपासून घेण्यासाठीं दावा करण्याचा वादीस हक्क प्राप्त होईल, परंतु हल्लींच्या या कज्जांत तसा प्रसंग उत्पन्न झाला होता किंवा उत्पन्न होण्याचा संभव होता असें दिसत नाहीं. कराराच्या आक्टाचें कलम ७० या कज्जास लागू पडत नाहीं, कारण, वादीनें प्रतिवादीकरितां कायदेशीर रीतीनें लोकलफंड भरला होता असें म्हणतां येत नाहीं. तो भरण्याबद्दल प्रतिवादींनीं वादीस अधिकार दिला नव्हता आणि तो भरण्याची वादीवर जबाबदारी नव्हती. सबब फिर्यादअर्जीत मागणें केल्याप्रमाणें सन १८९८ सालापासून सन १८९५ सालापर्यंत भरलेली लोकलफंड परत घेण्याचा वादीस हक्क नाहीं. सबब वादीचा दावा रद्द केला पाहिजे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २६ पृ. ५०४; न्या. पु. ३७ मुं. दि. नि. पृ. २१६ ).

३. **जी रक्कम देणें कायद्यानें वादीस बंधक होतें.**—केच्या मालकीची बरीच मिळकत होती. त्यानें त्या मिळकतीपैकीं कांहीं भाग सन १८७८ सालीं आपल्या मुलीच्या नवऱ्यास (वादी) बक्षीस दिला. जी जमीन बक्षीस देण्यांत आली होती तिची जुडी आपण देऊं अशी स्पष्ट शर्त बक्षीसपत्रांत होती. सन १९०२ सालीं केनें बाकीची सर्व मिळकत बीला बक्षीस दिली. या संबंधाच्या बक्षीसपत्रांत सन १८७८ सालच्या बक्षिसाचा विशेष उल्लेख केला असून त्यांतील शर्तीप्रमाणें बक्षीस घेणारानें वागावें अशी आज्ञा त्यांत केलेली होती. प्रथम के हा जुडी भरीत असे व नंतर बी हा जुडी भरीत असे. सन १९०५ सालीं बीनें सदर मिळकत प्रतिवादीस बक्षीस दिली. या बक्षीसपत्रांतही सन १८७८ सालच्या बक्षिसाचा उल्लेख होता परंतु बक्षीस घेणारानें त्या बक्षिसपत्रांतील शर्तीप्रमाणें वागावें अशा प्रकारचे शब्द त्या बक्षीसपत्रांत नव्हते. प्रतिवादीनें सरकारांत जुडी न भरल्यामुळें वादीस ती भरावी लागली सदर जुडीची रक्कम प्रतिवादीपासून मिळण्याकरतां दावा लावला.

**ठरावः**—कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ चा आक्ट ९ ) कलम ६९ प्रमाणें प्रतिवादीपासून सदर रक्कम मिळण्याचा वादीस हक्क आहे; कारण, जी रक्कम देण्यांत वादीचा हितसंबंध होता अशी रक्कम देणें हें कायद्याप्रमाणें वादीवर बंधक होतें व ती रक्कम वादीनें दिलेली आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४२ पृ. ९३; न्या. पु. ५३ मुं. दि. नि. पृ. ६ ).

४. **इनामदार व कुळ-सारा देण्याची जबाबदारी.**—जुडीची रक्कम एकवट रकमेनें इनामदारानें सरकारास द्यावयाची असते. कबजेदार कुळापासून सारा वसूल करण्याचा हक्क इनामदारानें आपल्या निष्काळजीपणामुळें गमाविल्यास ज्या जमिनीवरील सारा घेण्याचा हक्क नष्ट झाला आहे त्या जमिनीबद्दलची जुडी देण्याची जबाबदारी जमिनीच्या कबजेदारावर येते असें म्हणतां येत नाहीं. यामुळें अशा बाबतीमध्यें कराराच्या आक्टाचें कलम ६९ प्रमाणें ( सन १८७२ ) कबजेदार कुळांकडून जुडी वसूल करण्याचा हक्क इनामदारास नसतो. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा ४५ पृ. ६३८; न्या. पु. ५६ मुं. दि. नि. पृ. ५५ ).

५. फक्त कांहीं कुळांविरुद्ध भाड्याबद्दल झालेल्या हुकुमनाम्याच्या बजावणीमध्यें, सर्व कुळांचा संबंध हक्क विकण्यांत आला. भाड्याबद्दल आणलेल्या दाव्यांत प्रतिवादी नसलेल्या एका कुळानें जमिनीमधील आपल्या हक्कसंबंधाचें संरक्षण होण्याकरितां, झालेली विक्री रद्द व्हावी म्हणून सि. प्रो. कोड कलम ३१० अ मध्यें ठरविलेली रक्कम कायद्याप्रमाणें व कोर्टाच्या परवा-

नगीनें कोर्टांत ठेविली. झालेल्या विक्रया रद्द करण्यांत आल्या; व त्यामुळें भाव्याबद्दल आणलेल्या दाव्यांतील प्रतिवादी आपल्या पात्रतेमधून मुक्त झाले.

ठराव:—वादीला अनेक प्रतिवादींवर हुकुमनाम्यांत ठरविलेल्या रकमे पैकीं त्याच्या हिश्शाबद्दल हिस्सेरशीचा दावा लावण्याचा अधिकार आहे. सि. प्रो. कोड कलम ३१० अ अन्वयें खरेदीच्या रकमेच्या शेकडा ५ प्रमाणें रक्कम अर्जदारास कोर्टांत भरावी लागते. वादीनें अशा रीतीनें भरलेल्या रकमेबद्दल वादीस दावा लावतां येणार नाहीं.

चौ. ज. जेनकिन्स:—कराराचा आक्ट कलम ७० मधील ठराव अशा दाव्यास लागू पडतो. सदर कलमांतील ठराव विस्तृत असला तरी, ज्या इसमांमधील परस्पर हक्कसंबंध करारानें उत्पन्न झाले आहेत असें म्हणतां येणार नाहीं, अशा दाव्यांत कोर्टास सदर कलमामुळें योग्य न्याय देतां येतो, परंतु घडलेल्या गोष्टीसंबंधाचा अखेरचा निर्णय करण्याचें काम ज्या कोर्टाकडे असतें त्यांनीं निर्णय करतांना फार सावधगिरी व हुषारी बाळगिली पाहिजे; आणि मुद्दाम केलेलीं कृत्यें व रकमेचा भरणा कोर्टानें कायम करतां कामा नये.

ज. डास:—प्रस्तुतच्या कज्जास कराराचा आक्ट कलम ७० लागू पडत नाहीं; कारण, वादीनें कोर्टांत केलेला भरणा हा स्वतःच्या पात्रतेंतून मुक्त होण्याकरितां केला, असें कायद्याप्रमाणें मानलें पाहिजे; दुसऱ्या एखाद्या इसमाचें कर्ज फेडण्याकरितां केला असें मानतां येत नाहीं. सह-हिस्सेदार कुळांवर भाव्याबद्दलची असलेली पात्रता ही सर्वांवर संयुक्त असते इतकेंच नाहीं तर ती प्रत्येकावर स्वतंत्रपणें असते. कराराचा आक्ट कलमें ४३, ६८, ६९, ७२, १४६ अथवा २२२ अन्वयें वादीस दाद मिळण्यासारखी असतां कराराचा आक्ट कलम ७० चा उपयोग करण्यांत यावा असा कायदे करणारांचा हेतु नव्हता. प्रस्तुतच्या दाव्यास कराराचा आक्ट कलम ६९ लागू पडतें. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३८ पृ. १; न्या. पु. ४६ क. दि. नि. पृ. १ व २ ).

६. बेकायदेशीर कृत्य करणाऱ्या इसमाविरुद्ध दाद लाऊन घेण्याच्या मार्गासंबंधानें कराराचा आक्ट कलम ६९ व ७० मध्यें कोणत्याही प्रकारें उल्लेख केला नसल्यामुळें प्रस्तुतच्या अपिलांत जो प्रश्न उत्पन्न झाला आहे त्या प्रश्नाचे संबंधानें तीं कलमें गैर लागू आहेत. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४० पृ. ५९८; न्या. पु. ४८ क. दि. नि. पृ. ३१ ).

७. ज्याची किंमत पैशांत करतां येईल असा तोटा, अडचण अथवा नुकसानी होण्याची ज्या इसमास भीति असेल त्या इसमाचा, कलम ६९ मधील अर्थाप्रमाणें रक्कम देण्यांत हितसंबंध आहे.

दुसऱ्या एखाद्या इसमाच्या कर्जाकरितां एखाद्या इसमाची स्थावर मिळकत जप्त झाली असल्यास, मिळकतीचें संरक्षण करण्याकरितां सदर अर्ज देण्यांत त्या इसमाचा हितसंबंध आहे व ज्या इसमाला तें कर्ज देणें होतें त्याकडून तें कर्ज अशा इसमास वसूल करून घेतां येईल.

अशा परिस्थितींत रक्कम दिली तर तो भरणा आपखुषीचा नव्हता. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३३ पृ २३२; न्या. पु. ४५ म. दि. नि. पृ. ३० ).

८. एका जमिनदारीमधील कांहीं गांवांची हुकुमनाम्याच्या बजावणींत लिलांवानें विक्री झाली व तीं गांवें वादीनें खरेदी घेतलीं. सदर जमिनदारीचा प्रतिवादी नं. १ हा नोंदलेला धारण करणारा होता. प्रतिवादी नं. ६ यानें वादीप्रमाणेंच कांहीं दुसरीं गांवें खरेदी घेतलीं होतीं. हीं गांवें एजन्सी कोर्टाच्या अधिकारसीमेंत होतीं. वादीच्या खरेदीनंतर सरकारी सारा थकल्यामुळें त्यानें खरेदी घेतलेल्या गांवांपैकीं एक गांव सरकारनें जप्त केलें, रेव्हिन्यू खात्यामार्फत आपल्या

गांवाची विक्री होऊं नये येतद्व्याकरितां वादीनें सर्व जमिनदारांवर थकलेला सारा भरला. वादीनें जी रक्कम भरली होती ती प्रतिवादीपासून जातीनें व बाकीच्या जमिनदारांच्या विक्रीपासून आलेली जी रक्कम सरकारी तिजोरींत भरण्यांत आली होती त्या रकमेंतून वसूल करण्याकरितां वादीनें प्रतिवादी नं. १, प्रतिवादी नं. २ ते ५ ( हे अनुक्रमें प्रतिवादी नं. १ चे एकत्र कुटुंबांतील भाऊ, मुलगा व पुतण्या असे होते ); व प्रतिवादी नं. ६ याजवर दावा लावला. सर्व रक्कम देण्याची आपलेवर जबाबदारी नाहीं अशी तक्रार प्रतिवादीनें केली. आपलेविरुद्ध आणलेला दावा चालविण्याचा अधिकार सबार्डिनेट जज्जाच्या कोर्टाला नाहीं अशी प्रतिवादी नं. ६ नें आणखी तक्रार केली.

ठरावः—( अ ) सरकारी सारा जातीनें भरण्याबद्दलची जबाबदारी असणारा इसम ह्मणजे नोंदलेला धारण करणारा हा होय.

( २ ) एका सह-मालकानें एखाद्या मिळकतीवरील सरकारी सर्व सारा दिला तर त्यास बाकीच्या सह-मालकांविरुद्ध जातीनें हुकुमनामा मिळण्याचा हक्क प्राप्त होत नाहीं; कारण, बाकीचे सह-मालक हे नोंदलेले धारण करणारे नसल्यामुळें त्यांजवर सारा देण्याची जातीनें जबाबदारी येत नाहीं. परंतु त्यांच्या कबजांत ज्या जमिनी असतात त्यांजवर साऱ्याच्या रकमेचा बोजा असतो.

( ३ ) अशा दाव्यास कराराच्या आक्टाचें कलम ७० लागू पडत नाहीं.

( ४ ) प्रतिवादी नं. ६ नें जें गांव खरेदी घेतलें होतें त्या गांवांवर आपला बोजा अमलांत आणण्याकरितां प्रतिवादी नं. ६ वर लावलेल्या दाव्याची चौकशी करण्याचा अधिकार सबार्डिनेट जज्जाच्या कोर्टाला नाहीं; कारण, सदर जमिनी कोर्टाच्या अधिकारसीमेंत नाहींत.

( ५ ) हिस्सेरशीनें रक्कम मिळण्याकरितां लावलेल्या दाव्यास कराराच्या आक्टाचें कलम ६९ लागू पडत नाहीं; कारण, " रक्कम देण्यांत ज्याचे हितसंबंध आहेत असा इसम " ह्मणजे ज्या इसमावर सर्व रक्कम अगर त्या रकमेचा कांहीं हिस्सा देण्याची जबाबदारी नाहीं असा इसम असला पाहिजे.

( ६ ) हिस्सेरशीनें रक्कम मिळण्याबद्दलचा दावा फक्त प्रतिवादी नं. १ विरुद्ध लावण्याचा हक्क वादीस होता. प्रतिवादी नं. १ च्या ताब्यांत जी मिळकत होती त्या मिळकतीबद्दल जो सारा द्यावा लागला असेल तेवढीच रक्कम प्रतिवादी नं. १ पासून अगर सरकारी तिजोरींत जमा असलेल्या रकमेंमधून वादीस वसूल करण्याचा हक्क आहे. ( इं. ला. रि. म. सी. व्हा. ३९ पृ. ७९५; न्या. पु. ५१ म. दि. नि. पृ. ४४ व ४५ ).

९. दुसऱ्या गहाण घेणारानें पहिल्या गहाण घेणारास रक्कम देणें.—दुसऱ्या गहाण घेणारानें पहिल्या गहाण घेणारानें मिळविलेल्या हुकुमनाम्याची रक्कम दिल्यास त्यांस त्यानें रक्कम ज्या तारखेस दिली असेल त्या तारखेपासून गहाण मिळकतीवर बोजा प्राप्त होतो व गहाण देणारापासून जातीनें रक्कम वसूल करण्याचाही हक्क प्राप्त होतो. परंतु, हा दुसरा गहाण घेणारा हा पहिल्या गहाणाचा अगर हुकुमनाम्याचा येवजदार होतो असें कोणत्याही अर्थानें म्हणतां येत नाहीं. ( इं. ला. रि. अ. सी. व्हा. ४४ पृ. ६७; न्या. पु. ५७ अ. दि. नि. पृ. ५ व ६ ).

७०. जर कोणी एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याकरितां कांहीं कायदेशीर गोष्ट करील, अथवा कांहीं तरी वस्तु त्याच्या स्वाधीन करील, परंतु तसें करणें तें फुकट करावें अशा हेतूनें केलें नसेल, आणि तेणेंकरून त्या दुसऱ्या मनुष्यानें कांहीं फायद्याचा

फुकटवारी न केलेल्या कृत्यापासून फायदा भोगणारीची जबाबदारी.

उपभोग घेतला असेल, तर त्या गोष्टीऐवजीं त्या पाहिल्याचा खर्च भरून दिला पाहिजे, अथवा ती स्वाधीन केलेली वस्तु परत केली पाहिजे.

## उदाहरणें.

(अ.) अ हा एक व्यापारी आहे आणि तो चुकून कांहीं माल बच्या घरीं स्वाधीन करतो. ब तो माल आपला असें समजून वापरतो. तर त्याबद्दल त्यानें अला किंमत दिली पाहिजे.

(ब.) अनें बची जिंदगी आगीपासून बचावली. झालेल्या प्रकरणावरून जर असें दिसेल कीं अच्या मनांत त्याबद्दल कांहीं घ्यावयाचें नव्हतें, तर अला त्याबद्दल कांहीं पैसा मिळावयाचा नाहीं.

## विशेष समजुतींच्या टिपा.

१. प्रतिवादी नं. १ नें सन १८८३ सालीं आपल्या जमिनी गहाण ठेवल्या. सन १९०४ सालीं गहाण घेणारानें गहाणावरून दावा लाऊन गहाणावरील रकमेबद्दल व रकम न दिल्यास गहाण मिळकतीची विक्री करण्याबद्दल हुकुमनामा मिळवला. सन १९०५ सालीं गहाण मिळकतीची विक्री करण्याबद्दल गहाण घेणारानें अर्ज केला. त्याच सुमारास वादीनें प्रतिवादी नं. १ पासून दहा वर्षांच्या मुदतीनें सदर जमिनी खंडानें घेतल्या होत्या व जमिनीचा कबजा घेतला होता. नंतर थोड्याच दिवसांनीं प्रतिवादी नं. २ नें प्रतिवादी नं. १ वर मिळविलेल्या पैक्याच्या हुकुमनाम्याच्या बजावणींत सदर मिळकत विक्रीस काढण्यात आली व ती प्रतिवादी नं. २ नें स्वतः विकत घेतली. सन १९०७ सालीं गहाणावरून झालेल्या हुकुमनाम्याच्या बजावणींत सदर मिळकत विक्रीस काढण्यांत आली. परंतु प्रतिवादी नं. १ नें वादीपासून रुपये २४६३ कर्जाऊ काढले व गहाणाची रकम देऊन टाकली. नंतर वादीकडे गहाण ठेवलेल्या मिळकती पैकीं कांहीं मिळकत प्रतिवादी नं. १ नें रुपये ४००० ला विकली. या रुपये ४००० चा भरणा प्रतिवादी नं. १ ला दिलेले रुपये २४६३ व प्रतिवादी नं. १ ला जातीवर दुसऱ्या कर्जाऊ दिलेल्या रकमा मिळून झाला होता. सन १९०३ सालीं प्रतिवादी नं. २ नें जमिनीचा कबजा मिळण्याकरितां दावा लावला व कबजा मिळविला. प्रतिवादीपासून जातीनें अगर मिळकतीची विक्री करून रुपये ४००० मिळण्याकरितां वादीनें प्रस्तुतचा दावा लावला.

ठरावः—कराराच्या आक्टाचें (सन १८७२ चा आक्ट ९) कलम ७० प्रमाणें वादीस रुपये २४६३ देण्याची जबाबदारी प्रतिवादी नं. २ वर जातीनें नाहीं; कारण, प्रतिवादी नं. २ ला न विचारतां व प्रतिवादी नं. २ ला न कळवितां वादीनें स्वतः मध्यें पडून रकम दिली असल्यामुळे ती रकम प्रतिवादी नं. २ करितां देण्यांत आली असें ह्मणतां येत नाहीं.

प्रतिवादी नं. २ च्या ताब्यांत जी जमीन आहे तिजवर रुपये २४६३ चा बोजा ठेवतां येईल; कारण, वादी हा त्रयस्थ इसम असून त्यानें एका गहाणावरील देणें दिलें असल्यामुळें त्यास गहाण घेणाराच्या जागीं येण्याचा अधिकार आहे.

जी रकम कमी येईल ती जातीनें पुरी करण्याची जबाबदारी प्रतिवादी नं. १ वर आहे. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. ६४६; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. ३१२ व ३१३).

२. ज्यावर हुकुमनामा बंधक होता अशा इसमानें दिलेली रकम.—गहाण दे-

णाराचे वारचे असामी या नात्यानें गहाण घेणारा एकूस यानें ए. बी. व सी. यांजवर हुकुमनामा मिळविला. एनें हुकुमनामेवाल्याची सर्व रक्कम देऊन दोन तृतियांश हिश्शाची रक्कम बी. व सी. यांजपासून मिळण्याकरितां त्यांजवर दावा लावला. एला गहाण मिळकतींत कांहीं हितसंबंध नव्हते व त्यानें आपण होऊन गहाण घेणाराची रक्कम दिली आहे अशी प्रतिवादी बी. व सी. यांनीं तक्रार केली. गहाण मिळकतींत एचे हितसंबंध होते असें अव्वल कोर्टानें पुराव्यावरून ठरविलें, परंतु, एला गहाण मिळकतींत कांहीं हक्कसंबंध नव्हता असें ठरवून कनिष्ठ अपेलेट कोर्टानें वादीचा दावा रद्द केला.

ठरावः—ज्या इसमाविरुद्ध हुकुमनामा झाला होता व ज्या इसमावर तो बंधक होता अशा इसमानें हुकुमनाम्याची फेड करण्याकरितां रक्कम दिली असल्यास ती रक्कम कराराच्या आक्टाचे कलम ७० मधील अर्थाप्रमाणें कायद्याप्रमाणें दिलेली रक्कम होते. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४५ पृ. ६९१; न्या. पु. ५३ क. दि. नि. पृ. २१ व २२ ).

३. वादीच्या बापानें प्रतिवादीस एक गांव बक्षीस दिलें. सदर बक्षीसपत्रांत पुढें दिल्याप्रमाणें शर्त होतीः—" आम्हीं वांटणी करून सदर गांव तुमच्या नांवानें लाऊन घेऊं.

सदर हिश्शाप्रमाणें सरकारास पेशकशाबद्दल द्यावयाची ठरलेली रक्कम तुम्हीं द्यावी. "

ठरावः—वांटणी ज्या वेळीं झाली त्या वेळींच आपल्या हिश्शाची पेशकशाबद्दल प्रतिवादीनें किती रक्कम द्यावयाची हें नक्की झालें असल्यामुळें तेव्हांपासून पेशकशाची आपल्या हिश्शाची रक्कम देण्याची जबाबदारी प्रतिवादीवर आहे. वादीनें पेशकशाची सर्व रक्कम भरली असल्यामुळें वांटणीपासून पेशकशाची आपल्या हिश्शाची जी रक्कम भरण्याची प्रतिवादीवर जबाबदारी होती ती रक्कम प्रतिवादीपासून वसूल करण्याचा अधिकार कराराचा आक्ट कलम ७० अन्वयें वादीस आहे.

कराराचा आक्ट कलम ७० प्रमाणें अवश्य असलेल्या गोष्टी जेथें घडून आल्या असतील अशा सर्व स्थळीं सदर विषयासंबंधानें इंग्लंडांत कांहीं निकाल झाले असले तरी कराराचा आक्ट कलम ७० लागू करावें.

एखाद्या कृत्यास हरकत न करतां एखाद्या इसमानें सदर कृत्य मान्य करून अगर स्वीकारून त्याचा फायदा घेतला असल्यास त्यानें कराराचा आक्ट कलम ७० मधील अर्थाप्रमाणें सदर कृत्याचा फायदा घेतला आहे असें समजलें पाहिजे.

एखाद्या इसमास एखाद्या कृत्याचा फायदा नाकारण्याची मोकळीक असावी याचा अर्थ सदर इसमास सदर कृत्याचा फायदा देण्यापूर्वी सदर फायदा स्वीकारण्याची अगर नाकारण्याची संधी सदर इसमास दिली पाहिजे असा असल्यास कलम ७० प्रमाणें अशा प्रकारची मोकळीक प्रतिवादीस असण्याची अवश्यकता नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३८ पृ. २३५; न्या. पु. ५० म. दि. नि. पृ. १९ व २० ).

४. **खरेदी घेणारानें जास्त दिलेली रक्कम वजा मागण्याची तक्रार.**—एका बऱ्याच मोठ्या मिळकतीची विक्री करण्यांत आली तेव्हां खरेदी देणाराची खरेदी दिलेल्या मिळकतीशिवाय दुसरी एक मिळकत ज्या सावकाराकडे गहाण होती त्या गहाण घेणारास खरेदी घेणारानें खरेदी दाखल द्यावयाच्या रकमेपैकीं ठराविक रक्कम द्यावी व ती खरेदी देणारास देऊं नये असें खरेदी देणारा व घेणारा यांचे दरम्यान ठरलें. खरेदी देणाराच्या कांहीं कृत्यांमुळें खरेदीखताचा दस्तऐवज नोंदण्यास विलंब लागला; व यामुळें खरेदी घेणारांनीं गहाण घेणारास ठराविक रक्कम ताबडतोब

दिली नाहीं. खरेदी घेणारे हे गहाण घेणारास ठरलेली रक्कम देण्यास आले तेव्हां या रकमेपेक्षां आणखी जास्त रक्कम व्याजादाखल घेण झाली असल्या मुळ गहाण देणारांनां सदहू रक्कम घेण्याचें नाकारिलें. यावर गहाण घेणारे जी जास्त रक्कम मागत होते ती खरेदी घेणारांनीं दिली. नंतर खरेदीची जी रक्कम बाकी राहिली होती ती मिळण्याकरितां खरेदी देणारांनीं खरेदी घेणारांवर दावा लावला; व या दाव्यांत वर नमूद केल्याप्रमाणे व्याजादाखल खरेदी घेणारास जी जास्त रक्कम द्यावयास लागली होती तिची वजावाट करण्यांत यावी अशी तक्रार प्रतिवादीनें केली.

ठराव:—खरेदी घेणार जी वजावाट करून मागत आहे तशी वजावाट करण्याचा त्यांस हक्क नाहीं; कारण, व्याज दाखल जी रक्कम खरेदी घेणारांनीं दिली ती गहाण घेणारास जी रक्कम द्यावी असें ठरलें होतें त्या रकमेपेक्षां जास्त होती व या परिस्थितीत ती रक्कम खरेदी घेणारे प्रतिवादी यांनीं आपखुषीनें दिली असें समजलें पाहिजे. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४० पृ. ५५५; न्या. पु. ५३ अ. दि. नि. पृ. ३४ ).

**७१.** कोणा मनुष्यास दुसऱ्याचा माल सांपडला, आणि त्यानें तो आपल्या ताब्यांत घेतला, तर निक्षेपीची जी जबाबदारी असते त्याच जबाबदारीला तो पात्र असतो.

ज्याला माल सांपडेल त्याची जबाबदारी.

## विशेष समजुतीची टीप.

निक्षेपीची जबाबदारी किती असते हें समजण्यासाठींच ह्याच आक्टाचीं पुढील कलमें १५१, १५७, १६०, १६१, १६६, व १६८–१७० पहावी.

कोणा मनुष्यास चुकीमुळें अगर सक्तीच्या कारणानें पैसा दिला अगर कांहीं वस्तु त्याच्या स्वाधीन केल्या तर त्याची जबाबदारी.

**७२.** कोणा मनुष्यास चुकून अथवा सक्तीच्या कारणानें कांहीं पैसा दिला गेला अगर कांहीं तरी स्वाधीन केलें गेलें, तर त्यानें तो परत दिला पाहिजे अगर तें परत केलें पाहिजे.

## उदाहरणें.

( अ. ) अ आणि ब या दोघांनीं मिळून कचे १०० रुपये द्यावयाचे आहेत. अ हा एकटाच ती रक्कम कला देतो, आणि बला ती गोष्ट न समजल्यामुळें बही आणखी १०० रुपये कला देतो. तर कनें ते १०० रुपये बला परत केले पाहिजेत.

( ब. ) कोणा एका मनुष्याच्या नांवावर रेलवे कंपनींतून कांहीं माल आला आहे. माल आणण्याबद्दल रेलवे कंपनी कांहीं पैसा मागते आणि तो पैसा मागणें गैर कायदेशीर आहे. ज्याच्या नांवावर माल आहे तो मनुष्य माल ताब्यांत घेण्याकरितां म्हणून मागितलेला पैसा देतो. तर त्यांस जितका पैसा गैर कायदेशीर रीतीनें जास्त होता तितका त्याला परत मिळाला पाहिजे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. ड्रॅफ्ट चुकीनें भरणें व रक्कम परत मागणें.—ने सन १९१५ मध्यें वादीनें पी. व्हेला या इसमाबरोबर सी. आय. एफ. शर्तीप्रमाणें दोन करार केले. या कराराप्रमाणें पी. व्हेलानें वादीस कांहीं माल पुरवावयाचा होता पी. व्हेला यानें वादीच्या नांवें दर्शनी रक्कम देण्याचें ड्रॅफ्ट काढले व रक्कम गोळा करण्याकरितां त्यानें ते ड्रॅफ्टस आंग्लोइजिप्शियन ब्यांक लिमिटेड माल्टा याच्या नांवानें लिहून दिले. सदर ब्यांकेनें ते ड्रॅफ्टस एडन येथील प्रतिवादी ब्यांकेच्या नांवानें लिहून दिले. वादीच्या नांवें काढलेला व दर्शनी रक्कम देण्याचा एक ड्रॅफ्ट आपलेकडे आहे व आपणांस रक्कम मिळाल्यावर आपण जहाजावर माल चढविल्यासंबंधानें जे कागदपत्र असतात ते आपण स्वाधीन करूं असें प्रतिवादी ब्यांकेनें वादीस ता १० आगष्ट सन १९१५ रोजीं कळविलें. ता. १२ आगष्ट सन १९१५ रोजीं वादीनें ड्रॅफ्टची रक्कम भरली व ब्यांकेमधून जहाजावर माल चढविण्यासंबंधानें जे कागदपत्र असतात त्यापैकीं कांहीं कागदपत्र नेले. हे कागदपत्र वादीनें आपल्या आफिसांत तपासून बघितले तेव्हां त्यात विम्याची पालिसी नाहीं असें वादीस आढळून आलें. ही गोष्ट वादीस आढळून आल्यानंतर ड्रॅफ्टची रक्कम चुकीनें भरण्यांत आली आहे व ती रक्कम ड्रॅफ्ट लिहिणारास देऊ नये व रक्कम पाठविली असल्यास रक्कम अदा न करण्याबद्दल आपल्या खर्चानें तार करावी असें वादीनें ता. १३ आगष्ट सन १९१५ रोजीं प्रतिवादी ब्यांकेस कळविलें. वादीनें भरलेली रक्कम न देण्याचें प्रतिवादीनें नाकारल्यामुळें रक्कम परत मिळण्याकरितां वादीनें दावा लावला. दर्शनी रक्कम देण्याचा ड्रॅफ्ट आपणांस माल्टा येथील आंग्लो इजिप्शियन ब्यांकेकडून आला होता व आपण रक्कम गोळा करण्याच्या कामांत फक्त त्या ब्यांकेचे गुमास्ते या नात्यानें काम करीत होतों व वादीचें ता. १३ चें पत्र मिळण्यापूर्वींच म्हणजे ता. १२ ला रकमेचा भरणा झाल्याबद्दल आम्ही आपल्या मुखत्यास तारेनें कळविलें असल्यामुळें आम्हांस या बाबतींत नंतर कांहीं करतां येण्यासारखें नव्हतें अशी प्रतिवादीनें तक्रार केली. एडन येथील जज्जानें वादीचा दावा रद्द केला. त्यानें रेसिडेंटाच्या कोर्टाकडे अपील केलें.

ठरावः—( १ ) वादीनें प्रतिवादी ब्यांकेस घडलेल्या गोष्टीसंबंधानें चूक झाल्यामुळें रक्कम दिली आहे.

( २ ) ड्रॅफ्ट रवाना होण्याकरितां पोस्टांत टाकणें हें रक्कम देणें होत नसलें अगर ज्यामुळें प्रतिवादी ब्यांकेचें इतके नुकसान होईल कीं त्यामुळें किंमतीची रक्कम परत देण्याबद्दल प्रतिवादी ब्यांकेस हुकूम करणं अन्यायाचें होईल अशा प्रकारचेंही सदर कृत्य नसलें तरी वादीनें रक्कम भरली आहे ही गोष्ट प्रतिवादींनीं आपल्या मखत्यास त्यांच्या स्पष्ट विनंतीवरून तारेनें कळविली असल्यामुळें पक्षकारांचा परस्पर असलेला विशेष संबंध लक्षांत घेता वादीस प्रतिबंध झालेला आहे; व यामुळें वादीनें सांगितल्याप्रमाणें किंमत देण्याचें प्रतिवादीस थांबवितां येत नव्हतें व त्यांनीं तशा रीतीनें रक्कम देण्याचें थांबावयास नको होतें.

( ३ ) प्रतिवादी ब्यांक ही फक्त गुमास्ता होती.

( ४ ) कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ ) कलम ७२ प्रमाणें वादीस रक्कम परत मिळण्याचा हक्क पोंचणार नाहीं; कारण, प्रतिबंधसंबंधाचा कायदा कायम धरून सदर कलम वाचलें पाहिजे; व प्रस्तुतच्या कज्यांतील हकीगत पाहतां प्रतिबंध स्पष्ट रीतीनें उत्पन्न होत आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४२ पृ. १७; न्या. पु. ५३ मुं. दि. नि. पृ. २ ते ४ ).

२. कराराचा आक्ट ( सन १८७२ चा आक्ट ९ ) कलम ७२ हें संपूर्ण नाहीं. सदर क-

लमांत येणाऱ्या सक्ती या शब्दाचा अर्थ कलम १५ मध्यें दिलेल्या व्याख्येमुळें नियमित झा-लेला नसून त्या कलमांत सदर शब्द नेहमींच्या अर्थानें वापरलेला आहे. कलम १५ मध्यें दि-लेली व्याख्या ही विशिष्ट हेतूनें ह्मणजे कलम १४ स लागू करण्याकरितां ह्मणजे करारास स-फार्नें संमत्ती मिळविलेली होती किंवा काय, हें ठरविण्याची कसोटी कोणती याबद्दल व्याख्या कर-ण्याकरितां केलेली आहे. दुसऱ्या परिस्थितींत सदर शब्द वापरला असेल तेव्हां या व्याख्ये-मुळें सदर शब्दाचा अर्थ नियमित होत नाहीं. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४० पृ. ५९८; न्या. पु. ४८ क. दि. नि. पृ. २९ व ३० ).

३. मृत्युपत्रावरून नेमलेला व्यवस्थापक या नात्यानें कोणी कर देण्याची पात्रता नाहीं अशी तक्रार करून मृत्युपत्रावरून नेमलेल्या व्यवस्थापकानें प्राप्तीवरील कर दिला असल्यास कराराचा आक्ट कलम ७२ मधील अर्थाप्रमाणें सदर रक्कम सक्तीमुळ दिली आहे असें मानतां येईल. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४२ पृ. १५१; न्या. पु. ५० क. दि. नि. पृ. ५ व ६ ).

४. ज्या फौजदारी खटल्याची आपसांत समजून करतां येत नाहीं अशा फौजदारी खट-ल्यानें काम मध्येंच दडपून टाकण्याच्या शर्तीवर प्रतिवादीनें वादीपासून घेतलेली रक्कम ही क-राराच्या आक्टाचें कलम ७२ मधील अर्थाप्रमाणें सक्तानें घेतलेली रक्कम होते; व ती परत मिळवितां येईल. प्रतिवादीचाही या कामांत वादी इतकाच दोष असल्यामुळ त्यास दाद देव-वितां येत नाहीं हें तत्व अशा स्थलीं लागू पडत नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४० पृ. २८५; न्या पु. ५२ म. दि. नि. पृ. १२ व १३ ).

५. आक्षिप्त अर्थ.—डीला एक कंत्राटदाराची कांहीं रक्कम देणें होती. ही रक्कम अ-निश्चित होती. परंतु, डीला जी रक्कम देणें होती ती डीला ज्या कंत्राटदारास रक्कम देणें होती त्याच्या एका सावकारानें जप्त केली. कोर्टाच्या तसदीमुळ डीनें रुपये ९७५ कोर्टांत भरले व यावे-ळीं यापेक्षा जास्त नसली तरी रुपये ९७५ कंत्राटदारास देणें आहेत ही गोष्ट डीनें कबूल केली. जप्ती करणाऱ्या सावकारानें व हिस्सेरशीनें रक्कम मिळण्याबद्दल अर्ज केलेल्या दुसऱ्या एका सावका-रानें ही रक्कम कोर्टांतून घेतली. याप्रमाणें कंत्राटदाराच्या सावकारास मिळालेली रक्कम परत मिळण्याकरितां डीनें सावकारांवर दावा लावला.

ठराव:—हा दावा रद्द झाला पाहिजे. चुकीनें अथवा सक्तीमुळें भरलेली रक्कम ज्या इसमास देण्यांत आली आहे त्या इसमास खरोखर देणें नव्हती असा कराराच्या आ-क्टाचें कलम ७२ मधून आक्षिप्त अर्थ निघतो. रक्कम कोणत्या परिस्थितीमध्यें देण्यांत आली अगर रक्कम देण्यांत कोणता हेतु होता या गोष्टी लक्षांत न घेतां, सि. प्रो. को. आर्डर २१ कानु ४६ रकम ( ३ ) मधील ठरावाची अम्मलबजावणी होते. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४३ पृ. २८२; न्या. पु. ५६ अ. दि. नि. पृ. १३ व १४ ).

---

## भाग ६ वी.

## करार मोडण्याच्या परिणामाविषयीं.

करार मोडल्या कारणानें निष्पन्न झालेल्या तोट्याबद्दल व खराबीबद्दल नुकसानीचा पैसा.

७३. जर करार मोडला असेल तर तेणेंकरून ज्या पक्षकाराचें नुकसान होईल त्याला, ज्या पक्षकाराकडून तो मोडला गेला त्याजकडून, आपणास झालेल्या तोट्याबद्दल व खराबीबद्दल, नुकसानी भरून घेण्याचा हक्क आहे. तो तोटा व ती खराबी करार मोडल्यापासून जें कांहीं तरी साधारण रीतीनें व सहजगत्या घडेल त्यापासून निष्पन्न झालेली पाहिजे, अथवा करार मोडल्यास त्यामुळें जें कांहीं बहुतकरून घडून येईल असें करार झाला तव्हां पक्षकारांस माहीत होतें त्यापासून निष्पन्न झालेली पाहिजे.

हा नुकसानीचा पैसा करार मोडल्या कारणामुळें, पण साक्षांत नव्हे अशा रीतीनें व पर्यायानें, वडलेल्या तोट्याऐवजीं व खराबीऐवजीं भरून दिला जाणार नाहीं.

करारावरून उत्पन्न झालेल्या जबाबदाऱ्यासारखी जबाबदारी न फेडल्यास नुकसानी भरून देणं.

करारावरून ज्या जबाबदाऱ्या उत्पन्न होतात त्यांसारखी एकादी जबाबदारी कोणावर तरी आली आहे आणि ती जर फेडली नाहीं तर तो न फेडल्यामुळें ज्या कोणा मनुष्याचें नुकसान झालें असेल, त्याला त्याऐवजीं ती जबाबदारी न फेडणाऱ्याकडून, नुकसानी भरून मिळाली पाहिजे. आणि तो नुकसानीचा पैसा, त्या मनुष्यानें ती जबाबदारी फेडण्याचा करार केला असता आणि तो करार मोडला असता तर जितका नुकसानीचा पैसा मिळाला असता, तितकाच मिळाला पाहिजे.

**खुलासा.**—करार मोडल्यानें झालेला तोटा अगर खराबी आकारतांना, करार पुरा न केल्यानें गैरसोई झाली तिच्या उपशमनार्थ जीं साधनें होतीं त्यांचा विचार केला पाहिजे.

### उदाहरणें.

(अ.) अ हा अमूक एक किंमतीला ५० मण सोरमीठ बला विकण्याचा व बच्या स्वाधीन करण्याचा करार करतो. स्वाधीन केल्यावर किंमत देण्याचा करार आहे. अ आपलें वचन मोडतो. सोरमीठ ज्यावेळीं स्वाधीन करावयाचें होतें, तेव्हां जर करार केलेल्या जातीचें ५० मण सोरमीठ बनें विकत घेतलें असतें, तर करारांतील किंमतीपेक्षां जो पैसा जास्त पडला असता (जर कांहीं पडला असता तर) तितका पैसा नुकसानीबद्दल अपासून घेण्याचा बला हक्क आहे.

(ब.) अ हा बचें जहाज, मुंबईला पाठवून तेथें तारीख १ ली जानेवारी रोजीं कांहीं जिन्नस भरून (हा जिन्नस अनें द्यावयाचा) कलकत्याला आणण्याकरितां म्हणून नुरानें घेतो. तारवाचा नूर काम झल्यावर द्यावयाचा. बचें जहाज मुंबईला जात नाहीं, परंतु ज्या सोईनें अनें जहाज घेतलें होतें त्याच सोईनें आणि तितक्याच खर्चानें तो जिन्नस आणण्याचें साधन अला मिळत आहे. अ त्या साधनाचा उपयोग करतो, पण तसें करण्यांत त्याला श्रम आणि खर्च पडतो. तर त्या श्रमाऐवजीं व खर्चाऐवजीं अला ब कडून नुकसानी भरून मिळाली पाहिजे.

(क.) अ हा ब जवळून कांहीं नेमलेल्या किंमतीला ५० मण तांदूळ विकत घेण्याचा करार करतो. तांदूळ स्वाधीन करण्याचो वेळ नेमलेली नाहीं. नंतर अ बला सांगून पाठवितो कीं, ते तांदूळ देण्यास आणले तर आपण घेणार नाहीं. तर अनें तसें कळविलें त्या वेळीं बनें तें तांदूळ विकले असते तर करार केलेल्या किंमतीपेक्षां जी किंमत कमी आली असती (कांहीं कमी आली असती तर) त्या रकमे इतकी नुकसानी अजवळून बला भरून मिळाली पाहिजे.

(ड.) अ हा बचें जहाज ६०,००० रुपयांस विकत घेण्याचा करार करतो, पण नंतर आपलें वचन मोडतो. तर वचन मोडलं त्यावेळीं बला त्या जहाजाची जी किंमत मिळाली असती ती जर करारांतील किंमतीपेक्षां कमी असेल तर जितकी कमी असेल तितकी नुकसानी अनें बला भरून दिली पाहिजे.

(ई.) अ हा एक पडाववाला आहे. तो जुटाचें बारदान भरून विक्रीसाठीं मिरजापूर येथें नेण्याचा बशीं करार करतो. अमूक दिवशीं निघावें असें करारांत ठरलें आहे. कांहीं कारणामुळें, (पण तें कारण अनिवार्य नव्हतें), पडाव नेमलेल्या रोजीं निघत नाहीं आणि त्यामुळें, करार केलेल्या दिवशीं निघाला असता तर ज्या दिवशीं मिरजापुरास पडाव पोंचला असता त्या नंतर कांहीं काळ गेल्यावर तें बारदान मिरजापुरास पोंचलें. ज्या दिवशीं पोंचलें असतें त्या नंतर आणि ज्या दिवशीं पोंचलें त्यापूर्वीं जुटाचा भाव उतरला. तर योग्य वेळीं तें बारदान रवाना केलें तर ज्या कोणत्या वेळीं तें मिरजापुरास पोंचून त्या वेळीं तेथें बला जी किंमत मिळाली असती ती, बारदान खरोखर येऊन पोंचलें त्या वेळच्या बाजारभावापेक्षां जितकी जास्त असेल, तितकी नुकसानी अनें बला भरून दिली पाहिजे.

(फ.) अ हा अमूक एका रीतीनें बचें घर दुरुस्त करून देण्याचा करार करतो आणि त्याबद्दल पैसा आगाऊ घेतो. अ घर दुरुस्त करितो, पण कराराप्रमाणें दुरुस्त करीत नाहीं. तर झालेली दुरुस्ती कराराप्रमाणें करून घेण्यास जो खर्च लागेल तितकी नुकसानी अनें बला भरून दिली पाहिजे.

(ग.) अ हा कांहीं एक किंमतीला आपलें जहाज पहिल्या जानेवारी पा-

सून बला एक वर्षपर्यंत नुरानें देण्याचा करार करतो. जहाजाचे दर वाढलें आणि करारांत असल्यापेक्षां सदहू जहाजास तारीख १ ली जानेवारी रोजीं नूर जास्त येण्याजोगा आहे. अनें आपलें वचन मोडलें. तर १ ल्या जानेवारीच्या दिवशीं आणि तेथपासून एक वर्षपर्यंत तसें जहाज नुरानें घेण्यास बला जितका पैसा पडतो त्यांत आणि करारांतील रकमेंत जितकी तफावत असेल तितकी नुकसानी अनें बला भरून दिली पाहिजे.

( ह. ) अ हा कांहीं नेमलेल्या किंमतीला कांहीं लोखंड बला मिळवून देण्याचा करार करतो. ती किंमत लोखंड मिळवून स्वाधीन करण्यास अला जितका पैसा पडतो त्याहून जास्त आहे. ब तें लोखंड घेण्यास अन्यायानें नाकारितो. तर लोखंडाची करारांत लिहिलेली किंमत आणि तें मिळवून स्वाधीन करण्यास अला जो खर्च आला असतां त्यांत जी तफावत असेल तितकी नुकसानी बनें अला भरून दिली पाहिजे.

( ऐ. ) ब हा एक सर्वसाधारण हुंडेकरी आहे. अ हा एक यंत्र लागलेंच आपल्या ( अच्या ) गिरणीजवळ नेण्याकरितां बच्या स्वाधीन करतो, आणि बला सांगतो कीं तें यंत्र नसल्यामुळें आपली गिरणी बंद पडली आहे. ब यंत्र पोंचविण्यास विनाकारण अवकाश लावितो आणि त्यामुळें अला सरकारांतून एक फायदा होण्याजोगा मक्ता मिळणार होता तो मिळत नाहीं. तर यंत्र स्वाधीन होण्यास जितका अवकाश लागला तितक्यांत गिरणीपासून जो सरकारी फायदा अला झाला असता तितकी नुकसानी ब जवळून भरून घेण्याचा हक्क अला आहे, पण सरकारी मक्ता मिळाला नाहीं म्हणून जो अचा तोटा झाला त्याबद्दल नुकसानी मिळावयाची नाहीं.

( ज. ) अ हा दर टनास १०० रुपये प्रमाणें १,००० टन लोखंड अमूक एक वेळीं स्वाधीन करावें असें ठरवून बला मिळवून देण्याचा करार वशीं करतो आणि दर टनास ८० रुपये प्रमाणें १,००० टन लोखंड विकत घेण्याचा करार अ हा कशीं करतो, आणि तसें करतांना कला सांगतो कीं, आपण बशीं केलेला करार पुरा करण्याकरितां मी हें लोखंड घेत आहे. कनें अशीं केलेला करार कच्या हातून पुरा होत नाहीं. आणि अला दुसरें लोखंड मिळत नाहीं, आणि त्यामुळें ब करार रहित करितो, तर कनें अला २०,००० रुपये दिले पाहिजेत, कारण कीं, अनें जर बशीं केलेला करार पुरा केला असता तर अला तेवढा फायदा झाला असता.

( के. ) अ हा कांहीं एक यंत्र अमूक एक किंमतीला अमूक दिवसपर्यंत बनवून स्वाधीन करून देण्याचा बशीं करार करितो. नेमलेल्या वेळीं अ हा यंत्र स्वाधीन करून देत नाहीं, आणि त्यामुळें, जी किंमत अला त्यानें द्यावयाची होती

तिजपेक्षां मोठी किंमत देऊन दुसरें घेणें त्याला भाग पडलें, आणि अ बरोबर करार करिते वेळीं एका तिऱ्हाइताबरोबर कांहीं करार बनें केला होता (पण ह्या कराराविषयीं अला त्या वेळीं कांहीं कळविलें नव्हतें) तो पुरा करण्यास त्याला हरकत आली, आणि तो करार मोडल्यामुळें तिऱ्हाइताची नुकसानी भरून द्यावी लागली. तर बनें घेतलेल्या यंत्रास जी किंमत दिली तींत आणि करार केल्या किंमतींत जितकी तफावत असेल तितकी बची नुकसानी अनें भरून दिली पाहिजे परंतु बनें तिऱ्हाइताची नुकसानी भरून दिली तिजबद्दल अकडून बला कांहीं मिळावयाचें नाहीं.

(ल.) अ हा घरें बांधून देण्याचा धंदा करणारा आहे. १ ल्या जानेवारीस बनें एक घर कला भाड्यानें द्यावें असा बनें करार केला आहे. तें घर १ ल्या जानेवारीस बनें कच्या स्वाधीन करावें म्हणून अ हा तें घर बांधून त्या तारखेच्या आंत संपून देण्याचा करार करतो. ब आणि क यांमध्यें झालेला करार अला समजाविला आहे. अनें तें घर इतक्या वाईट रीतीनें बांधलें कीं, १ ल्या जानेवारीच्या पूर्वींच तें पडलें, आणि तें बला पुनः बांधावें लागलें. त्यामुळें कपासून बला भाडें मिळावयाचें होतें तें बुडालें, आणि कशीं करार मोडला म्हणून कची नुकसानी भरून देणें बला भाग पडलें. तर अनें बला घर पुनः बांधण्याच्या खर्चाबद्दल, भाडें बुडालें त्याबद्दल आणि कची नुकसानी भरून दिली त्याबद्दल, नुकसानीचा पैसा भरून दिला पाहिजे.

(म.) अ हा कांहीं व्यापाराचा जिन्नस बला विकतो आणि तो अमुक तऱ्हेचा आहे म्हणून खात्री सांगतो. त्या खात्रीवर विश्वास ठेऊन ब तो जिन्नस कला विकून आपणही कला तशीच खात्री सांगतो. नंतर तो जिन्नस खात्री केलेल्या तऱ्हेचा नाहीं असें ठरतें. आणि नुकसानीबद्दल कांहीं रक्कम कला देणें बला भाग पडतें. तर ती रक्कम अजवळून भरून घेण्याचा हक्क कला आहे.

(न.) अ हा अमुक एका दिवशीं कांहीं रक्कम बला देण्याचा करार करितो. त्या दिवशीं ती रक्कम अ देत नाहीं. त्या रोजीं ती रक्कम न मिळाल्यामुळें बला आपलीं कर्जें फेडविलीं नाहींत, आणि त्याची अगदीं नासाडी झाली. परंतु अनें जी रक्कम देण्याचा करार केला होता ती मुद्दल रक्कम आणि ती देईपर्यंत व्याज इतकें खेरीज करून अनें बची कांहीं नुकसानी भरून देणें नाहीं.

(ओ.) अ हा अमुक एक किंमतीला १ ल्या जानेवारी रोजीं ५० मण सोरमीठ बच्या स्वाधीन करण्याचा करार करितो. नंतर ब तें सोरमीठ कांहीं एक किंमतीला कला विकण्याचा १ ल्या जानेवारी पूर्वीं करार करितो. ती किंमत १ ल्या जानेवारीच्या बाजारभावापेक्षां जास्त आहे. अ आपलें वचन मोडतो. तर अनें बला द्यावयाच्या नुकसानीचा पैसा आकारतांना १ ल्या जानेवारी रोजीं बाजारभाव

काय होतो त्याचा विचार करावयाचा; कला विकल्यानें बला फायदा किती झाला असता, त्याचा विचार करावयाचा नाहीं.

(प.) अ हा बला अमूक एका दिवशीं ५०० गठ्ठे कापूस विकण्याचा व त्याच्या स्वाधीन करण्याचा करार करितो. ब आपला उदीम कोणत्या रीतीनें करितो त्याविषयीं अला कांहीं ठाऊक नाहीं. अ आपलें वचन मोडतो, आणि कापूस नसल्यामुळें बला आपली गिरणी बंद करणें भाग पडलें. तर गिरणी बंद करावी लागली त्यामुळें बचा तोटा झाला त्याजबद्दल अवर जबाबदारी नाहीं.

(क्य.) अ हा कांहीं एक प्रकारचें कापड १ ल्या जानेवारी रोजीं बला विकण्याचा आणि त्याच्या स्वाधीन करण्याचा करार करितो. बच्या मनांत त्या कापडाच्या एका तऱ्हेच्या टोप्या करावयाच्या आहेत, आणि त्या टोप्यांस तो हंगाम खेरीज करून गिऱ्हाईक नसतें. नेमलेली वेळ चुकून जाईपर्यंत कापड स्वाधीन केलें नाहीं. मागाहून केलें आणि केलें तेव्हां त्या वर्षी तें, अवकाश झाल्यामुळें, टोप्या करण्याचे उपयोगीं नाहीं. तर कापडाची करारांत लिहिलेली किंमत आणि तें स्वाधीन केलें त्या वेळचा त्याचा बाजारभाव यांत जी तफावत असेल तितकी नुकसानी बला अकडून भरून मिळावयाची. टोप्या करून जो फायदा होणार आहे असें ब समजत होता त्याबद्दल अथवा टोप्यांच्या कारखान्यासाठीं तयारी करितांना जो त्याला खर्च आला त्याबद्दल कांहीं मिळावयाचें नाहीं.

(र.) अ हा जहाजवाला आहे, तो बला आपल्या जहाजांतून कलकत्याहून १ ल्या जानेवारीस जहाज हाकारून सिड्नी येथें नेण्याचा करार बशीं करितो, आणि ब हा तारणादाखल नुराच्या पैशापैकीं अर्धा अला देतो. जहाज १ ल्या जानेवारीस हाकारिलें नाहीं, आणि त्यामुळें ब कलकत्ता येथें कांहीं दिवस राहिला आणि त्यामुळें त्यास कांहीं खर्च आला. तो दुसऱ्या एका जहाजावरून सिड्नीला जातो, आणि त्यामुळें तेथें समय गेल्यावर जाऊन पोंचला म्हणून त्याची कांहीं पैशाची रक्कम बुडाली, तर अनें बला व्याजासहित तारणाचा पैसा, आणि कलकत्यास अडून राहिल्यामुळें त्यास आलेला खर्च, आणि प्रथम केलेल्या जहाजापेक्षां दुसऱ्या जहाजावरील नूर जास्त असल्यास किती जास्त असेल तेवढा पैसा, इतकें दिलें पाहिजे, परंतु ब हा सिड्नीला उशिरा पोंचल्याकारणानें त्याची जी रक्कम बुडाली ती अनें द्यावयाची नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. आपल्या मालकीबद्दल हमी घेऊन ज्या मनुष्यानें आपली जमीन दुसऱ्यास खरेदी दिली आहे त्या दुसऱ्या मनुष्याकडून ती जमीन कोणी काढून घेतली असतां, ज्या तारखेस ती जमीन काढून घेण्यांत आली असेल त्या तारखेस त्या जमिनीची जी किंमत असेल ती किंमत, खरेदी देणारापासून परत घेण्याचा त्या खरेदी घेणारास हक्क आहे.

गहाण घेणाराकडील तारण कोणी हिरावून घेतलें असतां गहाणाचा करार तोडल्याबद्दल नुकसानी म्हणून गहाणाची रक्कम मात्र गहाण देणारापासून साधारण रीतीनें तो गहाण घेणारा जरी परत घेऊं शकतो तरी कित्येक वर्षेपर्यंत गहाणाची फेड गहाण देणारानें करूं नये अशी गहाणखतांत शर्त असेल तर फार दिवसपर्यंत तो व्यवहार चालू रहावयाचा आहे व तो आपल्या अनुकुलतेचा आहे, अशामुळें आपले होणारे फायद्याबद्दल शिवाय नुकसानी घेण्याचाही ( गहाणाच्या रकमेखेरीज ) गहाण घेणारास हक्क पोंचतो.

तशा नुकसानीचा आकार करणें तो, पंच ज्याप्रमाणें आकार करितात त्याप्रमाणें कोर्टानें करावा. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २१ पृ. १७५; न्या. पु. ३२ मुं. दि. नि. पृ. ८७ व ८८ ).

२. कराराचा विषय कांहींही असला तथापि, नुकसानी देण्याबद्दल जो साधारण कायदा आहे त्याला कराराचे आक्टाचें कलम ७३ यांत अपवाद सांगितलेला नाहीं. स्थावर मिळकतीची विक्री करण्याबद्दलचे कराराचे बाबतींत, आपल्या हक्काची शाबिती करण्यास विक्री करणारा इसम असमर्थ असेल तेव्हां नुकसानीबद्दलची रक्कम ठरवावयाची ती नेहमींच्या रीतीप्रमाणें ठरविली पाहिजे; परंतु, करार मोडला असतां, विकत देणारा इसम नुकसान भरून देण्यास पात्र होणार नाहीं, असा करार पक्षकारांनीं स्पष्टपणानें अगर गर्भित रीतीनें केला असल्याचें शाबीत झालें तर गोष्ट निराळी. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३२ पृ. १६५; न्या. पु. ४३ मुं. दि. नि. पृ. ६९ ).

३. **लग्नाचा करार मोडल्याबद्दल नुकसानी.**—लग्नाचा करार मोडल्याबद्दल लावलेल्या दाव्यांतील वादीस, इंग्लिश कायद्याप्रमाणें अशा दाव्यांतील वादीस जी विशेष नुकसानभरपाई देण्यांत येते तशी मुसलमानी शरेप्रमाणें नुकसानभरपाई मिळण्याचा हक्क नसतो.

इंग्लिश कायद्याप्रमाणें लावावयाच्या दाव्याचा आधार मोडलेला करार हा असला तरी त्यांजबरोबरच वैयक्तिक अपकृत्याचे जे विशेष परिणाम होतात तेही अनुषंगानें येतात; व वादीची जी आर्थिक नुकसानी झाली असेल ती भरून काढण्याकरतांच नव्हे तर प्रतिवादीस कडक शिक्षा करण्याच्या इरादानें जिचा हेतु प्रतिवादीचा सूड उगविण्याचा आहे व जी अनिश्चित स्वरूपाची आहे अशीही रक्कम वादीस नुकसानभरपाईदाखल देतां येते. ज्या लोकांस इंग्लिश कायदा लागू पडतो अशा लोकांची नवरा व बायको यांच्या परस्पर संबंधाची कल्पना व मुसलमानांची नवरा व बायको यांच्या परस्पर संबंधाची कल्पना अतिशय भिन्न असल्यामुळें मुसलमानांच्या बाबतीत या विचित्र तत्वाचा अवलंब करूं नये. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४२ पृ. ४५९; न्या. पु. ५३ मुं. दि. नि. पृ. ३५ ).

४. **कराराची मुदत व मोडल्याबद्दल नुकसान.**—ता. २३ जानेवारी सन १९२० रोजीं वादीनें कांहीं स्थावर मिळकत रु. ४६,०००ला प्रतिवादीला खरेदी देण्याचा करार केला. बयाण्यादाखल रु. २००० देण्यांत आले होते. खरेदीबद्दलच्या करारांत मुदत हा एक करारांतील अवश्यक असा भाग केलेला नव्हता तरी खरेदीचा व्यवहार दोन महिन्यांत पुरा करण्याबद्दलची शर्त करारांत होती. ता. २० एप्रिल सन १९२० रोजीं प्रतिवादीस ज्या बाबींबद्दलचा खुलासा पाहिजे होता त्या सर्व बाबी प्रतिवादीनें पत्र लिहून वादीस कळविल्या. ता. २३ नोव्हेंबर सन १९२० पर्यंत या बाबांबद्दलचा अखेरचा असा खुलासा करण्यांत आला नाहीं. ता. १४ डिसेंबर सन १९२० रोजीं प्रतिवादीनें आणखी कांहीं प्रश्न विचारून त्याबद्दल खुलासा करण्याबद्दल वादीस कळविलें व वादीनें याबद्दलचा खुलासा ता. २५ जानेवारी सन १९२१ रोजीं केला. त्याच तारखेस आपण मुदत हा एक करारांतील अवश्यक असा भाग करणार आहों असें

वादीनें प्रतिवादींस पत्र लिहून कळविलें व १० दिवसांत बाकीची खरेदीची रक्कम न दिल्यास आपण करार प्रतिवादीनें मोडला आहे असें समजून प्रतिवादीकरितां व प्रतिवादीच्या जोखमीवर मिळकतीची लिलावानें विक्री करूं असेंही वादीनें प्रतिवादींस कळविलें. प्रतिवादीनें १० दिवसांत रक्कम न दिल्यामुळें ता. ११ मार्च सन १९२१ रोजीं मिळकतीचा लिलाव करण्यांत आला. या लिलावांत सर्वांत जास्त रक्कम रु. ३१००० बोलण्यांत आली, परंतु मिळकतीची जी किमानपक्ष किंमत ठरविण्यांत आली होती त्या पेक्षां रु. ३१००० कमी असल्यामुळें मिळकतीचा लिलाव कायम करण्यांत आला नाहीं. ता. १९ मार्च सन १९२१ रोजीं वादीस खरेदी देतां येण्यासारखें हक्कसंबंध आहेत असें वादीनें दाखऊन दिलें नसल्यामुळें बयाण्यादाखल दिलेली रक्कम आपणांस परत करण्यांत यावी असें प्रतिवादीनें वादीस पत्र लिहिलें. यावर वादीनें करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्याकरितां अगर वैकल्पिक रीतीनें नुकसानी भरून मिळण्याकरितां दावा लावला. बयाण्याची रक्कम आपणांस परत मिळाली पाहिजे असें उलट-मागणें प्रतिवादीनें केलें.

**ठरावः**—( १ ) आपणांस खरेदी देतां येण्यासारखा मालकी हक्क आहे असें खरेदी देणारानें दाखऊन दिलें होतें.

( २ ) खरेदी घेणाराचें वर्तन लक्षांत घेतां मुदत हा करारांतील एक अवश्यक भाग करण्याबद्दल वादीनें प्रतिवादीस पत्र लिहिलें तें योग्य केलें व या पत्रांत दिलेली १० दिवसांची मुदत गुवलक होती.

( ३ ) खरेदी देणारास ज्या बाबींबद्दल खुलासा विचारला होता त्या बाबींचा खुलासा करण्यास खरेदी देणारानें विलंब लावला येवढ्यामुळें करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्याचा हुकुमनामा मिळण्याचा वादीस हक्क नाहीं असें नाहीं, तर करार मोडला आहे असें समजून वादीनें नंतर लिलावासही मिळकत काढली असल्यामुळेंही वादीस करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्याचा हुकुमनामा मिळण्याचा हक्क नाहीं.

( ४ ) करार ज्या तारखेस मोडला त्या तारखेस मिळकतीची बाजारांत येणारी किंमत व करारांत ठरलेली किंमत यांजमधील फरक हें नुकसानीचें मापन समजून त्याप्रमाणें नुकसानी मिळण्याचा हक्क साधारणपणें खरेदी देणारास असला तरी प्रस्तुतच्या दाव्यांत वादीस विचारलेल्या प्रश्नांचा खुलासा करण्यास वादीनें विलंब लाऊन अखेर होणाऱ्या तोट्यास मदतच केली आहे व यामुळें वादीस खरेदीचा करार व त्यांस अनुषंगिक असणाऱ्या इतर गोष्टी यांस लागलेला खर्च व प्रतिवादीनें बयाण्यादाखल दिलेल्या रकमेवरील त्याचा हक्क नष्ट करणें येवढीच रक्कम वादीस नुकसानीदाखल मिळण्याचा हक्क आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४८ पृ. ३३८; न्या. पु. ५९ मुं. दि. नि. पृ. १९ व २० ).

५. एप्रिल सन १९११ ते आगष्ट सन १९११ च्या दरम्यान निरनिराळ्या तारखांस अपेलेंटानें रेस्पांडेंटाबरोबर कांहीं भाग विकण्याबद्दल निरनिराळे करार केले होते. ते भाग रेस्पांडेंटानें अपेलेंटाच्या स्वाधीन ता. ३० डिसेंबर सन १९११ रोजीं करावयाचे होते. पक्षकारांच्या दरम्यान ता. २६ फेब्रुवारीपर्यंत बोलणें चाललें परंतु त्यांत आपसांत समजूत न झाल्यामुळें अपेलेंटानें रेस्पांडेंटाजवळ प्रत्येक भागाची ठरलेली किंमत व करार मोडण्यांत आला त्या वेळीं बाजारांत प्रत्येक भागाची ४–३ अशी किंमत असल्यामुळें ती किंमत या दोन किंमतीमधील फरकाची रक्कम प्रत्येक भागामागें देण्याबद्दल रेस्पांडेंटाजवळ मागणें केलें. नंतर अपेलेंटानें ता. २८ फेब्रुवारी ते आक्टोबरच्या दरम्यान निरनिराळ्या तारखांत सर्व भाग विकले. एका भागाशिवाय सर्व भागांस अपेले-

टास प्रत्येक भागास ४-३ पेक्षां जास्त किंमत आली. ता. २२ मार्च सन १९१२ रोजीं अपेलेंटानें रेस्पांडेंटाजवळ जी रक्कम मागितली होती त्याबद्दल रेस्पांडेंटावर दावा लावला ता. ३० डिसें. वरला करार मोडला त्यावेळीं भागाची जी किंमत होती त्यापेक्षां भाग विकल्यानंतर अपेलेंटास जी जास्त रक्कम वसूल झाली होती ती चीफ कोर्टानें नुकसानीची रक्कम ठरवितांना मजुरा घातली व या वाढलेल्या मात्राचा फायदा रेस्पांडेंटास दिला.

हा ठराव रद्द करून प्रिव्हिकौन्सिलनें पुढील ठराव केलाः—

**ठरावः**—रेस्पांडेंटानें करार मोडल्यामुळें त्यास कराराअन्वयें भागासंबंधानें जे हक्क होते ते नष्ट झाले; व नंतर अपेलेंटानें जे भाग विकले ते रेस्पांडेंटानें करारांतील भावाप्रमाणें भाग खरेदी न घेतल्यामुळें आपले किती नुकसान झालें आहे हें निश्चित करण्याकरितां अपेलेंटानें स्वतःचे भाग म्हणून ते भाग विकले आहेत. करार मोडल्यानंतर खरेदी देणारानें भाग तसेच ठेविल्यास त्यानें पुढें बाजारांत भागांचा काय भाव होईल याबद्दल स्वतःच्या कल्पनेच्या अनुसंधनानें केलेलें हें कृत्य खरेदी देणाराचें असतें, खरेदी घेणाराचें नसतें. करार ज्या तारखेस मोडला त्या वेळीं जो बाजारभाव होता त्यापेक्षां पुढें भाव उतरल्यास त्याबद्दलची नुकसानी खरेदी घेणारापासून खरेदी देणारास मिळणार नाहीं. त्याचप्रमाणें पुढें बाजारभाव चढल्यास त्याबद्दलही खरेदी देणारा हा खरेदी घेणारास पात्र राहणार नाहीं.

नुकसानीकरतां दावा लावणाऱ्या वादीनें करार मोडल्यानंतर होणारी नुकसानी कमी करण्याकरतां योग्य तीं कृत्यें केलीं पाहिजेत; त्याच्या हलगर्जीपणानें जी नुकसानी झाली असेल ती त्यास मागतां येणार नाहीं. परंतु नुकसानीची जी रक्कम ठरवावयाची असते ती करार मोडला त्या तारखेस झालेली नुकसानी ठरवावयाची असते.

प्रतिवादीनें जो करार पुरा केला नाहीं तो करार बुडाल्यामुळें वादीस दुसऱ्या एका कराराचा फायदा मिळाला व त्यांत त्याचा फायदा झाला या गोष्टीचा फायदा आपणांस मिळून नंतरच्या कराराचा फायदा आपणांस मिळावा असें म्हणण्याचा हक्क प्रतिवादीस प्राप्त होत नाहीं.

करार ज्या तारखेस मोडला त्या तारखेच्या बाजार भावावरूनच नुकसानीची रक्कम ठरविली पाहिजे.

हें तत्व खरेदी देणारानें अगर खरेदी घेणारानें कोणीही करार मोडला असला तरी लागू पडतें.

कराराच्या आक्टाचें (सन १८७२ चा आक्ट ९) कलम ७३ अगर १०७ यांपैकीं कोणत्याही कलमाचा फायदा रेस्पांडेंटास मिळणार नाहीं. कलम २३ जा फक्त नुकसान मिळण्याचा हक्क ज्ञापित करण्यांत आलेला आहे; व कलम १०७ या खरेदी दे पडत नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४३ पृ. ४९३; न्या. पु. ५१ क. दि. नि. पृ. करारांत मु ९).

६. **फुलचंदाचा ठरावः**—आपल्या स्वतःच्या व एकत्र कुटुंबांतील अज्ञान इसमांच्या मालकीची स्थावर मिळकत खरेदी देण्याचा करार एकत्र हिंदु कुटुंबाच्या वादीस उर्फ केला असेल व सदर करार अज्ञानांवर बंधक नाहीं असें आढळून आल्यानंतर कर्त्यानें त्या करार पुरा करून दिला नसेल तर सदर करार मोडल्याबद्दल नुकसान-भरपाई करून देण्यात आलेली जबाबदारी कराराच्या आक्टाचें (सन १८७२ चा आक्ट ९) कलम ७३ प्रमाणें कुटुंबाच्या कर्त्यावर जातीनें असते. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४० पृ. ३३८; न्या. पु. ५२ म. दि. नि. पृ. १६).

७. **करार मोडल्यामुळें नुकसानभरपाई मागणें.**—वादीस कांहीं कापवी विकत देण्याचा

करार प्रतिवादींनीं वादीबरोबर केला होता. ही काकवी कराराप्रमाणें दरमहिन्यास ठरलेल्या वजनाइतकी द्यावयाची होती. कराराप्रमाणें एका महिन्यास द्यावयाची काकवी दिली नाहीं. ही काकवी न देण्याचें कारण काकवी पाठविण्यास वहातुकीचें साधन मिळालें नाहीं असें प्रतिवादीचें म्हणणें होतें. वादीनें निराळी काकवी कराराप्रमाणें प्रतिवादीनें काकवी न पाठविल्यामुळें खरेदी केली नाहीं व ज्या ठिकाणीं वादीस काकवी द्यावयाची होती त्या ठिकाणीं काकवीस बाजारांत त्या वेळीं मागणी नव्हती. करार मोडल्यामुळें नुकसानभरपाई मिळण्याकरितां वादींनीं प्रतिवादीवर दावा लावला. वादींचें प्रत्यक्ष नुकसान कांहीं झालेलें नाहीं असें पुराव्याअंतीं आढळून आलें.

**ठराव:**—सदरहू कज्जाचा अंतर्भाव कराराच्या कायद्याचें कलम ७३ उदाहरण ( अ ) मध्यें होत असल्यामुळें वादीस नुकसानभरपाई मिळण्याचा हक्क आहे. ज्या वेळीं माल खरेदी घेणाराच्या स्वाधीन करावयाचा होता त्यावेळीं खरेदी घेणारास जितका माल द्यावयाचा होता तितका माल बाजारांत खरेदी घ्यावयास वादीस जी रक्कम पडली असती ती रक्कम अशा वेळीं नुकसानभरपाई म्हणून द्यावयाची असते असा नियम सदर उदाहरणांत घालून दिलेला आहे. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४१ पृ. ७०९; न्या. पु. ५३ म. दि. नि. पृ. ४४ व ४५ ).

८. **व्याजाची मागणी करता येण्याचीं कारणें.**—रक्कम देण्याबद्दलची जबाबदारी शाबीत झाल्यानंतर व्याज देण्याचा करार नसेल तर ज्या कारणांमुळें व्याजाची मागणी करितां येते, तीं कारणें कराराच्या आक्टाचें कलम ७३ उदाहरण एन व व्याजाबद्दलचा आक्ट ( सन १८३९ चा आक्ट ३२ ) यांत नमूद केलीं आहेत.

व्याज हें स्पष्ट अगर आर्थिक करार अगर व्याज देवविण्याबद्दलचा कायद्याचा नियम यांजवर अवलंबून असतें. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४६ पृ. ६२५; न्या. पु. ५९ अ. दि. नि. पृ. ४१ व ४२ ).

*दंडाची शर्त दाखल केली असेल तेव्हां करार मोडल्याबद्दल द्यावयाचा मोबदला.*

" **७४.** जर एखादा करार मोडला असेल, आणि तो करार मोडला असतां अमूक रक्कम द्यावी असें त्यांत सांगितलें असेल अगर त्या करारांत दंडादाखल इतर कोणतीही शर्त दाखल केलेली असेल, तो करार मोडल्याबद्दल जो पक्षकार फिर्याद करील त्याला, तो करार मोडल्यामुळें खरोखर खराबी अगर तोटा झाल्याविषयीं शाबीत झालेलें असो अगर नसो, तो करार ज्या पक्षकारानें मोडला असेल त्याकडून, प्रसंगाप्रमाणें, सदरहूप्रमाणें करारांत सांगितलेल्या रकमेपेक्षां किंवा जो दंड देण्याची शर्त दाखल केली असेल त्या दंडापेक्षां जास्त नाहीं असा नुकसानीचा योग्य मोबदला मिळण्याचा हक्क आहे.

**खुलासा:**—कसूर केल्याच्या तारखेपासून जास्त व्याज देण्याची शर्त दंडादाखल शर्त समजण्यास हरकत नाहीं. " ( सन १८९९ चा आक्ट ६ क. ४ वरून हें नवीन कलम दाखल केलें आहे ).

**अपवाद:**—जर कोणी जामीनखत, मुचलका, अथवा त्याच प्रकारचा दुसरा दस्तऐवज लिहून देईल, अथवा कोणत्याही कायद्यांतील ठरावांअन्वयें

किंवा इंडिया सरकारच्या अगर कोणत्याही इलाखे सरकारच्या हुकुमावरून, कोणते एखादें सरकारी काम किंवा कृत्य, कीं ज्यांत सर्व लोकांच्या बऱ्या वाइटाचा संबंध आहे तसें, करण्यावद्दल बांड लिहून देईल, आणि तशा कोणत्याही दस्तऐवजांतील शर्ती मोडील, तर तो त्यांत सांगितलेली सर्व रक्कम देण्यास पात्र होईल.

खुलासाः—कोणी मनुष्य सरकाराशीं कांहीं करार करील, तर, त्यानें ज्यांत 'सर्व लोकांच्या बऱ्या वाइटाचा संबंध आहे' असें सरकारी काम करण्याचा पतकर घेतला अथवा तसें कृत्य करण्याचें वचन दिलें असाच अर्थ समजावयाचा असें नाहीं.

## उदाहरणें.

( अ. ) अ बशीं करार करतो कीं, अमूक एका दिवशीं जर मी तुला ( बला ) ५०० रुपये द्यावयाला चुकलों, तर तुला ( बला ) १,००० रुपये देईन. अ हा त्या दिवशीं ५००० रुपये देत नाहीं. तर बला १,००० रुपयांहून जास्त नव्हे आणि कोर्टास योग्य वाटेल तितकी नुकसानी अकडून भरून मिळाली पाहिजे.

( ब. ) अ बशीं करार करतो कीं, जर आपण ( अनें ) कलकत्याचे आंत शस्त्र वैद्यकीचा धंदा केला तर बला ५,००० रुपये देईन. अनें तो धंदा कलकत्यांत केला, तर बला ५,००० रुपयांहून जास्त नव्हे अशी कोर्टास योग्य वाटेल तितकी नुकसानी अकडून भरून मिळाली पाहिजे.

( क. ) क हा अमूक रोजीं कोर्टांत हजर न झालों तर ५०० रुपये दंड देईन असा मुचलका लिहून देतो. तो हजर होत नाहीं तर तो त्या सर्व दंडास पात्र आहे.

"( ड. ) अ हा ब याला, दर शेंकडा १२ टक्यांच्या व्याजानें सहा महिन्यांच्या अखेरीस १,००० रुपये परत देण्याविषयीं एक खत लिहून देतो, तें अशा शर्तीवर कीं, तसें करण्यांत कसूर झाल्यास ती कसूर झाल्याच्या तारखेपासून दर शेंकडा ७५ टक्के प्रमाणें व्याज चालू होईल. ही शर्त दंडादाखल असून ब याला अकडून, कोर्टास वाजवी वाटेल तेवढा मात्र नुकसानीचा मोबदला मिळण्याचा हक्क आहे.

( ई. ) अ यानें ब सावकारास कांहीं पैसा देणें आहे, आणि तो, तें कर्ज फेडण्यासाठीं, दहा मण धान्य एका विवक्षित तारखेस त्यास देण्याचें कबूल करतो आणि अशी शर्त कबूल करितो कीं, तें धान्य त्या ठरलेल्या तारखेपर्यंत दिलें नाहीं तर आपण वीस मण धान्य देण्यास पात्र होऊं. ही शर्त दंडादाखल असून करार मोडण्यांत आला तर नुकसानीचा वाजवी मोबदला मात्र मिळण्याचा बस हक्क आहे.

(फ.) अ हा वळा, १,००० रुपयांची एक रक्कम सारख्या पांच माही हप्त्यांनीं परत देण्याचें कबूल करतो. तें अशा शर्तीवर कीं कोणताही एक हप्ता दिला नाहीं तर सगळी रक्कम येणें होईल ही शर्त दंडादाखल नसून, करार त्याच्या अटीं-प्रमाणें अमलांत आणतां येईल.

(ग.) अ हा ब कडून १०० रुपये कर्जी काढतो. आणि त्यास ४० रुपयांच्या पांच हप्त्यांनीं २०० रुपये द्यावयाचें खत लिहून देतो आणि त्यांत अशी शर्त कबूल करतो कीं, कोणताही एक हप्ता दिला नाहीं तर सगळी रक्कम येणें होईल. ही शर्त दंडदाखल आहे." (हीं नवीन ४ उदाहरणें सन १८९९ चा आक्ट ६ कलम ४ वरून घातलीं आहे).

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. प्रतिवादींनीं वादींपासून रक्कम रुपये २०० कर्जाऊ घेतले होते व त्यांस त्यांनीं, ता. १२ डिसेंबर सन १८७९ रोजीं २५० रुपयांचा रोखा लिहून दिला होता; त्या रोखांत दरमहा ५ रुपयांचा हप्ता देऊन फेड करण्याबद्दलचा ठराव होता. शिवाय, जर एखादा हप्ता देण्यांत आला नाहीं तर रोख्याचे तारखेपासून व्याजाची आकारणी दरसाल दरशेंकडा २४ टक्के प्रमाणें करावी, असाही त्या रोख्यांत ठराव होता. ता. ९ जुलै सन १८८४ पर्यंत, प्रतिवादींनीं वादीस रक्कम रुपये २०३।८।६ ची फेड केली होती; आणि त्या तारखेनंतर जास्त फेड करण्यांत आली नव्हती. रोख्याचे तारखेपासून दरसाल दर शेंकडा २४ टक्के प्रमाणें व्याजाचा आकार देवविण्याविषयीं मागणें करून वादींनीं दावा केला.

ठरावः—हप्ता देण्याचे कामीं हयगय झाल्यास, रोख्याचे तारखेपासून व्याजाची आकारणी २४ टक्के प्रमाणें करावयाची अशी जी शर्त त्या रोख्यांत घालण्यांत आली होती ती दंडाचे स्वरूपाची होती; आणि म्हणून वादींनीं मागितल्याप्रमाणें रक्कम मिळण्याचा त्यास हक्क पोंचत नाहीं. (इं. लॉ. री. मुं. सी. व्हा. २७ पृ. २१; न्या पु. ३८ मुं. दि. नि. पृ. ११).

२. प्रतिवादीस एका रोख्याबद्दल २४०० रुपये मिळाले व त्याबद्दल प्रतिवादीनें ५,१०० रुपयांचा रोखा वादीचे नांवें करून दिला. दरमहा दरशेंकडा एक पूर्णांक एक द्वितीयांश टक्के प्रमाणें ६००० रुपयांवर ३९ महिन्यांबद्दलचें व्याज आकारून तें रोख्याच्या रकमेंत अगाऊ सामील केलें होतें. पहिले १२ महिने दरमहा ५० रुपये व पुढें २६ महिने दरमहा १०० रुपये व बाकी राहिलेली सर्व रक्कम ३९ व्या महिन्याचे अखेरीस देऊन कर्जाची फेड करावयाची होती. एखादा हप्ता चुकल्यास, रोख्यांतील सर्व रक्कम एकदम द्यावयाची होती. प्रतिवादीनें सर्व रक्कम त्याप्रमाणें न दिल्यास दरमहा दरशेंकडा ५ टक्के प्रमाणें सर्व रकमेची फेड होईपर्यंत व्याज देण्याचें प्रतिवादीनें कबूल केलें. प्रतिवादीनें हप्ता दिला नाहीं. वादीनें रोख्याची रक्कम व त्यावर दरमहा दरशेंकडा ५ टक्के प्रमाणें व्याज मिळण्याबद्दल दावा लावला. व्याजाची रक्कम मुद्दलांत अगाऊ सामील करण्याबद्दलचा करार, व हप्ते न दिल्यास दरमहा दरशेंकडा ५ टक्के प्रमाणें व्याज द्यावयाचा करार ह्या दोन्हीं करारांची कायद्याप्रमाणें अमलबजावणी करितां येणार नाहीं. असें सबार्डिनेट जजानें ठरविलें. वादीस २४०० रुपये व दरमहा दरशेंकडा एक पूर्णांक एक द्वितीयांश टक्के व्याज इतकी रक्कम देण्यांत आली.

ठरावः—दोन्हीं करार दंडरूपी स्वरूपाचे आहेत. कराराच्या आक्टाचें (सन १८७२

चा आक्ट ९ ) कलम ७४ मधील ठरावाकडे लक्ष देतां त्यांची पूर्ण अम्मलबजावणी करतां येत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३६ पृ. १६४; न्या. पु. ४७ मुं. दि. नि. पृ. ११८ व ११९ ).

३. **जामिनावरील जबाबदारी जामिनकतब्याचे स्वरूपावर अवलंबून राहील**—जामीनकदवा करून देणाऱ्या इसमावर कतब्यांतील शर्त मांडली असतां त्यांत नमूद केलेली सर्व रक्कम देण्याची जबाबदारी राहील असें कराराच्या आक्टाचें कलम ७४ मधील अपवादांत ठरविलें असलें तरी, सर्व रक्कम कोर्टानें वसूल केलीच पाहिजे असें कोर्टावर यामुळें बंधन येत नाहीं. जामीनकतब्याचें स्वरूप व मोडलेल्या शर्ती यांचा विचार करण्याची मुखत्यारी कोर्टास आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. १२१३; न्या. पु. ५६ मुं. दि. नि. पृ ९५ ).

४. व्याजाचा दर दंडाच्या स्वरूपाचा आहे असें कोर्टास ज्या ठिकाणीं आढळून येईल त्या ठिकाणीं दाद देवविण्याचा अधिकार कोर्टास आहे हें तत्व अलीकडील ठरावांतून योग्य रीतीनें ठरवितां येण्यासारखें आहे.

इंग्लंडमधील कायद्याप्रमाणें दंड व नुकसानीची निश्चित रक्कम यासंबंधच्या तत्वाचा जो अर्थ करण्यांत येतो त्यासंबंधानेंच प्रथम कराराच्या आक्टाचें कलम ७४ मधील ठराव करण्यांत आला असला तरी सध्यांचें सदर कलमाचें स्वरूप इतकें विस्तृत आहे कीं, त्यांत कोर्टासमोर सध्यां असलेल्या कज्जासारख्या कज्जांचा समावेश करितां येईल; कारण, ज्या करारांत दंडाच्या स्वरूपाची एखादी शर्त आहे अशा सर्व करारास सदर कलम लागू पडत आहे. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४२ पृ ३५२; न्या. पु. ५० क. दि. नि. पृ. २६ व २७ ).

५. रिणकोस कांहीं मुदतीपर्यंत रक्कम देण्याचा करार झाला असून त्यांत दरमहा रुपये ५ प्रमाणें व्याज देण्याचा करार केला असेल तर त्यामुळें दरसाल दरशेंकडा रुपये ६० व्याजाबद्दल देणें भाग पडत नसून दरमहा रुपये ५ प्रमाणें व्याज द्यावें लागतें; व बारा महिन्यांचा व्याजाचा हप्ता थकल्यास चक्रवाढ व्याज देण्याचा करार हा दंडाच्या स्वरूपाचा करार होईल. ही गोष्ट कितीही तात्विक असली तरी अशा प्रकारचे जे व्यवहार कडक व सदसद्विवेकबुद्धीस सोडून आहेत असें स्पष्ट दिसून येत आहे अशा व्यवहारांचे बाबतींत कायदा शब्दशः अमलांत आणणें हें हिंदुस्थानांतील कोर्टाचें कर्तव्य आहे. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४२ पृ. ६९०; न्या. पु. ५० क. दि. नि. पृ. २८ व २९ ).

६. विशिष्ट दरानें व्याज देण्याबद्दलचा करार हा दंडाच्या स्वरूपाचा आहे असें कोर्टाचें मत पडल्यास व्याज कमी करण्याचा अधिकार कोर्टास आहे.

कोणता करार दंडाच्या स्वरूपाचा आहे याचा निर्णय प्रत्येक कज्जांत त्या कज्जांतील हकीगतीवरून केला पाहिजे. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४४ पृ. १६२; न्या. पु. ५२ क. दि. नि. पृ. ७ ).

७. **व्याजाच्या दराचें शिक्षेचें स्वरूप**—व्याज वेळेवर दिल्यास कमी दरानें व्याज घेण्याचा करार केल्यानें त्यामुळें व्याजाचा मूळ ठरलेला दर हा कराराचा आक्ट ( सन १८७२ ) कलम ७४ मधील अर्थाप्रमाणें शिक्षेच्या स्वरूपाचा होत नाहीं. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४८ पृ. १०३६; न्या. पु. ५६ क. दि. नि. पृ. २५ ).

८. **गहाण देणारास मुद्दल रकमेच्या दुप्पट रक्कम द्यावी लागल्यास त्याचा परिणाम.**—गहाण देणारावर अयोग्य वजन खर्च केल्यामुळें त्यानें करार करून दिला होता असें सुचविण्यांत आलें नसेल तर, त्यानें करार मोडल्यामुळें त्यास कर्जाऊ दिलेल्या रकमेच्या अवळ

जवळ दुप्पट रक्कम द्यावी लागली ही गोष्ट करार बंधनकारक नाहीं असें ठरविण्यास पुरेसें कारण होत नाहीं. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४९ पृ. १०४०; न्या. पु. ५७ क. दि. नि. पृ. २२ ).

९. करार मोडेपर्यंत कांहीं व्याज द्यावयाचें नसून करार मोडल्याच्या तारखेपासून जबर दरानें व्याज द्यावयाचें असेल तर जबर व्याज देण्याबद्दलचा करार हा दंडाच्या स्वरूपाचा आहे असें मानून जबर व्याजाऐवजीं नुकसान भरपाईदाखल योग्य रक्कम देण्याचा अधिकार कराराच्या आक्टाच्या दुरुस्त केलेल्या ७४ कलमाप्रमाणें ( सन १८७२ चा आक्ट ९ ) कोर्टास आहे. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३६ पृ. २२९; न्या. पु. ४८ म. दि. नि. पृ. २० ).

१०. एका एडन इंप्रुव्हमेंट ट्रस्टनें नवीन रस्ता करण्याकरितां जमीन घेतली व नंतर रस्याच्या बाजूस असलेल्या जागा विकण्यास सुरुवात केली. विक्रीनंतर खरेदी देणारानें खरेदीच्या रकमेपैकीं शेंकडा १० प्रमाणें रक्कम तावडतोब भरावी व बाकीची रक्कम नऊ महिन्यांत भरावी अशी विक्रीची एक शर्त होती. खरेदी घेणारानें शर्तीप्रमाणें वर्तन न केल्यास त्याचा अनामत ठेवलेल्या रकमेवरील हक्क नष्ट होईल व खरेदी घेणारास विकलेली अगर विकलेल्या जागा पुन्हां जाहीर लिलांवानें अगर करारानें विकण्याचा हक्क खरेदी देणारास प्राप्त होईल, अशीही आणखी एक विक्रीची शर्त होती. जागा खरेदी घेणारानें आल्या खरेदीच्या वेळीं फक्त १ रुपाया भरला होता. आणखी रक्कम त्यानें भरली नाहीं. ट्रस्टनें खरेदी घेणारावर आणलेल्या दाव्यांत पुढील ठराव करण्यांत आला:

ठरावः—मिळकतीची पुन्हां विक्री झाल्यावर जी कमी किंमत आली ती प्रतिवादी खरेदी घेणारापासून घेण्याचा वादीस हक्क नसून फक्त खरेदीची जी रक्कम ठरलेली होती त्याच्या शेंकडा १० प्रमाणें रक्कम घेण्याचा हक्क वादीस आहे. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३८ पृ. ५२; न्या. पु. ५१ अ. दि. नि. पृ. ३ व ४ ).

११. **व्याजाचा दर दण्डनीय स्वरूपाचा असेल तेव्हां कलमाचा लागूपणा.**—ठरावः—जास्त व्याजाचा दर ठरला असून रक्कम ठरल्यावेळीं दिल्यास कमी दरानें व्याज घेण्याचा करार असेल तर, तेथें कराराच्या आक्टानें कलम ७४ मधील ठराव लागू पडत नाहीं.

ठरावः—दरसाल दर शेंकडा ७ टक्केप्रमाणें व्याजाचा दर ठरला असून योग्य वेळीं व्याज न दिल्यास दरसाल २ टक्केप्रमाणें जास्त व्याज आकारावयाचें असा दस्तऐवजाचे वेळीं दस्तऐवज करून देणारा व घेणारा यांचे दरम्यान तोंडी करार झाला होता असें शाबीत करण्याकरितां तोंडी पुरावा ग्राह्य होत नाहीं, व त्याचप्रमाणें हा तोंडी करार शाबीत करण्याकरितां नंतरच्या वर्तनाबद्दलचाही तोंडी पुरावा ग्राह्य होत नाहीं. ( इं. ला. री. ला. सी. व्हा. ४ पृ. २५८; न्या. पु. ५८ ला. दि. नि. पृ. १७ ).

१२. **कलमाचे दुरुस्तीचा हेतु.**—सन १८९५ सालीं एका कोळशाच्या खाणीसंबंधानें करून दिलेल्या भाडेपट्यात पुढील शर्ती होत्याः—( १ ) भाडेपट्टा करून देणारानें दरसाल किमानपक्ष स्वामित्वाबद्दल चार किस्तांत रु. १७५० द्यावे. ( २ ) कोणताही किस्त थकल्यास दरमहा दरशेंकडा रु. १ प्रमाणें व्याज देण्यांत यावें व ( ३ ) एकसारखे चार किस्त थकल्यास दरमहा दरशेंकडा ३८२ प्रमाणें व्याज देण्यांत यावें.

ठरावः—एकसारखे ४ किस्त थकल्यास जास्त दरानें व्याज देण्याबद्दलचा करार हा कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ कलम ७२ मधील अर्थाप्रमाणें दंडाच्या स्वरूपाचा आहे; परंतु

भाडेपट्टा करून देणीरानें करार मोडल्यामुळें झालेल्या नुकसानीची योग्य भरपाई म्हणून हायकोर्टानें जास्त दरानें वादीच्या मागण्याप्रमाणें व्याज देवविलें.

सन १८९९ च्या दुरुस्त करणाऱ्या आक्टाचें कलम ७४ ला जो खुलासा जोडण्यांत आला आहे व जें उदाहरण सामिल करण्यांत आलें आहे त्यामुळें सन १८७२ सालीं जो कायदा करण्यांत आला त्यांत फरक करण्याचा हेतु नव्हता तर मूळ कलमाचा खरा अर्थ काय, यावद्दल जो कांहीं संशय होता त्याचें निराकरण करण्याच्या हेतूनें सदर कलमाची दुरुस्ती करून खुलासा करण्यांत आला आहे व एक उदाहरण देण्यांत आलें आहे. (इं. ला. री. पा. सी. व्हा. २ पृ. ६५७; न्या. पु. ५९ पा. दि. नि. पृ. २५).

वाजवी रीतीनें करार रहित करणाऱ्या पक्षकारास नुकसानी भरून घेण्याचा हक्क आहे.

**७५.** कोणी मनुष्य एखादा करार वाजवी रीतीनें रहित करील, तर तो करार पुरा न झाल्यामुळें त्याची कांहीं खराबी झाली असेल, तिजबद्दल त्याला नुकसानी भरून घेण्याचा हक्क आहे.

## उदाहरण.

(अ.) अ ही कोणी एक गायन करणारी स्त्री आहे आणि ब हा एका नाटक शाळेचा कारभारी आहे. अनें बशीं असा करार केला कीं आपण बच्या नाटक शाळेंत येत्या दोन महिन्यांत दर आठवड्यास दोन रात्रीं याप्रमाणें गावें आणि ब अशी बोली करितो कीं गाइलेल्या दर रात्रीस अला आपण १०० रुपये देईन. सहाव्या रात्रीस अ ही नाटक शाळेपासून मुद्दाम गैरहजर राहिली. आणि त्यामुळें ब करार रहित करितो. तर करार पुरा न केल्यामुळें जी बची खराबी झाली तिजबद्दल नुकसानी भरून मागण्याचा हक्क बला आहे.

## विशेष समजुतीची टीप.

**व्याजरूपानें नुकसानी देणें**—भोगवट्याचें गहाण सोडविण्याकरतां लावलेल्या दाव्यांत दावा लावीपर्यंत गहाण घेणारास त्याच्या घेणें रकमेपेक्षां जें जास्त उत्पन्न पावलें असेल त्या उत्पन्नावर नुकसानीकरितां म्हणून अगर इतर कारणावरून व्याज देववितां येत नाहीं. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४६ पृ. ८९७; न्या. पु. ५९ अ. दि. नि. पृ. ५७).

---

# बाब ७ वी.

## मालाची विक्री.

### विकलेल्या मालावरचें स्वामित्व स्थलांतर केव्हां पावतें.

'माल' या शब्दाचें लक्षण.

**७६.** या बाबेंत 'माल' या शब्दाचा अर्थ प्रत्येक जातीची जंगम जिंदगी असा आहे आणि प्रत्येक जातीच्या जंगम जिंदगीचा समावेश त्या शब्दांत होतो.

## विशेष समजुतीची टीप.

क यानें अशी नोट चोरली. त्या नोटीचा पैसा ब यानें क यास इमानानें व प्रामाणिकपणानें दिला. क चे चोरीची शाबिती झाली. तेव्हां ती नोट अ यास न देतां माजिस्ट्रेटानें ब यास दिली. ही नोट मूळ मालकास मिळावी किंवा ब यास मिळावी याजबद्दल सेशन जज्जास संशय आल्यावरून त्यानें त्या कामांत हायकोर्टाचा अभिप्राय मिळण्यासाठीं खटला हायकोर्टाकडे पाठविला. सेशन जज्जानें म्हणणें कीं, सन १८७२ चा आक्ट ९ कलम ७६ यांतील 'माल' या शब्दानें लक्षणाप्रमाणें करन्सी नोटी ह्या माल आहेत, सबब त्यास आक्टाचें कलम १०८ उदाहरण (अ) वरून त्या नोटीचें स्वामित्व बकडे गेलें असें होत नाहीं. सबब ती नोट अ यास मिळाली पाहिजे.

त्या कामीं हायकोर्टानें असें ठरविलें कीं, सन १८७२ चा आक्ट ९ कलमें ७६ व १०८ हीं या खटल्यास लागू पडत नाहींत; कारण, सदर आक्टाचें कलम ७७ प्रमाणें किंमत घेऊन जिंदगी दिली म्हणजे ती विक्री होते. परंतु या कामांत बनें जी नोट घेतली ती त्यानें खरेदी घेतली नाहीं. तर त्यानें कपासून ती नुसती घेतली आणि त्या नोटीचे नाणें त्यास दिलें, म्हणजे एका तऱ्हेचा पैसा घेऊन दुसऱ्या तऱ्हेचा पैसा दिला. ती नोट बकडे अगदीं प्रामाणिकपणानें आलेली आहे. सबब त्यास ती नोट परत देणें वाजवी आहे. करारानें आक्टाचें कलम ७६ हें पुढील कलम ७७ घेऊन वाचलें पाहिजे. आणि त्या कलम ७७ वरून पाहिलें तर कराराच्या आक्टांतील ठराव मुळींच या खटल्यास लागत नाहींत. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३ पृ. ३७९; न्या. पु. १४ क. फौ. नि. पृ. २ ).

'विक्री' या शब्दाचें लक्षण.

**७७.** विक्री म्हणजे किंमत देऊन त्याबद्दल जिंदगी देणें ती, तिजमुळें विकलेल्या वस्तूंवरील स्वामित्व विकणाराकडून निघून विकत घेणाराला येतें.

## विशेष समजुतीची टीप.

फुलर्डचा ठराव:—बयाण्याबद्दलचा पैका परत देण्याबद्दलचें मागणें जरीच उशीर होईपर्यंत जरी करण्यांत आलेलें नाहीं तरी तें मागणें सामील करून फिर्यादअर्जाची दुरुस्ती करूं दिली पाहिजे.

एखादा करार विशेष रीतीनें पुरा करून देण्याबद्दलच्या हक्काचा किंवा बयाण्याचा पैका परत घेण्याबद्दलच्या हक्काचा निर्णय एका दाव्यांत झाला पाहिजे आणि करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्याबद्दलचा वादीस हुकुमनामा मिळाला नाहीं तर अनामत ठेवलेला पैका परत घेण्यासाठीं निराळा दावा करण्याचा वादीचा हक्क नाहींसा होत नाहीं.

करार विशेष रीतीनें पुरा करून घेण्याबद्दलचा खरेदीदारास हक्क नाहीं, ही गोष्ट अमानत ठेवलेला पैका परत घेण्याबद्दलच्या हक्काविरुद्ध निर्णायक होत नाहीं. करारांतील शर्तीवरून पाहतां, प्रतिवादी जी मालकी विकत देण्यास तयार आहे ती पत्करण्याचें वादीस योग्य रीतीनें नाकबूल करितां येत आहे तर बयाण्याचा पैसा परत घेण्याचा वादीस हक्क आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २१ पृ. ८२७; न्या. पु. ३२ मुं. दि. नि. पृ. ३६२ ).

विक्री कशानें घडते.

**७८.** विक्री ही निश्चित माल कांहीं किंमतीला, अगर निश्चित मालाला कांहीं एक किंमत, देतों व स्वीकारतों असें म्हटल्यानें,

आणि, त्या शिवाय, किंमत दिल्यानें, अगर माल स्वाधीन करून दिल्यानें, अगर ही किंवा हा घे असें म्हटल्यानें, किंमती पैकीं कांहीं भाग दिल्यानें, सचकारानें, अगर मालपैकीं कांहीं माल स्वाधीन करून दिल्यानें, अथवा किंमत देणें ती मागाहून घावी अशी, अगर माल स्वाधीन करून देणें तो मागाहून घावा अशी, अगर या दोन्हीं गोष्टी मागाहून व्हाव्या अशीं, कबुलायत केल्यानें घडते, मग ती कबुलायत स्पष्ट असो अगर गर्भित असो.

निश्चित मालाच्या विक्रीबद्दल करार असेल, तर विकलेल्या मालाचें स्वामित्व विकत घेणाऱ्याला तेव्हां येते, कीं, जेव्हां सगळी किंमत किंवा तिचा कांहीं भाग, अथवा सचकार दिला जाईल, अथवा जेव्हां सगळा किंवा कांहीं माल स्वाधीन करून दिला जाईल.

जर पक्षकार, स्पष्ट रीतीनें अगर गर्भित रीतीनें, असा करार करतील, कीं, पैसा देणें तो, अगर माल स्वाधीन करून घावयाचा तो, मागाहून घावा, अगर ह्या दोन्हीं गोष्टी मागाहून व्हाव्या, तर विक्रीची सूचना स्वीकारल्याबरोबर मालाचें स्वामित्व विकत घेणाराला येतें.

## उदाहरणें.

( अ. ) ब हा अचा घोडा ५०० रुपयांस आपण घेतों असें बोलणें घालतो. अ बचें बोलणें स्वीकारतो आणि घोडा बच्या स्वाधीन करतो. तर स्वाधीन होतांच घोड्यावर बची मालकी आली.

( ब. ) अ बकडेस कांहीं माल पाठवितो आणि तो बला पसंत पडेल तर अमूक एक किंमतीला घेण्याविषयीं आणि पसंत न पडल्यास परत पाठविण्याविषयीं बला निरोप धाडतो. ब माल ठेऊन ठेऊन आपल्याला पसंत पडला म्हणून अला सांगून पाठवितो. तर बनें माल ठेऊन घेतांच त्याचें स्वामित्व बला येते.

( क. ) तुझ्या घोड्यास मी १,००० रुपये देतों असें ब अला सांगतो आणि ब म्हणतो कीं नेमलेल्या अमूक एका रोजीं घोडा स्वाधीन करून घावा, आणि किंमत दुसऱ्या एका नेमलेल्या दिवशीं घावी. अ त्याचें म्हणणें स्वीकारतो, तर बनें अशी सूचना स्वीकारतांच घोड्यावर बची मालकी आली.

( ड. ) ब हा अच्या घोड्याला १,००० रुपये देतो म्हणतो आणि पैसा एक महिन्यानें देईन असें म्हणतो. अ तें म्हणणें स्वीकारितो. तर म्हणणें स्वीकारितांच घोडा बचा झाला.

( ई. ) ब हा १ ल्या जानेवारीच्या दिवशीं अशी असें बोलणें लावतो कीं, तुझे तांदूळ मीं २,००० रुपयांला घेतों, आणि रुपये येत्या मार्च महि-

त्याचे १ ले तारखेस देईन आणि किंमत देण्यापूर्वी तांदूळ घेऊन जाणार नाहीं. अ तें म्हणणें स्वीकारतो. तर त्या म्हणण्याचा स्वीकार करतांच तांदूळ वचे झाले.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. ज्या जमिनीवर वादींनी मालकी होती त्या जमिनीवर वादींच्या परवानगीनें प्रतिवादीनें एक घर बांधलें. वादी आणि प्रतिवादी यांचे दरम्यान तंटे उपस्थित झाले. प्रतिवादांनं कबजा घेण्यासाठीं मामलेदार कोर्टांत दावा केला व त्या मिळकतीचा कबजा प्रतिवादीस देण्याबद्दल मामलेदारानें वादींस हुकूम केला. सन १८९३ चे आगष्ट महिन्यांत वादी व प्रतिवादी यांचे दरम्यान एक करार झाला व त्या करारास अनुसरून प्रतिवादीनें वादींस अशी एक भाडेचिठ्ठी लिहून दिली कीं, ४ महिन्याचे अखेरीस वादींनीं प्रतिवादीस १०० रुपये दिले म्हणजे ती मिळकत प्रतिवादीनें वादींचे स्वाधीन करावी. ती मिळकत परत देण्याचे प्रतिवादीनें नाकबूल केलें आहे असें सांगून तिचा कबजा घेण्यासाठीं वादींनीं ता. २५ नोवेंबर सन १८९६ रोजी प्रतिवादीवर हा दावा केला. वादींनीं प्रतिवादीस १०० रुपये दिले नाहींत आणि याजकरितां भाडेचिठ्ठींत लिहिलेला करार मान्य करणें प्रतिवादीस भाग नाहीं असें ठरवून जिल्हे जज्जानें तो दावा रद्द केला. ता. २८ फेब्रुवारी सन १८९३ रोजच्या मामलेदाराच्या हुकुमाचे तारखेपासून ३ वर्षांचे आंत वादींनीं हा दावा केला नसल्यामुळें वादींच्या या दाव्यास मुदतीची हरकत आली आहे असेंही जिल्हे जज्जानें ठरविलें. सन १८७७ चा आक्ट १५ परिशिष्ट २ आर्टिकल ४७ पहा.

**ठराव:**—प्रतिवादीनें वादींस १०० रुपयांस ती मिळकत विकत देण्याबद्दलचा तो व्यवहार होता असें पुराव्यावरून दिसून येतें. वादींनीं जरी ती १०० रुपयांची रकम दिली नव्हती तरी तो विक्रीचा व्यवहार पुरा झाला होता आणि ती रकम घेण्यासाठीं दावा करण्याची मात्र प्रतिवादीस तजवीज करितां आली असती.

आणखी असाही ठराव झाला कीं, पक्षकारांच्या दरम्यान झालेल्या करारावरून, मामलेदाराचा हुकूम रद्द झाल्यासारखा झाला होता व तो रद्द करून घेण्यासाठीं दावा करण्याची वादींस जरूरी राहिली नव्हती. सबब त्या विक्रीच्या कराराच्या आधारें झालेल्या हकाच्या दाव्यास मुदतीच्या आक्टाचें आर्टिकल ४७ वरून मुदतीची हरकत आली नव्हती. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २३ पृ. ५२५; न्या. पु. ३८ मुं. दि. नि. पृ. २१४ व २१५).

२. निश्चित केलेल्या मालाची विक्री करण्याबद्दलच्या करारांतील पक्षकारांनीं किंमत देण्याबद्दल व माल स्वाधीन करण्याबद्दल कांहीं दिवस तहकूबी केली असेल तरी त्या मालाची मालकी विक्रीची सूचना मान्य झाल्याबरोबर खरेदी करणाराकडे जाते आणि पक्षकारांचे दरम्यान पुढें झालेल्या कबुलीवरून खरेदीदाराकडे ती मालकी जाण्याचें बंद होत नाहीं.

हल्लींच्या या कज्जांत, खरेदी देणाराकडे मालकी जाण्यासाठीं विक्री पुरी होण्यास ज्या गोष्टीची जरूरी असते त्या सर्व गोष्टी अस्तित्वांत आहेत आणि ती मालकी पुढें कांहीं दिवसांनीं त्याजकडे जाण्याबद्दल पक्षकारांचा उद्देश होता असें दिसून येत नाहीं. सबब ज्याचा विमा उतरतां येईल असा खरेदी घेणाराचा त्या मालांत हितसंबंध आहे.

परंतु अनिश्चित मालाची विक्री करण्यांत आली असेल व पुढें माल निश्चित केला नसेल तर त्या मालावरील मालकी खरेदी घेणाराकडे जाण्याजोगी ती विक्री होणार नाहीं आणि मग ज्याचा विमा उतरतां येईल असा खरेदीदाराचा त्या मालांत हितसंबंध राहणार नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. ३३ पृ. ८१६; न्या. पु. ४० क. दि. नि. पृ. ३४).

अजून निश्चित करावयाची, करावयाची, अथवा संपवावयाची आहे, अशा वस्तु विक्रयास तिचें स्वामित्व केव्हां येतें.

७९. एखादी वस्तु अजून निश्चित करावयाची आहे, करावयाची आहे, किंवा संपवावयाची आहे, आणि तिच्या विक्रीविषयीं करार होईल, तर त्या वस्तूचें स्वामित्व ती निश्चित केली जाईपर्यंत, केली जाईपर्यंत, अथवा संपेपर्यंत विकत घेणाराला येत नाहीं.

उदाहरण.

ब हा अ या होडीबंदाला आपल्या करितां एक होडी करावयास सांगतो. किंमत हाप्त्या हाप्त्यांनीं द्यावयाची असें ठरलें नाहीं. होडी बांधण्याचें काम चाललें असतांना तिच्या किंमतीबद्दल म्हणून ब हा वेळोवेळां अला पैसा देतो, तर होडीचें स्वामित्व ती बांधून संपेपर्यंत बला येत नाहीं.

विकत घेणारा ज्या स्थितींत असलेला माल घेणार त्या स्थितीला तो विकणारानें आणावयाचा आहे अशा मालाचे विक्रीची पूर्णता.

८०. जर कांहीं माल अमूक स्थितींत असला म्हणजे खरीददार तो घेणार आहे आणि जर असा करार असेल कीं त्या स्थितींत त्या मालास आणण्याकरितां विकणारानें त्या मालास कांहीं तरी करावें, तर तें केलें जाई तोंपर्यंत विक्री पूर्ण होत नाहीं.

उदाहरण.

अ हा एक जहाजबंद आहे, तो आपल्या गोदींत असलेलें जहाज अमूक एक किंमतीस बला विकण्याचा करार करितो. कांहीं एक सफरेला जाण्यासाठीं तें समजून संजोगावें, आणि तें करून स्वाधीन केलें म्हणजे किंमत द्यावयाची असा करार आहे. तर जहाज सजविलें व संजोगिलें आणि स्वाधीन केलें जाई तोंपर्यंत जहाजाचें स्वामित्व कराराअन्वयें बला येत नाहीं.

जेव्हा मालाची किंमत किती होते ते ठरविण्याकरितां विकणारानें त्या मालाला कांहीं तरी करावयाचें असतें तेव्हां विक्री पूर्ण केव्हां होते.

८१. मालाची किंमत किती तें ठरविण्याकरितां विकणाऱ्यानें मालास कांहीं तरी करावयाचें राहिलें असेल, तर तें केलें जाई तोंपर्यंत विक्री पूर्ण झाली असें समजावयाचें नाहीं.

उदाहरणें.

(अ.) अ हा कांहीं एका सालीचे गंजाचा मालक आहे, आणि तो गंज बला दर टनीं १०० रुपये प्रमाण विकण्याचा व तोलून त्याच्या स्वाधीन करून देण्याचा करार करितो. व तो घेण्यास कबूल होऊन अमूक दिवशीं त्याची किंमत द्यावयाची असें कबूल करितो. कांहीं भाग तोलून बच्या स्वाधीन केला. तर बाकी राहिलेला भाग कराराअन्वयें तोलला नाहीं तोंपर्यंत त्या बाकी भागाचें स्वामित्व बला येत नाहीं.

(ब.) अ हा कांहीं चिकणमातीचा ढीग दर टनास अमूक रुपयें प्रमाणें बला विकत देण्याचा करार करितो. आणखी असा करार आहे कीं, बनें ती माती आपल्या गाड्यांवर लादावी, आणि अच्या ठिकाणाहून बच्या ठिकाणीं नेतांना वाटेवर एक यंत्र आहे त्यावर बनें प्रत्येक ओझें तोलावें. आतां, यांत विकणारानें कांहीं करावयाचें राहिलें नाहीं; तर विक्री समाप्त झाली, आणि मातीच्या ढिगाचें स्वामित्व एकदम खरीददाराला आलें.

करार होते वेळीं माल कोणता तो निश्चित केला नसेल तर विक्री केव्हां पूर्ण होते.

८२. विक्रीचा करार करतेवेळीं माल कोणता तो निश्चित केला नसेल, तर विक्री पूर्ण होण्याला माल निश्चित केला जाणें हें अवश्य आहे.

उदाहरण.

अ हा आपल्या टाक्यांतील २० टन तेल बला विकण्याचा करार करितो. अची टाकीं पुष्कळ आहेत व त्यांत २० टनाहून जास्त तेल आहे. तर त्या तेलापैकीं कोणत्याही तेलाचें स्वामित्व बला आलें नाहीं.

मागाहून मालाचा विनियोग केल्यानें माल अमूक असा निश्चित केला जातो.

८३. जर विक्रीची कबुलायत करिते वेळीं माल अमूक असा निश्चित केला नसेल, परंतु, कबुलायतीला सार्थक्य यावें म्हणून, कबुलायतींत लिहिलेल्या मालाप्रमाणें कांहीं मालाची एका पक्षकारानें मागाहून योजना त्या कामीं केली असेल, आणि ती योजना दुसऱ्या पक्षकारानें मान्य केली असेल, तर माल निश्चित केला गेला असें समजलें पाहिजे, व ती विक्री पूर्ण झाली असें समजलें पाहिजे.

उदाहरण.

अ जवळ २० हाग्झेड भरून उरण्या इतकी साखर आहे. त्यांतून तो २० हाग्झेड साखर बला विकण्याचा करार करितो. करार झाल्यावर अ २० हाग्झेड भरतो आणि बला सांगून पाठवितो कीं, करारांत लिहिल्या प्रमाणें २० हाग्झेड तयार आहेत. आणि ते घेऊन जावयाला सांगतो. ब म्हणतो कीं, आपल्याच्यानें तें नेववेल तितके लवकर आपण घेऊन जातो. तर याप्रमाणें अनें आपल्या साखरेंतून २० हग्झेडांची योजना केल्यानें व ती बनें मान्य केल्यानें ती २० हाग्झेड साखर बची झाली.

विकणारानें निवड केली तर माल निश्चित केला असा होतो.

८४. जर विक्रीचा करार करिते वेळीं माल अमूक असा निश्चित केला नसेल, आणि करारांतील संकेतावरून जर असें होत असेल कीं, त्या मालाचे संबंधानें विकणारानें कांहीं एक कृत्य केलें पाहिजे, कीं, जें कृत्य, मालाची योजना, विकत घेणाराकडेस करण्यापूर्वी, करितां येत नाहीं, तर करारांत लिहिलेले

वर्णन ज्याला लागू होतें असा कोणताही माल निवडण्याचा विकणाराला हक्क आहे, आणि त्यानें तशी निवड केल्यानें माल निश्चित केला गेला असें समजलें पाहिजे.

### उदाहरण.

अच्या कोठारांत पुष्कळ तांदूळ आहेत, त्यांतून अमूक एक रोजीं किंमत द्यावयाची करून अमूक दरानें ५० मण तांदूळ विकत घेण्याची कबुलायत अशीं ब हा करितो. आणि अशी कबुलायत झाली आहे कीं, तांदुळाकरितां बनें गोणते पाठवावे, व अनें त्यांत तांदूळ भरावे. ब गोणते पाठवितो आणि अ हा ५० मण तांदूळ त्यांत भरतो. तर यावरून माल निश्चित केला गेला असें म्हटलें पाहिजे.

जंगम जिंदगी स्थावर जिंदगी बरोबर विकली असेल तेव्हां जंगम जिंदगीचे स्वामित्व स्थलांतर केव्हां पावतें.

८५. जर स्थावर आणि जंगम जिंदगी मिळून विकण्याची कबुलायत झाली असेल, तर जंगम जिंदगीचें स्वामित्व स्थावर जिंदगीवरील स्वामित्व येण्यापूर्वीं येत नाहीं.

### उदाहरण.

अ हा एक घर आणि त्यांतील सामान विकण्याची कबुलायत बशीं करितो. तर बला घरावरची मालकी येण्यापूर्वीं सामानाचें स्वामित्व बला येत नाहीं.

### विशेष समजुतीची टीप.

कांहीं स्थावर आणि जंगम मिळकत खरेदी करण्याचा अ यानें ब बरोबर करार केला आणि बयाण्याबद्दल पैका दिला. त्या कराराअन्वयें, करारांचें आक्टाचें कलम ८५ वरून, स्थावर मिळकतीचा कबजा मिळण्यापूर्वीं जंगम मिळकतीची मालकी खरेदीदारास मिळत नाहीं. ब यानें ती मिळकत अ यास न देतां क याजला विकून त्याचे कबजांत दिली. तेव्हां अ यानें ब आणि क यांजवर दावा केला. त्यांत असा हुकुमनामा झाला कीं, क यानें केलेलें खरेदीखत रद्द आहे आणि ब यानें अ याजपाशीं करार केल्याप्रमाणें अ यास खरेदीखत लिहून द्यावें. हा हुकुमनामा अपिलांत कायम राहिला. ब यानें अ यास खरेदीखत करून देण्याचें नाकबूल केल्यावरून कोर्टानें, सन १८५९ चा आक्ट ८ कलम २०२ अन्वयें अ यास खरेदीखत करून दिलें. तथापि क यानें ती मिळकत अ याचे कबजांत न दिल्यामुळें अ यानें त्या मिळकतीचा कबजा घेण्यासाठीं क याजवर दावा केला. अव्वल कराराचे तारखेपासून तीन वर्षांचे आंत हा दावा केलेला नसून, पूर्वीच्या दाव्यांतील अपील कोर्टाचे शेवटचे हुकुमनाम्याचे तारखेपासून ३ वर्षांचे आंत आणलेला असल्यामुळें, हा दावा जंगम मिळकतीच्या संबंधानें मुदतीबाहेर गेलेला आहे अशी प्रतिवादी तर्फे तक्रार झाली. तेव्हां अखेर ठराव झाला तोः—

जंगम मिळकतीचा कबजा घेण्याचें संबंधानेंही हा दावा मुदतीबाहेर गेलेला नाहीं; कारण, विक्रीचा करार पुरा करून घेण्याचा जो वादी यास अपील कोर्टाचा हुकुमनामा मिळाला त्या हुकुमनाम्याचे तारखेस अ यास स्थावर व जंगम मिळकत कबजांत घेण्याचा हक्क उत्पन्न झाला; आणि सन १८७७ चा आक्ट १५ परिशिष्ट २ आर्टिकल ४५ अन्वयें डिटेनरचा ( हरकत घेणाराचा ) कबजा त्या वेळेपासूनच बेकायदेशीर झाला. ( इं. ला. रि. मुं. सी. व्हा. २ पृ. ५५४; न्या. पु. १७ मुं. दि. निं. पृ. १ ).

मालावर खरीददाराचें स्वामित्व झाल्यावर तोटा झाल्यास तो खरीददारानें सोसला पाहिजे.

८६. मालावर खरीददाराचें स्वामित्व आल्यावर, त्याचा नाश झाल्यावर अगर त्याला इजा झाल्यास त्यापासून कोणताही तोटा होईल तो खरीददारानें सोसला पाहिजे.

उदाहरणें.

( अ. ) अच्या घरभाटांत जळाऊ लांकडांचा गंज आहे. त्याला ब १०० रुपये देतों म्हणतो आणि अ तें म्हणणें स्वीकारितो. अमूक दिवसापर्यंत लांकडे अच्या घरभाटांत आहेत तेथेंच रहावीं, आणि किंमत देण्यापूर्वीं नेऊं नयेत अशी बोली आहे. किंमत देण्यापूर्वीं आणि अच्या घरभाटांत असतां तीं लांकडें अकस्मात् आगीनें जळून खाक झालीं. तर बनें तोटा सोसला पाहिजे.

( ब. ) लिलांवांत एका तसबिरीची विक्री होत असतां अ ती १,००० रुपयाला मागतो. मागितल्यानंतर ती दैववशांत खराब होते. जर हातोडा * पडण्यापूर्वीं खराब झाली तर विकणारानें, आणि पडल्यानंतर खराब झाली तर अनें, तोटा सोसला पाहिजे.

विशेष समजुतीची टीप.

अ यानें ब यास १७५ मण भात विकत देण्याचा करार लिहून दिला. तें भात कलीगंज येथील पेठांत होतें. त्याच्या जवळच ब हा रहात असे. त्या करारांत भाताचा दर ठरविलेला होता. ब यानें अ यास कांहीं पयाच्याबद्दल पैका दिला आणि अमूक एका तारखेस किंवा त्या नंतर तें भात वजन करून मी तेथून घेऊन जाईन अशी कबुलायत केली. ब यानें आपला तो करार क यास दिला. कनें आपल्या नोकरांचे मार्फत अपासून १३० मण भाताचें माप घेतलें आणि अ यास रुपये १००० दिले. पुढें बाकीचें भात घेण्याचें कनें नाकबूल केलें; कारण ज्या प्रकारचें भात देण्याचा कनें करार केला होता त्याहून तें भात हलक्या प्रकारचें होतें, असें क याचें म्हणणें होतें. त्या पेवास दैववशांत आग लागली आणि बाकीचें भात जळून गेलें. अ यानें बपासून बाकीचा खरेदीचा पैसा घेण्याकरितां ब याजवर एक दावा केला. त्यांत ठराव झाला तोः—

सन १८७२ चा आक्ट ९ कलमें ७८ व ८६ वरून पाहतां, ब यास केलेली विक्री पुरी झाली होती व त्या मालाचा नाश झाल्यास त्याच्या नुकसानीमुळें ब यास त्या भाताचें स्वामित्व प्राप्त झालें होतें; कारण, तो माल निश्चित केलेला होता आणि त्याबद्दल ब यानें बयाणा घेतला होता व कांहीं मालही त्यानें आपल्या स्वाधीन करून घेतला होता आणि याजकरितां अ यानें त्या मालाबद्दल केलेली खात्री बरोबर नाहीं असें म्हणून ती विक्री रद्द करण्याचा ब यास अधिकार नाहीं. परंतु त्या करारांत, कलम १९ यांत सांगितलेला एकादा प्रकार आहे असें जर ब शाबीत करील तर मात्र तो करार त्यास रद्द करितां येईल. परंतु तसें शाबीत करण्याचाही त्यास प्रतिबंध झाला आहे; कारण, " साधारण हुषारी " चा जर त्यानें उपयोग केला असतां तर तें भात हलक्या प्रतीचे आहे किंवा नाहीं, हें त्यास समजून आलें अ-

* " हातोडा पडण्यापूर्वीं आणि पडल्या नंतर " ह्मणजे, लिलांव त्रीटिम ( तीनवार ) होण्यापूर्वीं व नंतर.

सर्ते. सबब बाकी राहिलेला खरेदीचा पैका अ यास देणें बला भाग आहे. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४ पृ. ८०१; न्या. पु. १४ क. दि. नि. पृ. १३८).

८७. ज्याला अद्यापि अस्तित्व प्राप्त झालें नाहीं अशा मालाचे विक्रीविषयीं करार असेल, तर माल उत्पन्न झाल्यावर, करारास अनुसरून विकणारानें अथवा विकणारांची संमत्ति घेऊन खरीददारानें केलेलीं जीं कृत्यें त्यांच्यायोगें त्या मालाचें स्वामित्व दिलें जाऊं शकेल.

जो माल अद्यापि उत्पन्न झाला नाहीं तो विकण्याविषयीं करार झाल्यास त्या मालाचें स्वामित्व कसें येतें.

## उदाहरणें.

(अ.) अ करार करतो कीं येत्या वर्षीं आपल्या कारखान्यांत जितकी नीळ उत्पन्न होईल तितकी सर्व अमूक एक किंमतीला मी बला विकत देतों. नीळ तयार झाल्यावर, सदर्हू निळीचें तूं पाहिजे तें कर, ती तुझी आहे असें समजून ती मजजवळ ठेऊन घेतली आहे असें अ हा बला कळवितो. तर असें कळविल्या दिवसापासून निळीचें स्वामित्व बला आलें.

(ब.) अ हा कांहीं एक किंमतीला असा करार करितो कीं, आपल्या (अच्या) जमिनीवर जें पीक तूर्त उभें आहे त्यानंतर जें पीक येईल तें बनें घेऊन विकावें. त्या कराराअन्वयें करार करिते वेळीं जें पीक शेतांत उभें होतें त्यानंतर आलेलें कांहीं पीक ब हा अचें संमत घेऊन आपल्या ताब्यांत घेतो. तर पीक ताब्यांत घेतांच त्याचें स्वामित्व बला आलें.

(क.) अ हा, कांहींएक किंमतीला असा करार करितो कीं, आपल्या (अच्या) जमिनीवर जें पीक तूर्त उभें आहे त्यानंतर जें पीक येईल तें बनें घेऊन विकावें. त्या कराराअन्वयें करार करिते वेळीं जें पीक शेतांत उभें होतें त्यानंतर आलेलें कांहीं पीक ताब्यांत मिळावें असें ब अला सांगतो. अ ताब्यांत देण्यास नाकारितो. तर नकार केल्यानें अनें करार मोडला असें झालें, तरी पिकाचें स्वामित्व बला आलें नाहीं.

८८. भविष्यकाळीं एकादे रोजीं स्वाधीन करून द्यावयाचा अशा मालाच्या विक्रीचा करार असल्यास, करार करिते वेळीं विकणाराच्या ताब्यांत तो माल नसला तरी, आणि तो माल विकत घेण्याशिवाय दुसऱ्या मार्गानें मिळणार आहे अशी आशा बाळगण्यास त्याला योग्य कारण नसलें तरी, तो करार पक्षकारांस बांधणारा असा होतो.

करार करिते वेळीं विकणाराच्या ताब्यांत नाहीं असा माल विकण्याविषयीं आणि भविष्यकाळीं एकादे दिवशीं स्वाधीन करण्याविषयीं करार.

## उदाहरण.

अ हा इस्ट इंडिया रेलवे कंपनीचे ५० शेअर बला विकत देण्याचा १ ल्या जानेवारी दिवशीं करार करितो. हे शेअर्स त्याच सालच्या मार्च महिन्याचे पहिल्या

तारखेस स्वाधीन करावे आणि त्याच रोजीं किंमत द्यावी असें करारांत आहे. करार केला तेव्हां अच्या ताब्यांत शेअर्स मुळींच नव्हते. तरी करार कायदेशीर आहे.

## विशेप समजुतीची टीप.

**खरेदी घेणाराच्या माल ताब्यांत असें केव्हां म्हणतां येईल.**—खरेदीदारानें खरेदी घेणारास तयार माल विकला असून तो माल खरेदी घेणारानें ताब्यांत न घेतल्यामुळें खरेदी देणारानें खरेदी घेणारावर नुकसानीचा दावा लावला होता. कराराच्या तारखेस खरेदी देणाराच्या ताब्यांत खरेदी दिलेला माल नव्हता यामुळें माल ताब्यांत घेण्याची जबाबदारी खरेदी घेणारावर राहिलेली नव्हती अशी प्रतिवादीची तक्रार होती.

ठरावः—करार करतेवेळीं व कराराची तारीख व ठरलेली तारीख यांच्या दरम्यानच्या मुदतींत खरेदी घेणारानें केव्हांही मागणी केली असती तर खरेदी देणारास खरेदी दिलेला माल खरेदी घेणाराच्या ताब्यांत देतां देण्याजोगा असला ह्मणजे खरेदी देणारानें करारांतील शर्तीप्रमाणें वर्तन केल्याप्रमाणें होतें. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४७ पृ. ४५८; न्या. पु. ५५ क. दि. निं. पृ. ७).

करारानें किंमत ठरली नसल्यास ती कशी ठरवावी.

८९. विक्रीच्या करारांत विकलेल्या मालाची किंमत ठाम केली नसेल, तर कोर्टास योग्य दिसेल ती किंमत खरीददारानें विकणाराला दिली पाहिजे.

### उदाहरण.

ब हा पाटण्यास राहतो, आणि अ हा गाड्या करणार कलकत्याला राहतो. बनें अला कांहींएक प्रकारची गाडी करावयास सांगितली. किंमतीविषयीं ब अथवा अ कांहींच बोलला नाहीं. सांगितलेली गाडी तयार झाली, किंमती विषयीं खरीददार आणि विकणारा यांमध्यें वाद उत्पन्न झाला आहे, तर किती किंमत योग्य आहे हें कोर्टानें ठरविलें पाहिजे.

## स्वाधीन करणें.

स्वाधीन करण्याचा प्रकार.

९०. विकलेला माल खरीददाराच्या ताब्यांत, अथवा खरीददारातर्फे तो ताब्यांत ठेवण्याचा ज्याला अधिकार आहे अशा एखाद्या मनुष्याच्या ताब्यांत, दिल्याचें फळ ज्या गोष्टीवरून येतें तशी कोणतीही गोष्ट केली म्हणजे विकलेला माल स्वाधीन केला असें म्हणतां येईल.

### उदाहरणें.

(अ.) अ हा बला एक घोडा विकतो, आणि त्याला आपल्या (अच्या) तबेल्यांतून बच्या तबेल्यांत नेववितो, अगर नेऊं देतो. तर बच्या तबेल्यांत घोडा गेल्यानें तो स्वाधीन केला असें झालें.

(ब.) ब इंग्लंडांत आहे, अ मुंबईंत एक व्यापारी आहे. ब हा अकडून

१०० गठ्ठे कापूस मागवितो आणि त्या करितां आपलें जहाज मुंबईत धाडतो. तर कापूस सदर्हू जहाजावर घातला म्हणजे तो बच्या स्वाधीन केला असें समजलें पाहिजे.

( क. ) अ हा वखारींत कुलपांत असलेला कांहीं विशेष प्रकारचा माल बला विकतो. अ हा बनें त्या वखारींतून तो माल घ्यावा म्हणून त्याची किल्ली ब जवळ देतो. तर त्यावरून माल स्वाधीन केला असें झालें.

( ड. ) अ हा बला तेलानें भरलेलीं ५ विशेष पिंपें विकतो. तें तेल अच्या वखारींत आहे. बनें तीं ५ पिंपें कला विकलीं. अ हा त्यांजबद्दल वखारभाडें कबूल करून घेतो. तर त्यावरून तेल कच्या स्वाधीन केलें असें झालें. कारण कीं, तेणेंकरून कचा वखारवाला या नात्यानें तो माल आपल्याजवळ ठेऊन घेण्यास अची मान्यता होती असें दिसून येतें.

( ई. ) अ ५० मण तांदूळ बला विकतो, ते तांदूळ वखारवाला क याच्या ताब्यांत आहेत. अ हा कला बच्या हातीं हुकूम पाठवितो कीं, ते तांदूळ बच्या नांवावर करावे. क हुकूम मान्य करितो आणि तांदूळ आपल्या हिशोबीं बच्या नांवें करितो. तर तसें केल्यानें स्वाधीन केलें असें झालें.

( फ. ) अ हा दर टनास १,००० रुपये प्रमाणें पांच टन तेल बला विकण्याची कबुलायत करितो. माल स्वाधीन करतेवेळीं किंमत द्यावी अशी बोली आहे. क या धक्केवाल्याजवळ अनें वीस टन तेल आहे. अ कला त्या तेलापैकीं पांच टन तेल बच्या नांवें करण्याविषयीं हुकूम पाठवितो. क त्याप्रमाणें आपल्या हिशोबीं लिहितो, आणि बच्या नांवें केल्याबद्दल अच्या कारकुनाच्या हातीं बला चिठ्ठी पाठवितो. अचा कारकून ती चिठ्ठी बकडे घेऊन जातो आणि म्हणतो कीं, किंमत द्या म्हणजे ही चिठ्ठी तुम्हांस देतों. ब किंमत देत नाहीं म्हणतो. तर यांत माल बच्या स्वाधीन केला असें झालें नाहीं, कां कीं, अनें निवडलेलें पांच टन तेल आपल्या ( बच्या ) तर्फे ताब्यांत ठेवण्याकरितां कची मुनीमादाखल नेमणूक करण्यास बनें आपली संमती मुळींच दिली नाहीं.

धक्केवाल्याचें अथवा हुंडेकऱ्याचे स्वाधीन केल्यास त्याचें फळ.

९१. माल विकून तो धक्केवाल्याच्या अथवा हुंडेकऱ्याच्या स्वाधीन केला, तर त्याचें फळ, तो माल खरीददाराच्या स्वाधीन केल्या प्रमाणेंच आहे; परंतु तसें केल्यानें जो माल खरीददारास पोहोंचला नाहीं, त्याच्या किंमतीबद्दल तो जबाबदार होत नाहीं. मात्र धक्केवाल्याच्या अथवा हुंडेकऱ्याच्या स्वाधीन जर अशा रीतीनें केला असेल, कीं तेणेंकरून मालाच्या सुरक्षितपणाबद्दल अथवा तो स्वाधीन करून देण्याबद्दल त्या धक्केवाल्यास अगर हुंडेकऱ्यास जबाबदार धरण्याची शक्ति खरीददारास येईल तर, माल न पोहोंचला तरी खरीददार किंमतीविषयीं जबाबदार होईल.

### उदाहरण.

ब आग्र्याला राहतो. अ कलकत्याला राहतो. ब अला आगगाडींतून तीन पिंपें तेल आपणास पाठविण्याविषयीं हुकूम पाठवितो. अ हा बचा पत्ता वर लिहून तेलाची तीन पिंपें आगगाडीच्या स्टेशनावर घेऊन जातो, आणि तीं तेथें ठेऊन निघून येतो, पण ज्या नियमास अनुसरलें असतां रेलवे कंपनी मालाचे सुरक्षितपणाबद्दल जबाबदार होते, त्या नियमास तो अनुसरला नाहीं. माल बला पोंचत नाहीं तर, माल योग्य रीतीनें स्वाधीन केला नाहीं सबब बवर किंमतीविषयीं दावा आणतां येणार नाहीं.

कांहीं माल स्वाधीन करून दिला असतां त्याचा परिणाम.

९२. सर्व माल स्वाधीन केला जात आहेच इतक्यांत त्याचा जो कांहीं भाग स्वाधीन केला तो स्वाधीन केल्याचें आणि सर्व माल स्वाधीन केल्याचें फळ सर्व मालाचें स्वामित्व खरीददारास येण्याच्या संबंधानें पाहिलें असतां, एकच आहे. परंतु मालाचा कांहीं भाग स्वाधीन केला, आणि तो सर्व मालांतून तेवढाच निराळा करण्याच्या हेतूनें केला तर त्याचें फळ बाकी राहिलेला सुद्धां स्वाधीन केला असें होत नाहीं.

### उदाहरणें.

(अ.) अच्या नांवावर ज्यांत बारदान आहे असें एक जहाज बंदरांत येतें. अ हा त्या बारदानचा खरीददार आहे. कप्तान जहाज रिकामें करूं लागतो आणि मालांपैकीं कांहीं माल अच्या स्वाधीन करितो. बाकीही सर्व माल त्याच्या स्वाधीन होतोच आहे. तर जो स्वाधीन झाला तितक्यानेंच, सर्व मालाचें स्वामित्व देणें ह्या संबंधानें पाहिलें असतां, सर्व माल स्वाधीन केला असें झालें.

(ब.) अ बला जळाऊ लांकडांचा गंज विकतो. गंज स्वाधीन केल्यावर बनें किंमत द्यावयाची आहे. विक्री झाल्यावर ब त्या लांकडांपैकीं कांहीं लांकडें नेण्याची परवानगी अ जवळ मागतो आणि ती अ देतो. तर येणेंकरून कायद्याच्या दृष्टीनें सर्व माल स्वाधीन केला असें होत नाहीं.

(क.) अ बला ५० मण तांदूळ विकतो. ते तांदूळ अद्यापि अच्या वखारींतच आहेत. पण विक्री झाल्यावर त्यांपैकीं १० मण तांदूळ ब कला विकतो आणि बनें सांगितल्यावरून ते १० मण तांदूळ अ हा कला पाठऊन देतो. तर येणेंकरून सर्व तांदूळ स्वाधीन केले असें कायद्याचे दृष्टीनें होत नाहीं.

खरेदीदार स्वाधीन करून मागेतोंपर्यंत विकणारानें स्वाधीन केला पाहिजे असें नाहीं.

९३. जर विशेषेंकरून कांहीं वचन झालें नसेल, तर खरेदीदार स्वाधीन करून मागेतोंपर्यंत माल स्वाधीन करून देणें हें मालाच्या विकणारास भाग नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

दर खंडीस १९६ रुपये प्रमाणें कापसाचे १०० गठे ता. २६ मे सन १८८६ रोजीं वादीच्या स्वाधीन करण्याबद्दल प्रतिवादी यानें ता. १५ डिसेंबर सन १८८६ रोजीं करार केला. वादी यानें तो करार ता. २८ फेब्रुवारी सन १८८७ रोजीं खोरसी खेतसी नांवाचे मनुष्यास लावून दिला; आणि पुढें थोडेच दिवसांनीं ह्मणजे ता. ७ मार्च सन १८८७ रोजीं तो नादार झाला. त्यानें आपल्या मिळकतीची जी यादी कोर्टांत हजर केली होती तींत त्या करारावद्दल किंवा तो करार दुसऱ्यास लावून दिल्याबद्दल किंवा त्या लावून देण्याचे कामांत कांहीं मोबदला घेतल्याबद्दल त्यानें कांहींएक लिहिलें नव्हतें. खोरसी खेतसी यानें, त्या कराराचा फायदा आपल्यास मिळावा असें समजून सदहू माल आपल्या स्वाधीन करण्याबद्दल त्यानें प्रतिवादीस कळविलें आणि त्या मालाची किंमत देण्यास आपण तयार आहों असें त्यास सांगितलें; परंतु वादी नादार झाला आहे ही गोष्ट प्रतिवादीस माहीत असल्यावरून त्यानें खोरसी खेतसी यास किंमतदार मोबदला देऊन प्रामाणिकपणानें तो करार लावून घेतलेला नाहीं व तें लावून घेणें पोकळ आहे व त्या कराराचा फायदा खोरसी खेतसी यास मिळावा असा वादीचा उद्देश नव्हता, असें कारणावरून तो माल देण्याचें नाकबूल केलें. सदहू करार तोडल्यामुळें झालेलें नुकसान घेण्यासाठीं खोरसी खेतसी यानें प्रतिवादीवर दावा केला. तें लावून घेणें लबाडीचें होतें असें कारणावरून तो दावा रद्द झाला. खोरसी खेतसीचा तो दावा रद्द झाल्याची गोष्ट वादीस सन १८८७ सालीं कळली, परंतु तो करार पुरा करून घेण्याकरितां वादीनें स्वतः प्रतिवादीपाशीं कधींही मागणें केलें नव्हतें. वादी यानें नादारींतील अर्जाचें काम पुढें न चालविल्यामुळें त्याचा तो अर्ज ता. ६ नोवेंबर सन १८८९ रोजीं रद्द झाला, व खोरसी खेतसी यानें ता. १८ नोवेंबर सन १८८९ रोजीं तो करार पुनः वादीस परत दिला. तो करार तोडल्यामुळें झालेलें नुकसान घेण्याकरितां वादी यानें प्रतिवादीवर हल्लीं हा दावा केला आहे. वादीचें असें ह्मणणें आहे कीं, सदहू करार खोरसी खेतसी यास जो मी लिहून दिला होता तो आफिशियल असायनी व माझे धनको यांस बुडविण्याकरितां जरी लावून दिला होता तरी प्रतिवादीशीं मी कांहीं कपट केलें नव्हतें, आणि माझा नादारींतील अर्ज रद्द झाला असल्यामुळें माझ्या नादारीच्या पूर्वी सदहू करारावरून पक्षकारांचे हक्क व जबाबदाऱ्या जशा होत्या तशा त्या पुनः कायम राहिल्या आहेत.

ठरावः—प्रतिवादीपासून नुकसानी घेण्याचा वादीस हक्क नाहीं. सन १८७२ चा आक्ट ९ कलम ९३ यांत सांगितल्याप्रमाणें वादी यानें स्वतः किंवा त्याचें करितां दुसरे कोणी माल स्वाधीन करून देण्याबद्दल प्रतिवादीपाशीं मागणें केलें नव्हतें. त्या कराराचा फायदा घेणारा मालक या नात्यानें खोरसी खेतसी यानें तो माल स्वाधीन करून देण्यावरून प्रतिवादीपाशीं मागणें केलें होतें, परंतु वादीच्या त्या कराराच्या लावून देण्याबद्दल ती मिळकत खोरसी खेतसी याजकडे गेली नव्हती; आणि त्या करारांतील पूर्ण मालकी आपल्याकडे आली आहे असें जो एखादा असायनी शाबीत करूं शकेल त्यास मान्य करणें जरी प्रतिवादीस भाग होतें तरी त्या करारांतील हक्कसंबंध वादीकडेच राहिले असल्यामुळें खोरसी खेतसी यास मान्य करणें प्रतिवादीस भाग नव्हतें.

एखादा करार दस्तऐवज करून लावून दिला असतां, त्यांतील मिळकत असायनीकडे जाते व त्याबद्दल तो लावून देणारा किंवा धनकोखेरीज दुसरे कोणी लोक, तो व्यवहार खरा नव्हता असें कारणावरून कोर्टांत तक्रार करूं शकत नाहींत, असें इंग्लंडांत समजतात; परंतु तसा लावून देण्याबद्दल जर दस्तऐवज झाला नसेल तर ते लावून देणें पोकळ होतें असें शाबीत

करितां येतें. तें लावून देणें पोकळ आहे असें तिसरे लोक सर्व बाबतींत हिंदुस्थानांत शाबीत करूं शकतात. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १५ पृ. १; न्या. पु. २६ मुं. दि. नि. पृ. १ व २ ).

स्वाधीन करून देण्याची जागा.

९४. स्वाधीन करून देण्याविषयीं जर विशेषें करून कांहीं वचन झालें नसेल, तर विकलेला माल विक्री होते वेळीं जेथें असेल तेथें तो स्वाधीन करून द्यावयाचा; आणि जो माल विकण्याविषयीं करार झाला असा माल विक्रीचा करार होते वेळीं त्याला अस्तित्व नसेल, तर जेथें तो उत्पन्न होईल तेथें स्वाधीन करून द्यावयाचा.

## विशेष समजुतीची टीप.

वादी हा एक कमिशन एजंट असून व्यापारी होता व तो मुंबई येथें आपला धंदा करीत असे, प्रतिवादी हेही कमिशन एजंट असून व्यापारी होते व वर्धा जिल्ह्यांतील फुलगांव येथें ते आपला धंदा करीत असत. आपल्या तर्फेनें कांहीं व्यवहार करण्याविषयीं वादीनें प्रतिवादींस सांगितलें, वादीतर्फे कमिशन एजंट या नात्यानें प्रतिवादींनीं सदहू व्यवहार करण्यास आरंभ केला. फुलगांव येथून वादीकडे मुंबई येथें हिशेब पाठविण्यांत येत असत व पत्रव्यवहार करण्यांत येत असे; व त्याचप्रमाणें वादी मुंबईहून फुलगांव येथें प्रतिवादींकडे हिशेब व पत्रव्यवहार पाठवीत असे. त्यानंतर वादीनें लेटर्सपेटंटचें कलम १२ अन्वयें परवानगी मिळण्यासाठीं अर्ज केला व मुंबई हायकोर्टांत प्रतिवादींवर त्यानें दावा केला; आपण स्वतः मालक व फुलगांव येथील प्रतिवादी हे कमिशन एजंट या नात्यानें उभयतांचेमध्यें हिशेब होऊन जी अखेर बाकी प्रतिवादींकडे येणें निघत होती ती घेण्यासाठीं वादीनें हा दावा केला होता; अधिकाराचे कारणावरून प्रतिवादींनीं तक्रार केली.

**ठरावः**—ज्याअर्थी, ( १ ) मुंबईहून प्रतिवादींकडे सूचनात्मक पत्रें पाठविण्यांत येत असत; ( २ ) मुंबई येथें वादीकडे हिशेब देण्यांत येत असत आणि ( ३ ) मुंबईहून फुलगांव येथें प्रतिवादीकडे मागणें करण्यांत आलें आहे त्याअर्थी, रकमेची फेड मुंबई येथें करावयाची असें उघड सिद्ध होतें. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३० पृ. १६७; न्या. पु. ४६ मुं. दि. नि. पृ. ८६ ).

## विकणाराचा लियन.

विकणाराचा लियन.

९५. करारावरून तद्विरुद्ध उद्देश दिसून येत नसेल, तर विकलेला माल जोंपर्यंत विकणाराच्या ताब्यांत राहील, आणि त्याची किंमत अथवा तिचा कांहीं भाग द्यावयाचा राहिला असेल तोंपर्यंत विकणाराला त्या मालावर*लियन राहतो.

* टीपः—' लियन ' हा शब्द इंग्रजी भाषेंतील असून अटकावून ठेवण्याचा हक्क या अर्थाचा आहे. त्याला बरोबर अर्थाचा पर्याय शब्द मराठींत नसल्यामुळें तोच मराठींत घेतला आहे. त्याचा अर्थ येणेंप्रमाणें.—" कोणा मनुष्याच्या कबजांत दुसऱ्या मनुष्याची कांहीं वस्तु आहे, आणि त्या दुसऱ्या मनुष्याकडून कांहीं यावयाचें असेल तें येईपर्यंत ती वस्तु अटकावून ठेवण्याचा जो

( पुढें चालू ).

किंमत पुढें द्यावयाची पण स्वाधीन करून देण्याची वेळ नेमली नसेल तर लियन.

९६. जर करारांत असेल कीं, किंमत भविष्यकाळीं एक रोजीं द्यावयाची, परंतु माल स्वाधीन करून देण्याला वेळ नेमली नसेल तर विकणाराला लियन राहत नाहीं, आणि पैसा दिल्याशिवाय माल लागलाच स्वाधीन करून घेण्याचा खरेदीदाराला हक्क आहे. परंतु जर माल स्वाधीन करून जाण्यापूर्वीं, खरीददार नादार होईल, अथवा पैसा देण्याला नेमलेली वेळ माल स्वाधीन करून दिला जाण्यापूर्वीं येईल, तर विकणारा किंमतीसाठीं माल आपले जवळ ठेऊन घेऊं शकेल.

'नादारी' या शब्दाचें लक्षण.

**खुलासा:**—ज्यानें आपलीं कर्जें नेहमींच्या उद्योगाच्या क्रमांत देण्याचें बंद केलें अथवा जो तीं देण्यास नालायक आहे, तो नादार झाला असें ह्मणावें.

**उदाहरण.**

अच्या वखारींत असलेली साखर अ हा बला विकतो. अशी कबुलायत झाली आहे कीं, किंमत तीन महिन्यांनीं द्यावी. ब साखर अच्या वखारींत राहूं देतो. तीन महिने भरण्यापूर्वीं ब नादार होतो. तर अ किंमतीसाठीं माल अटकावून ठेऊं शकेल.

किंमत पुढें एकाद्या दिवशीं द्यावयाचा असून खरीददार विकणाराच्या ताब्यांत मात्र राहूं देईल तर विकणाराचा लियन.

९७. किंमत पुढें एकादे दिवशीं द्यावयाची असे करारांत असून, त्या दिवसापर्यंत खरीददार माल विकणाराच्या ताब्यांत राहूं देईल, आणि त्याची किंमत त्या रोजीं न देईल, तर विकणारा किंमतीसाठीं माल अटकावून ठेऊं शकेल.

**उदाहरण.**

अच्या वखारींत असलेली कांहीं साखर अ हा बला विकतो. अशी कबुलायत

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालूं).

त्या कबजेवाल्यास हक्क असतो त्याचें नांव 'लियन' हा हक्क ह्मणजे, त्या मूर्तिमंत वस्तूवर स्वत्व असतें असें नव्हे, अथवा त्या मूर्तिमंत वस्तूविषयीं दावा आणण्याचा हक्क असेंही नव्हे.

'लियन' दोन प्रकारचा आहे, 'विशेष लियन' आणि 'साधारण लियन'. 'विशेष लियन' ह्मणजे सदर्हू प्रकारची जी वस्तु त्या खुद्द वस्तूवरूनच झालेला अथवा त्या खुद्द वस्तूच्या संबंधानें झालेला खर्च अगर वारसा भरून मिळेपर्यंत ती वस्तु अटकावून ठेवण्याचा हक्क. 'साधारण लियन' ह्मणजे, सदर्हू प्रकारचा खर्च आणि वारसा भरून मिळेपर्यंत असें नव्हे; पण, पक्षकारांच्या दरम्यान तशा प्रकारच्या दुसऱ्या देवघेवीबद्दल साधारण बाकी असलेली परत मिळेपर्यंत ती वस्तु अटकावून ठेवण्याचा जो हक्क तो." हाटनचा कायदे कोश, तिसरी आवृत्ति १८६४ शंकर पांडुरंग पंडित व ख. रु. काणेकृत.

झाली आहे कीं, किंमत तीन महिन्यांनीं द्यावी. व हा तीन महिने संपून जाईपर्यंत साखर अच्या वखारींत राहूं देतो, आणि तिची किंमत तीन महिने संपले त्या रोजीं येत नाहीं. तर किंमतीसाठीं अ माल अटकावून ठेवूं शकेल.

नंतरच्या खरीददाराविरुद्ध विकणाराचा लियन.

९८. विकलेला माल विकणाराच्या ताब्यांत आहे, आणि तो खरीददाराकडून दुसऱ्या खरीददारानें विकत घेतला असेल, तर नंतरच्या त्या खरीददाराचा हक्क पहिल्या विकणारानें कबूल केला नसेल, तर नंतरच्या कोणत्याही खरीददाराविरुद्ध पहिला विकणारा किंमतीसाठीं माल अटकावून ठेवूं शकेल.

## माल वाटेंत थांबविणें.

माल वाटेंत थांबविण्याचा विकणारास हक्क.

९९. विकणारानें माल ताब्यांतून जाऊं दिला, आणि त्याला सगळी किंमत पोहोंचली नसल्यास, खरीददार नादार होईल तर माल खरीददाराकडे जात असतांना वाटेंत थांबविण्याचा हक्क विकणारास आहे.

## विशेष समजुतीची टीप.

**वाटेंत माल थांबविण्याचा हक्क.**—वादी हा खरेदी देणारा या नात्यानें माल वाटेमध्यें अडकाऊन ठेवण्याचा हक्क सांगत आहे तर प्रतिवादी हा नं. २ चा खरेदी घेणारा या नात्यानें रेलवे रिसीट ( हा दस्तऐवज मालावरील मालकी दर्शविणारा असतो ) घेवन घेणार म्हणून हक्क सांगत आहे. वादीप्रतिवादींच्या दरम्यानच्या या वादांत ज्या विद्वान जज्जासमोर दाव्याची अव्वल चौकशी झाली त्यांनीं त्यांचे समोर झालेल्या पुराव्याबद्दल जें मत दिलें आहे त्याप्रमाणें नकारात्मक गोष्ट शाबीत करण्याचा बोजा खरेदी देणारावर आहे अथवा आपण इमानानें वर्तन केलें असून मालाबद्दल किंमतवान मोबदला दिला आहे ही अस्तिपक्षी गोष्ट शाबीत करण्याचा बोजा नं. २ च्या खरेदी घेणारावर आहे असा प्रश्न या अपिलांत उपस्थित करण्यांत आला आहे. खरेदी घेणार नंबर १ हा नादार झाला असून त्याचे विरुद्ध खरेदीची रकम न मिळालेला खरेदी देणारा या नात्यानें वादीस कराराच्या आक्टाचें कलम ९९ अन्वयें माल वाटेमध्यें अडकावण्याचा हक्क आहे या गोष्टीबद्दल वाद नसून वादीनें ज्या वेळीं माल अडकाविला त्यावेळीं तो वाटेमध्यें होता व वादीनें अवश्य ती नोटीस रेलवे कंपनीस दिली होती याबद्दलही वाद नाहीं.

**ठरावः**—पुराव्याचा बोजा प्रतिवादीवर असून आपण इमानानें वर्तन केलें व किंमतवान मोबदला दिला हें शाबीत करणें हें प्रतिवादीचें कर्तव्य आहे. प्रतिवादीचें वर्तन इमानाचें नव्हतें अगर त्यानें मोबदला दिला नाहीं हें शाबीत करणें हें वादीचें काम नव्हतें.

वाटेमध्यें माल अडकाविण्याच्या हक्काचें मूळ व त्याचें स्वरूप याबद्दल विचार करण्यांत येऊन त्याचा खुलासा करण्यांत आला. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ५० पृ. ३९९; न्या. पु. ५८ क. दि. नि. पृ. ७२. )

१००. माल*हुंडेकऱ्याच्या ताब्यांत आहे, अथवा खरीददाराकडे पाठविला जातांना कोठें तरी ठेविला आहे, आणि तो अद्याप खरीददाराच्या अथवा त्याच्या तर्फे कोणाही मनुष्याच्या ताब्यांत, हुंडेकऱ्याच्या ताब्यांत असेल अथवा कोठें तरी ठेविला असेल त्याशिवाय दुसऱ्या रीतीनें, आला नसेल, तर तो माल वाटेंत आहे असें समजावें.

माल वाटेंत आहे असें केव्हां समजावें.

## उदाहरणें.

(अ.) ब मद्रासेंत राहतो आणि अ पाटणा येथें असतो. ब अकडून कांहीं माल मागवितो आणि तो मद्रासेस पाठवावा असें सांगतो. माल कलकत्याला पाठविला आणि पुढें मद्रासेस रवाना करण्यासाठीं क या धक्केवाल्याचे स्वाधीन केला, तर तो माल कच्या ताब्यांत आहे तोंपर्यंत वाटेंत आहे.

(ब.) ब दिल्लींत राहतो आणि तो कलकत्याहून अकडून कांहीं माल मागवितो. अ माल बच्या नांवें दिल्लीस पाठवितो. तेथें पोहोंचल्यावर तो बच्या वखारींत नेला जाऊन तेथें ठेविला गेला. ब तो स्वीकारण्यास नाकारतो, आणि नंतर लागलाच लोकांचा पैसा देणें बंद करितो. तर हा माल वाटेंत आहे.

(क.) ब पुण्यास राहतो आणि तो मुंबईहून अकडून कांहीं माल मागवितो. बनें कला हुंडेकरी नेमिलें आहे. त्याप्रमाणें कच्या हातें अ माल पुण्यास पाठवितो. माल पुण्यास येऊन पोंचल्यावर बच्या सांगण्यावरून तो कनें ब करितां आपल्या (कच्या) वखारींत ठेविला. तर हा माल आतां वाटेंत नाहीं.

(ड.) ब हा लंडनचा सावकार, अ या मुंबईंतील सावकाराकडून १०० गठे कापूस मागवितो. ब त्या कापसाकरितां आपलें जहाज मुंबईला पाठवितो. तर कापूस जहाजावर स्वाधीन करून देतांच त्याचें वाटेंत असणें संपलें.

(इ.) ब हा लंडनचा सावकार, अ या मुंबईंतील सावकाराकडून १०० गठे कापूस मागवितो. ब त्या कापसाकरितां आपलें जहाज मुंबईला पाठवितो. अ कापूस जहाजावर स्वाधीन करून देतो, आणि कपतानाकडून बिल आफ लेडिंग म्हणजे जहाजावर लादल्याचा दाखला घेतो. या दाखल्यावरून, कापूस, अ हुकूम करील त्याच्या किंवा अच्या असैनीच्या स्वाधीन करून द्यावयाचा. कापूस लंडनास पोंचतो, परंतु बच्या ताब्यांत येण्यापूर्वी ब नादार होतो. कापसाची किंमत अजून दिलेली नाहीं. तर अ कापूस थांबवूं शकेल.

* सन १८६५ चा आक्ट ३ कलम २ प्रमाणें, "हुंडेकरी" ह्मणजे, सरकार खेरीज करून इतर कोणी मनुष्य भाडें घेऊन लोकांचा माल एका जागेंतून दुसरें जागीं खुष्कीनें किंवा नदींतून किंवा खाडींतून नेण्याचें काम करीत असेल, तो समजावा.

१०१. थांबविण्याविषयीं विकणाराचा हक्क, यानंतर खालीं सांगणार ते प्रसंग खेरीज करून, माल वाटेंत असतांना तो खरीददारानें पुनः विकल्यास आणि किंमत घेतल्यास, संपत नाहीं, परंतु द्वितीय खरीददाराच्या अथवा त्याच्या तर्फे कोणत्या तरी मनुष्याच्या स्वाधीन माल केला जाईपर्यंत, चालू राहतो.

थांबविण्याचा हक्क चालू राहणें.

१०२. खरीददाराला बिल आफ लेडिंग * अगर मालावर हक्क आहे असें दाखविणारा दुसरा दस्तऐवज मिळाला, आणि सदर्हू बिल अगर दस्तऐवज त्यानें, माल वाटेंत असतांना, दुसऱ्या खरीददाराच्या नांवें करून दिला, व तो दुसरा खरीददार इमानानें घेत आहे, आणि त्या मालाबद्दल मौल्यवान मोबदला देत असेल, तर थांबविण्याचा हक्क संपेल.

हक्काचा दस्तऐवज खरीददारानें दुसऱ्याच्या नांवें करून दिल्यास थांबविण्याचा हक्क संपतो.

उदाहरणें.

(अ.) अ कांहीं माल बला विकून त्याचे नांवें पाठवून देतो, आणि बिल आफ लेडिंग बकडे रवाना करितो. अला अद्याप पैसा न पोहोंचला असतां ब नादार होतो, आणि माल वाटेंत असतांनाच ब रोख पैसा घेऊन बिल आफ लेडिंग कच्या नांवें करून देतो; कला बच्या नादारीची माहिती नाहीं. तर अ माल वाटेंत थांबवूं शकणार नाहीं.

(ब.) अ कांहीं माल बला विकून त्याचें नांवें पाठवून देतो. अचा पैसा अद्यापि द्यावयाचा असतांना ब नादार होतो, आणि माल अद्यापि वाटेंत असतांना ब हा रोख पैसा घेऊन बिल आफ लेडिंग कच्या नांवें करून देतो; ब नादार झाल्याविषयीं कला ठाऊक आहे. तर कच्या नांवें झालें तें इमानानें झालें नसल्यामुळें अला माल अजून वाटेंत थांबवितां येईल.

१०३. बिल आफ लेडिंग अगर मालावरचा हक्क दाखविणारा दुसरा कोणताही दस्तऐवज, इमानानें स्पष्टपणें त्याजवर दिलेल्या रकमेबद्दल तारणाऐवजीं सदर्हू मालाच्या खरीददारानें गहाण देऊन दुसऱ्याच्या नांवें करून दिला असेल, तर विकणारास

कर्जाऊ दिलेल्या विशेष रकमेच्या तारणाऐवजीं हक्काचा दस्तऐवज

* १. बिल आफ लेडिंग या शब्दाचा अर्थः—" दस्तऐवजांत लिहिलेला माल पोंहोंचला व तो मी दस्तऐवजांत लिहिलेले किंवा दर्शविलेले अमूक बंदरीं व अमूक मनुष्याचें स्वाधीन करीन " म्हणून तारवाचे मालकानें किंवा त्याचे अडत्यानें सही करून दिलेले प्रत्येक दस्तऐवजाचा समावेश " बिल आफ लेडिंग " या शब्दांत होतो असें समजावें. ( सन १८७९ चा आक्ट १ स्टांप आक्ट कलम ३ ).

२. बिल आफ लेडिंग ( यांत थ्रू बिल आफ लेडिंगचा समावेश होतो. ) परंतु त्यांत मेटच्या पावतीचा समावेश होत नाहीं. ( सन १८९९ चा आक्ट २ स्टांप आक्ट कलम २ रकम [ ४ ] ).

नांवें करून दिलं असेल तेव्हां विकणारानें माल थांबविण्यास काय करावें. माल वाटेंत थांबवितां येणार नाहीं. मात्र ज्याजपाशीं गहाण ठेविला असेल त्यानें दिलेली रक्कम त्याला दिल्यास अथवा देण्याला काढिल्यास थांबवितां येईल.

## उदाहरणें.

(अ.) अ १२,००० रुपये किंमतीचा माल बला विकून त्याचें नांवें रवाना करून देतो. त्या मालाचें बिल आफ लेडिंगवर कनें बला ५,००० रुपयांची विशेष रक्कम कर्जाऊ दिली आहे. त्या विशेष रकमेच्या तारणा ऐवजीं तें बिल आफ लेडिंग ब कच्या नांवें करून देतो. ब हा नादार होतो आणि बनें कचे ९,००० रुपयेपर्यंत कर्ज द्यावयाचें आहे. तर अ हा कचे ५,००० रुपये न देईल किंवा देऊं न काढील तर अला माल वाटेंत थांबविण्याचा अधिकार नाहीं.

(ब.) अ १२,००० रुपये किंमतीचा माल बला विकून त्याचे नांवें रवाना करून देतो. कचें आणि बचें पूर्वीचें देणें घेणें होतें त्याचा हिशोब केल्याअंतीं बनें कचे ५,००० रुपये देणें ठरलें होतें. या ५,००० रुपयांच्या तारणाऐवजीं सदरहू मालाचें बिल आफ लेडिंग ब हा कच्या नांवें करून देतो. ब हा नादार होतो. तर कला ५,००० रुपये न देतां अथवा देऊं न काढतां माल वाटेंत थांबविण्याचा हक्क अला आहे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. रेलवेच्या पावत्या ह्या सन १८७२ चा आक्ट ९ कलम १०३ याचे अर्थाप्रमाणें, मालावरचा हक्क दाखविणारे दस्तऐवज नाहींत आणि त्याजवर सही करून पहिल्या प्रतिवादीनें त्या बिना देवीकरणंच्या पेढीस दिल्या एवढ्यावरून सदरहू कलमाचे अर्थाप्रमाणें दुसऱ्या प्रतिवादीस त्या लावून दिल्या होत्या असें होत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १४ पृ. ५७; न्या. पु. २५ मुं. दि. नि. पृ. ४२).

२. बागलकोटाहून एनें बीच्या नांवावर मुंबई येथें कापसाचे कांहीं गठ्ठे पाठविले. हे गठ्ठे मुंबईस नेण्याकरितां बागलकोटला एनें मद्रास ॲन्ड सदर्न मराठा रेलवेच्या हवालीं केले. सदर माल बागलकोटाहून मार्मगोव्यापर्यंत कंपनीच्या लायनीनें आला; व नंतर मार्मगोव्यापासून मुंबईपर्यंत बांबे स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या बोटीनें आला. रेलवे कंपनीनें या मालाबद्दल एला पावत्या दिल्या. पाठविलेल्या मालाच्या किंमतीबद्दल बीनें एच्या नांवावर हुंड्या दिल्या.

माल वाटेंत बांबे स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या ताब्यांत असतांना बी हा नादार झाला; व सदर मालाबद्दल बीनें एला दिलेल्या हुंड्यांपैकीं कांहीं हुंड्या पटल्या नाहींत. एनें नंतर वाटेंत माल थांबविला; व माल बीला न देतां सीला देण्याबद्दल स्टीम नॅव्हिगेशन कंपनीला लिहिलें.

मध्यंतरीं, बीनें डी व ई या इसमांपासून कर्ज काढलें व या मालापैकीं कांहीं गठ्ठ्यांबद्दलच्या पावत्या डी व ई यांस दिल्या. माल मुंबईस आल्यावर डी व ई यांनीं त्याचप्रमाणें सीनें सदर माल मागितला.

बांबे स्टीम नॅव्हिगेशन कंपनीनें ए, बी, व डी यांजवर एक व ए व ई यांजवर एक असे दोन दावे मांडले. दोन्ही दाव्यांतील प्रतिवादींनीं सदर कापसाच्या गठ्ठ्यांबद्दल वादीवर काम-

चालवूं नये अशी प्रतिवादींस ताकीद यावी; व प्रत्येक दाव्यांतील कापसाच्या गठ्यावर मालकी कोणाची आहे हें प्रतिवादींनीं आपसांत ठरवून घ्यावें असा प्रतिवादींस हुकूम करावा; अशी वादींनें दाव्यांत मागणी केली होती.

आपणांस तवदील करून दिलेल्या रेलवेच्या पावत्यांवद्दल कर्जाऊ दिलेली रक्कम परत मिळण्याकरितां डीनें ए व बी यांजवर दावा लावला होता. नंतर डीच्या हिशोबाच्या वह्यांत बीच्या खात्यांत निरनिराळ्या रकमा जमा केल्या होत्या असें आढळून आलें. कराराचा आक्ट कलम ६१ मध्यें घालून दिलेला नियम लागू केला असता तर सदर कर्जाची फेड झाली आहे असें समजावें लागेल.

ठराव:—तव्याच्या रेलवेच्या पावत्यांत कापसाचे जे गठ्ठे आहेत ते गठ्ठे विकून येणाऱ्या रकमेमधून आपली रक्कम घेण्याकारतां डीनें दावा लावला असल्यामुळें डीचा इरादा दिसून येत आहे त्यामुळें वरील नियम लागू करतां येत नाहीं.

एच्या विरुद्ध कराराचा आक्ट कलम १०३ चा फायदा डी व ई यांस मिळाला पाहिजे; व कापसाचे गठ्ठे ज्या इसमांनीं विकले आहेत त्यांनीं खर्चाची योग्य रक्कम वजा करून विक्रीची बाकीची रक्कम डी व ई यांच्या स्वाधीन करावी. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३८ पृ. २५५; न्या. पु. ४९ मुं. दि. नि. पृ. ९१ व ९२).

३. प्रिव्हिकौन्सिलचा ठराव:—अमरचंद ॲण्ड को वि० रामदास विठ्ठलदास दरबार (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३८ पृ २५५) या कज्जांत मुंबई हायकोर्टानें केलेला ठराव कायम करून प्रस्तुतच्या कज्जांतील रेलवेची पावती ही कराराच्या आक्टाचें (सन १८७२ चा आक्ट ९) कलम १०३ मधील अर्थाप्रमाणें "मालकीबद्दलचा दस्तऐवज" या सदरांत येते असा ठराव करण्यांत आला. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४० पृ. ६३०; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. २९८).

**१०४.** विकणारानें माल वाटेंत थांबविणें तो माल खरोखर आपल्या ताब्यांत घेऊन थांबवावा, अगर ज्या हुंडेकऱ्याच्या अथवा ठेवून घेणाराच्या ताब्यांत तो असेल त्याला आपल्या हक्काविषयीं खबर द्यावी म्हणजे थांबविला असें होईल.

थांबविण्याचा प्रकार.

**१०५.** ती खबर माल प्रत्यक्ष ज्याच्या ताब्यांत असेल त्याला अथवा ज्याच्या नोकराच्या ताब्यांत असेल त्या धन्याला द्यावी. नोकराच्या धन्यास खबर दिली तर ती अशा वेळीं आणि अशा प्रसंगीं दिली पाहिजे, कीं त्या धन्यानें साधारण हुषारी राखल्यास त्याला ती खबर आपल्या नोकरास वेळेवर कळवून माल खरीददाराचे स्वाधीन होणें बंद करितां यावें.

विकणाराच्या हक्काची खबर.

**१०६.** वाटेंत माल थांबविण्यानें थांबविलेला माल विकलेल्या सगळ्या मालाची किंमत येईपर्यंत ठेवून घेण्याचा हक्क विकणारास येतो.

थांबविल्यावर विकणाराचा हक्क.

### उदाहरण.

अ बला १०० गठ्ठे कापूस विकतो; त्यांपैकीं ६० गठ्ठे बच्या ताब्यांत आले असून आणि ४० गठ्ठ वाटेंत असतां ब हा नादार होतो; आणि अला अद्यापि पैसा न पोंचल्यामुळें तो वाटेंत असलेले ४० गठ्ठ थांबवितो. तर ते ४० गठ्ठे १०० गठ्ठ्यांची किंमत येईपर्यंत ठेऊन घेण्याचा हक्क अला आहे.

### पुनर्विक्री.

खरीददारानें करार पुरा न केल्यास पुनर्विक्री.

१०७. खरीददारास विकलेला माल त्यानें न घेतल्यानें अथवा त्याची किंमत त्यानें न दिल्यानें, तो कराराचा आपला पक्ष पुरा करण्यास चुकेल तेव्हां, विकणाराचा मालावर लियन असेल अगर त्यानें तो वाटेंत थांबविला असेल तर आपला तसा उद्देश असल्याविषयीं खरीददारास खबर दिल्या नंतर योग्य वेळ गेल्यावर तो माल सदर्हू विकणारास पुनः विकतां येईल, आणि पुनर्विक्रीमुळें कांहीं तोटा आल्यास खरीददारानें भरला पाहिजे, परंतु पुनर्विक्रीच्या वेळीं नफा झाल्यास खरीददाराचा त्यावर हक्क नाहीं.

### विशेष समजुतीची टीप.

**खरेदी देणाराचा माल पुनः विक्री करण्याचा हक्क.—ठरावः—**खरेदी घेणारानें माल ताब्यांत घेण्याचें नाकारिल्यास पुन्हां मालाची विक्री करण्याचा हक्क खरेदी देणारास स्पष्ट शब्दांत दिला नसला तरी कराराच्या आक्टाचें कलम १०७ प्रमाणें ( सन १८७२ चा आक्ट ९ ) खरेदी देणारास असतो. ( इं. ला. री. ला. सी. व्हा. ४ पृ. २१५; न्या. पु. ५८ ला. दि. नि. पृ. १२ व १३ ).

### हक्क.

माल विकणाराकडून खरीददाराला हक्क येतो तो.

१०८. खालीं लिहिलेल्या प्रकरणीं खेरीज करून कोणत्याही विकणाराच्या मालावर स्वतःचा हक्क असेल त्यापेक्षां त्या मालावर जास्त हक्क खरीददारास तो विकणारा देऊं शकत नाहीं:—

अपवाद १:—जेव्हां मालकाच्या राजीनें कांहीं माल अथवा एकादें बिल आफ लेडिंग *डाक वारंट, वखारवाल्याचें सर्टिफिकेट, धक्केवाल्याचें सर्टिफिकेट, अथवा

* " कोणतेही गोदींतील किंवा वखारींतील किंवा धक्यावरील मालावर अमूक मनुष्याचा किंवा त्याचे असैनीचा हक्क आहे असें ज्या दस्तऐवजावरून होत असेल, किंवा तो दस्तऐवज ज्याजवळ असेल त्याचा हक्क आहे असें होत असेल, आणि सदर्हू प्रकारचा माल ज्या कंपनीचें किंवा मनुष्याचे स्वाधीन असेल त्या कंपनीनें किंवा मनुष्यानें किंवा त्याचे तर्फे कोणी त्या दस्तऐवजावर सही केली असेल, किंवा दाखला लिहून दिला असेल, तर्से प्रत्येक दस्तऐवजाचा समावेश " डाक वारंट " या शब्दांत होतो असें समजावें "–( सन १८६९ चा आक्ट १८ क. ३ र. १३ ).

स्वाधीन करण्याचें वारंट किंवा हुकूम, अथवा मालावर हक्क आहे असें दाखविणारा दुसरा दस्तऐवज, एकाद्या मनुष्याच्या ताब्यांत असेल, तेव्हां जो माल सदहू प्रमाणें त्याच्या ताब्यांत असेल, त्या मालाचें अथवा सदहू प्रकारचें दस्तऐवज ज्या मालाविषयीं असतील त्या मालाचें, स्वामित्व सदहू मनुष्य कोणत्याही मनुष्यास देऊं शकेल, आणि मालाची आज्ञा अन्यथा कशीही असली तरी त्या दुसऱ्या मनुष्यास त्या मालावर चांगला हक्क देऊं शकेलः मात्र खरीददार इमानानें वागला पाहिजे, आणि अशा प्रसंगीं कीं, माल अथवा दस्तऐवज ज्याच्या ताब्यांत आहेत त्याला माल विकण्याचा अधिकार नाहीं असें ज्यावरून योग्य अनुमान काढितां येईल असा प्रसंग असू नये.

अपवाद २.—जर मालाच्या कितीएक संयुक्त मालकांपैकीं केवळ एकाच जवळ बाकीच्या मालकांच्या परवानगीनें मालाचा कबजा असेल, तर जो त्या मालाचा त्या एका संयुक्त मालकाकडून इमानानें खरीददार होईल आणि अशा प्रसंगानें कीं, ज्याच्या ताब्यांत माल आहे त्याला तो विकण्याचा अधिकार नाहीं असें योग्य अनुमान करितां येणार नाहीं, तर मालाचें स्वामित्व त्या खरीददाराला जाईल.

अपवाद ३.—जेव्हां कांहीं करारावरून एकाद्या मनुष्यानें आपल्या ताब्यांत माल घेतला असेल आणि तो करार त्यांतील दुसऱ्या पक्षकाराच्या इच्छेवरून निरर्थक करण्याजोगा असा असेल, तेव्हां करार रहित करण्यापूर्वी, जर कोणी तिसरा मनुष्य तो माल ज्याच्या ताब्यांत आहे त्याजकडून इमानानें विकत घेईल, तर त्याचें स्वामित्व त्याला येईल; मात्र, ज्या गोष्टीवरून तो करार निरर्थक करण्याजोगा झाला, त्या, ज्याच्या ताब्यांत माल आहे त्यानें अथवा ज्यांचा प्रतिनिधी तो आहे त्यांनीं केलेला एकादा जो अपराध तद्रूप असतील तर स्वामित्व जाणार नाहीं.

ही अशी गोष्ट घडून आल्यास मूळ विकणारास करार रहित करण्याचा प्रतिबंध झाल्यामुळें त्याला जो कांहीं तोटा झाला असेल त्याबद्दल नुकसानी मूळ खरीददाराकडून भरून घेण्याचा हक्क मूळ विकणाराला आहे.

उदाहरणें.

( अ. ) बनें कपासून एक गाय चोरली. ती अ हा इमानानें बजवळून विकत घेतो. तर गाईचें स्वामित्व अला आलें नाहीं.

( ब. ) अ हा सावकार ब ह्या आपल्या गुमास्त्याजवळ कांहीं मालाचें बिल आफ लेडिंग ठेवावयास देतो आणि बला हुकूम करितो कीं, कांहीं एक अमूक किंमतीखालीं तो माल विकू नये, आणि बला उधार देऊं नये. ब हा तो माल त्या

किंमतीहून कमी किंमतीला डला विकतो आणि पैसा ३ महिन्यांनीं देण्यास कबूल होतो. तरी मालावरचे स्वामित्व डला येतें.

(क.) अजवळ कांहीं मालाचें बिल आफ लेडिंग आहे. तो माल ब ला विकतो, परंतु बिल आफ लेडिंग वरून माल कच्या स्वाधीन केला पाहिजे आणि कनें त्या बिलाच्या पाठीवर शेरा लिहिला नाहीं, तर त्याचें स्वामित्व बला आलें नाहीं.

(ड.) अ, ब आणि क हे हिंदू असून अविभक्त बंधू आहेत. त्यांचीं कांहीं गुरें एकवट आहेत. ब आणि क हे अच्या ताब्यांत एक गाय ठेवितात आणि ती अ डला विकतो. ड हा इमानानें विकत घेतो. तर गायीचें स्वामित्व डला आलें.

(इ.) अ बची गैरसमजाविशी करून ब जवळून एक घोडा विकत घेऊन तो स्वाधीन करून घेतो. ठकबाजी केल्याप्रमाणें जिजपासून व्हावें अशी ती गैरसमजाविशी नव्हती. बनें करार रहित केल्यापूर्वीं अ तो घोडा कला विकतो. तर घोड्याचें स्वामित्व कला आलें; आणि बला करार रहित करण्याचा प्रतिबंध झाल्याबद्दल कांहीं तोटा झाला असेल त्याबाबद नुकसानी अ कडून भरून घेण्याचा हक्क बला आहे.

(फ.) अ बला अन्यायाची धमकी देतो आणि तेणेंकरून आपल्याला एक घोडा विकणें त्यास भाग पाडतो; किंवा ठकबाजी किंवा बनावट कागद करून तेणें करून तो आपणास एक घोडा विकत देई असें करितो; आणि बनें करार रहित करण्यापूर्वीं तो घोडा अ कला विकतो. तर स्वामित्व कला आलें नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. कोणत्याही विकणाराचा मालावर स्वतःचा हक्क असेल, त्या पेक्षां त्या मालावर जास्त हक्क खरेदीदारांस तो विकणारा देऊं शकत नाहीं, असा एक सर्वसाधारण नियम सन १८७२ चा आक्ट ९ कलम १०८ यांत घालून ठेवलेला आहे; परंतु त्या नियमांत त्याच कलमाच्या पहिल्या अपवादावरून ढिलाई केलेली आहे. पहिल्या अपवादांत जो ताबा सांगितला आहे, तो मालकांच्या संमत्तीनें आडकावून ठेवलेल्या गुरांचे प्रत्येक बाबतीस लागू पडत नाहीं. कांहीं विशेष प्रसंगीं मालकांनीं आपल्या मालाचा कबजा किंवा ताबा दुसऱ्याकडे राहूं दिला असेल व त्याजवरून ज्याच्या ताब्यांत तो माल आहे ते लोक त्या मालाचे मालक आहेत, अशी लोकांची समज होण्यासारखी असेल, व त्या मालाच्या खऱ्या मालकांनीं आपल्या मालाच्या संबंधानें योग्य तजवीज केली नसेल किंवा हयगय केली असेल तर त्या वेळेस मात्र तो पहिला अपवाद लागू पडतो.

तथापि कांहीं नियमीत कारणाकरितां एखादें गुरूं त्याचे मालकानें दुसऱ्याकडे राहूं दिलें असेल, तर तेवढ्यावरून सदर्हू अपवादांत सांगितलेल्या प्रकारचा त्या दुसरे मनुष्याचा ताबा होत नाहीं.

काहीं एक कारण नसतां एखाद्या मनुष्यानें दुसऱ्याच्या ताब्यांत आपलें गुरूं ठेविलें असेल तर त्या गुराचा ताबा मालकाकडेसच आहे असें होतें.

आपण घर सोडून बाहेर जाणार आहोंत तोंपर्यंत सांभाळ व्हावा म्हणून ख यानें आपली एक म्हैस आणि एक वासरूं अशीं कच्या स्वाधीन केलीं. क यानें ती जनावरें म यास विकलीं. तीं परत घेण्याकरितां ख यानें दावा केला.

ठरावः—ख यानें तीं गुरें क याजकडे उगाच आपण होऊनच ठेविलीं होतीं म्हणजे नुस्तीं त्यानें त्याच्या ताब्यांत दिलीं होतीं; सबब क यानें ज्या वेळेस त्या गुरांची विक्री केली, त्या वेळेस त्या गुरांचा अर्थसिद्ध ताबा ख याजकडे होता; आणि क याला स्वतःच जी मालकी नव्हती ती मालकी तो म यास देऊं शकला नव्हता. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ११ पृ. ७०४; न्या. पु. २२ मुं. दि. नि. पृ. २९५).

२. मालाची मालकी एकाकडून दुसऱ्याकडे जाणें.—वादी हा दलाल असून त्यांजवर मुल्याकरितां केलेल्या करारावद्दलची जवाबदारी होती. सदर्हू वादीन करारांतील माल आपल्या उपयोगाकडे लावला व सदर्हू मालाबद्दलचे दस्तऐवज स्वीकारून व ते एका त्रयस्थ इसमास देऊन प्रतिवादीनें वादीच्या या कृत्यास संमति दिलेली होती.

ठरावः—मालाची मालकी एकाकडून दुसऱ्याकडे गेलेली आहे व कराराच्या आक्टाचें कलम १०८ अपवाद १ येथें लागू पडत नाहीं.

कराराच्या आक्टाचें कलम १०८ अपवाद २ च्या कारणाकरितां प्रतिवादीस ज्या परिस्थितींत मालाच्या संबंधाच्या दस्तऐवजाचा ताबा मिळाला ती परिस्थिती पाहतां प्रतिवादीनें गुन्हा केल्यासारखें होत आहे असें वादीनें शाबीत केलें पाहिजे.

कराराच्या आक्टाचें कलम ९९ अन्वयें दिलेला वाटेमध्यें माल अडकविण्याचा अधिकार वादीस आहे.

मालासंबंधाचीं बिल्स ऑफ लेडिंग त्रयस्थ इसमाच्या स्वाधीन केल्यामुळें कराराच्या आक्टाचें कलम १०२ मधील अर्थाप्रमाणें सदर्हू बिलें बेचन दिलेलीं आहेत. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४६ पृ. ८३१; न्या. पु. ५४ क. दि. नि. पृ. २३).

३. कपटानें ठेवलेले भाग इमानानें खरेदी घेणें.—ज्या इसमाचे ताब्यांत कपटानें ठेवलेले भाग आहेत अशा इसमापासून एखाद्या इसमानें इमानानें आता खरेदी घेतले असले तरी खरेदी घेणारास त्यामुळें कायदेशीर रीतीनें भागांबद्दल मालकी प्राप्त होत नाहीं.

भागांबद्दलचीं सर्टिफिकीटें व त्यावरोबर बेचनासंबंधाचे कोरे कागद असें एका इसमाकडून दुसऱ्या इसमाकडे गेल्यामुळें सदर्हू सर्टिफिकीटें बेचन करतां येण्यासारखें दस्तऐवज या सदरांत येत नाहींत. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४६ पृ. ३३१; न्या. पु. ५४ क. दि. नि. पृ. ७).

४. गहाण टाकलेला माल इमानानें माहीत नसून खरेदी घेणें.—जो माल मालकानें गहाण ठेवला होता परंतु माल मालकाच्याच ताब्यांत होता असा माल एखाद्या इसमानें इमानानें माल गहाण टाकल्याची खबर नसतांना खरेदी घेतला असेल तर माल खरेदी घेणारावर गहाण बंधन होत नसून तो गहाणापासून मुक्त झालेला असा माल खरेदी घेतो. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४२ पृ. ५९; न्या. पु. ५४ म. दि. नि. पृ. ७).

५. निक्षेपीपासून निक्षिप्तवस्तू खरेदी घेणें.—आपखुषीनें निक्षेप केला असल्यास निक्षेपी हा इंडियन ट्रस्टस आक्टाचे प्रकरण ९ मधील अर्थाप्रमाणें निक्षेप करणाराचा ट्रस्टी होत नाहीं.

अशा निक्षेपीपासून इमानानें व योग्य मोबदला देऊन प्रतिक्षिप्त वस्तु खरेदी घेणाराचें संरक्षण ट्रस्ट आक्टाचें कलम ९६ व कराराच्या आक्टाचीं कलमें १०८ व ११८ यांतील ठरावांमुळें होत नाहीं. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४५ पृ. १५३; न्या. पु. ५७ म. दि. नि. पृ. ७).

## खात्री.

१०९. जर खरीददार अथवा त्याजवरून हक्क सांगणारा कोणी मनुष्य, विकणाराच्या गैर हक्काच्या कारणानें, विकलेल्या वस्तूस मुकला, तर करारावरून अन्यथा उद्देश दिसून येत नसल्यास, त्या मुकण्यानें झालेल्या तोट्याबद्दल खरीददाराला, अगर त्याजवरून हक्क सांगणाऱ्या मनुष्याला, विकणारा जबाबदार आहे.

विकणाराच्या गैर हक्काबद्दल त्याची जबाबदारी.

### विशेष समजुतीची टीप.

विकणारास हक्क नव्हता म्हणून विकलेली मिळकत खरेदीदाराच्या ताब्यांतून जाईल तर त्याजबद्दल खरेदीदाराला विकणारा जबाबदार आहे, असा ठराव वरील कलमांत केला गेल्या कारणानें, मालाचें विक्रीचे बाबतीस 'कॅव्हिएट एमटॉर' (खरेदीदारानें सावध असावें.) म्हणून जी इंग्लीश कायद्याची म्हण लागू करीत असत ती, आतां निदान मालाच्या मालकीच्या संबंधानें तरी, लागू करण्याचें कारण नाहीं असें दिसतें. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३ पृ. २६३; न्या. पु. ३ मुं. दि. नि. पृ. १२४).

चांगलेपणाची अगर गुणाची गर्भित खात्री स्थापित करणें.

११०. कांहीं माल चांगला अथवा अमूक गुणांचा असल्याविषयीं गर्भित खात्री कोणत्याही विशेष धंद्याच्या रिवाजावरून स्थापित करितां येईल.

सामग्रीची विक्री झाल्यास ती सामग्री बरी आहे अशी खात्री गर्भित असते असें समजावें.

१११. सामग्री विकत दिल्यास ती बरी आहे अशी गर्भित खात्री समजावयाची.

मासल्याअन्वयें माल विकल्यास मासल्याप्रमाणें मालाचा गुण आहे अशी गर्भित खात्री.

११२. मासला दाखवून माल विकला असेल तर एकंदर माल मासल्याच्या गुणाचा आहे अशी गर्भित खात्री समजावयाची.

११३. कांहीं माल अमूक जातीचा म्हणून विकला, तर, खरीददारानें तो मासल्यानें घेतला असला तरी अथवा एकंदर तपासून पाहून घेतला असला तरी व्यापारी लोकांत त्या जातीच्या नांवानें जो माल प्रसिद्ध आहे तोच तो अशी गर्भित खात्री केली असते असें समजावें.

अमूक जातीचा म्हणून माल विकल्यास गर्भित खात्री.

खुलासा:—परंतु माल अमूक जातीचा म्हणून विकला आहे तरी तो त्या जातीचाच आहे अशी खात्री सांगत नाहीं असा विशेष मजकूर जर करारांत असेल, तर मग गर्भित खात्री नाहीं.

उदाहरणें.

(अ.) अ हा कलकत्ता येथें "गाळ रेशमाचे" १२ थैले जे त्या वेळीं मुरशिदाबादेहून कलकत्त्यास येत होते ते ब ला विकतो. तर यांत अनें अशी गर्भित खात्री केली म्हणून समजावयाचें कीं, बाजारामध्यें "गाळ रेशीम" या नांवानें जें रेशीम प्रसिद्ध आहे तेंच हें.

(ब.) अनें १०० गठे कापूस "चांगला बंगाली" या प्रकारचा, मासला पाहून आणि एकंदर कापूस तपासून पाहून, विकत घेतला. पुढें असें ठरतें कीं, बाजारांत "चांगला बंगाली" या नांवानें जो कापूस प्रसिद्ध आहे तो हा नव्हे. तर यांत खात्रीप्रमाणें माल दिला नाहीं, असें समजावें.

कांहीं विशेष कामाकरितां माल मागविल्यास खात्री.

११४. जर माल कांहीं विशेष कामाकरितां मागविला असेल, कीं ज्या कामासाठीं, पाठवून द्या म्हणून लिहिलेल्या हुकुमांत सांगितल्या जातीचा माल बहुधा विकतात, तर विकणारानें अशी गर्भित खात्री केली म्हणून समजावयाचें कीं दिलेला माल त्या कामास उपयोगी आहे.

उदाहरण.

ब हा क्ष अ तांब्याच्या कारखानदाराकडून जहाज मढविण्याकरितां तांबें मागवितो. हुकुमाप्रमाणें अ तांबें देतो. तर यांत अशी गर्भित खात्री केल्याप्रमाणें समजावें कीं, तें तांबें जहाज मढविण्यास योग्य आहे.

प्रसिद्ध आणि ठरलेल्या जातीचा पदार्थ विकल्यास खात्री.

११५. एकादा प्रसिद्ध आणि ठरलेल्या जातीचा पदार्थ विकल्यास तो कोणत्याही विशेष कामाला उपयोगी आहे अशी गर्भित खात्री केल्याप्रमाणें समजावयाची नाहीं.

उदाहरण.

अ हा कापूस शोधण्याच्या एका पेटंट युक्तीचा मालक आहे. त्याला ब लिहितो:—

"तुझें कापूस शोधण्याचें पेटंट यंत्र माझ्या कारखान्यांतील कापूस शोधण्याकरितां मला पाठवून दे." अ हा हुकुमाप्रमाणें यंत्र पाठवून देतो. यांत अकडून अशी गर्भित खात्री केल्याप्रमाणें समजावें कीं, अचें कापूस शोधण्याचें पेटंट यंत्र या नांवानें प्रसिद्ध असलेला पदार्थ तोच हा; परंतु बच्या कारखान्यांतील कापूस शोधण्याच्या विशेष कामाला तें यंत्र उपयोगी आहे अशी गर्भित खात्री केल्याप्रमाणें समजावयाचें नाहीं.

११६. कपट नसेल तर, आणि गुणाविषयीं स्पष्ट खात्री केली नसेल तर, ज्या

अदृश्य व्यंगाबद्दल विकणारा केव्हां जबाबदार होत नाहीं.

प्रकारचा म्हणून एकादा पदार्थ विकला असेल त्याच प्रकारचा तो पदार्थ असला, तर त्यांतील एखाद्या अदृश्य व्यंगाबद्दल त्याचा विकणारा जबाबदार नाहीं.

## उदाहरण.

अ बला एक घोडा विकतो. नंतर असें समजतें कीं, विक्रीच्या वेळीं त्यांत एक व्यंग होतें, आणि तें अला ठाऊक नव्हतें. तर त्याबद्दल अ जबाबदार नाहीं.

खात्री चुकल्यावर खरेदीदाराचा हक्क.

११७. जर एखादा विशेष पदार्थ खात्रीनें विकून स्वाधीन केला गेला व स्वीकारला गेला, आणि खात्री चुकली, तर त्यामुळें विक्री निरर्थक करण्याजोगी होत नाहीं, परंतु खात्री चुकल्यामुळें खरीददाराचा तोटा झाला असेल त्याबद्दल विकणारानें नुकसानी भरून दिली पाहिजे.

## उदाहरण.

अ एक घोडा बला विकून त्याच्या स्वाधीन करतो, आणि तो मजबूत असल्याविषयीं खात्री करितो. नंतर असें ठरतें कीं, घोडा विक्रीच्या वेळीं मजबूत नव्हता. तर येणें करून विक्री निरर्थक करण्याजोगी होत नाहीं, परंतु घोड्याच्या गैर मजबुतीमुळें झालेल्या तोट्याची नुकसानी अनें बला भरून दिली पाहिजे.

जो माल निश्चित नाहीं त्याबद्दल दिलेली खात्री चुकली तर खरीददाराचा हक्क.

११८. मालाच्या विक्रीसाठीं खात्रीसहित करार झाला असेल, आणि कराराच्या वेळीं तो माल निश्चित झाला नसेल, अथवा त्याला अस्तित्व नसेल, आणि जर खात्री चुकली, तर खरीददार माल स्वीकारून घेऊं शकेल अथवा माल देण्यास आणल्यावेळीं स्वीकारीत नाहीं असें म्हणूं शकेल,

अथवा माल तपासून कसण्याकरितां कांहीं योग्य वेळपर्यंत ठेवून घेऊं शकेल, आणि मग स्वीकारून घेण्यास नाकारूं शकेल; मात्र तशा काळाच्या आंत परीक्षा आणि कसास लावणें या कामाला जितकें जरूर आहे त्यापेक्षां स्वामित्वाचें दुसरें कोणतेंही कृत्य त्या मालावर त्यानें करितां नये.

त्यानें कोणताही प्रकार केला तरी, खात्री चुकल्यामुळें कांहीं तोटा होईल त्याजबद्दल खरीददाराला विकणाराकडून नुकसानी भरून मिळाली पाहिजे; परंतु जर तो माल स्वीकारून घेईल आणि नुकसानी मागण्याचें मनांत आणील, तर खात्री चुकल्याविषयीं समजल्यापासून योग्य कालाच्या आंत तसें करण्याविषयीं आपल्या उद्देशाची त्यानें खबर दिली पाहिजे.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा अनिश्चित १०० गठ्ठे कापूस मासल्यानें बला विकण्याची, आणि बनें सांगून न पाठवितां बच्या स्वाधीन करण्याची, कबुलायत करितो. नंतर मासल्याप्रमाणें नव्हे असा कापूस बच्या स्वाधीन केला. तर परीक्षा करण्याकरितां योग्य वेळाहून जास्त वेळ ठेवून घेतला नसेल तर ब तो कापूस परत करूं शकेल.

( ब. ) ब अकडून २५ थैले पीठ मासल्यानें विकत घेण्याची कबुलायत करितो. पीठ बच्या स्वाधीन केलें व बनें त्याची किंमत दिली. परीक्षे अंतीं पीठ मासल्याप्रमाणें नाहीं असें समजतें. नंतर ब २ थैले वापरतो आणि एक विकतो. आतां त्याच्यानें करार रहित करून किंमत परत घेववत नाहीं, परंतु खात्री चुकल्यामुळें झालेल्या तोट्याबद्दल नुकसानी त्याला अकडून भरून मिळाली पाहिजे.

( क. ) अनें मागविल्यावरून ब हा अ करितां दोन पायांतील जोडे तयार करितो; जोडे स्वाधीन केले तेव्हां ते अच्या पायांला जमत नाहींत. अ दोन्ही जोडे एक दिवस ठेवून घेतो. तो एक जोडा घालून घरांत इकडे तिकडे फिरतो, आणि दुसरा घालून बाहेर पुष्कळ फिरावयास जातो. तर तो पहिला जोडा मी घेत नाहीं असें म्हणूं शकेल, परंतु दुसरा नाकारितां येणार नाहीं. परंतु दुसरे जोड्यांत कांहीं दोष असल्यामुळें काय तोटा झाला असेल याजबद्दल त्याला नुकसानी भरून मिळेल.

## किरकोळ.

मागविला नाहीं असा माल मागविलेल्या मालबरोबर पाठविल्यास खरीददार स्वीकारण्यास केव्हां नाकारूं शकेल.

११९. जर विकणारा खरीददाराला मागविलेल्या मालबरोबर न मागविलेला असा माल पाठवील, तर मागविलेला माल न मागविलेल्या मालांतून निराळा करण्यांत जोखीम अगर तसदी असल्यास, तशा रीतीनें पाठविलेल्या मालांपैकीं कोणताच माल आपण घेत नाहीं असें खरीददार म्हणूं शकेल.

## उदाहरण.

अ बकडून चिनी मातीचे विशेष पदार्थ मागवितो. ब तें पदार्थ एका पाटींत घालून त्यांजबरोबर न मागविलेले असे चिनी मातीचे दुसरे पदार्थ पाठवितो तर पाठविलेल्या मालापैकीं कोणताही आपण घेत नाहीं असें अ म्हणूं शकेल.

स्वीकारण्यास गैर रीतीनें नाकारल्याचा परिणाम.

१२०. जर खरीददार विकलेला माल तो स्वीकारण्याचें गैर रीतीनें नाकारील, तर. तेणेंकरून विक्रीचा करार मोडला असें होईल.

## विशेष समजुतीची टीप.

करार मोडल्याप्रमाणें केव्हां होतें.—ज. मुळाः—मालाच्या विक्रीबद्दलच्या करारांत करार आपणांवर बंधनकारक नाहीं अगर रद्द करण्याचा आपला इरादा आहे असें खरेदी घेणारानें स्पष्टपणें दर्शविलें असल्यास त्यामुळें करार मोडला असें होतेः हिंदुस्थानचा कराराचा आक्ट, कलम १२० अशा स्थलीं हेतुबद्दल दिलेली खबर अमलांत येणारी नाहीं असें खरेदी देणारास मानतां येईल व खरेदी देणारानें असें मानलें तर हा करार खरेदी देणारा व घेणारा या दोघांच्याही फायद्याकरितां कायम राहील, अथवा करार बेकायदेशीर रीतीनें रद्द करण्यांत आला आहे असें समजून खरेदी देणारास करार मोडल्याबद्दल दावा लावतां येईल. कराराचा आक्ट कलम ३९. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४७ पृ. ९२४; न्या. पु. ५८ मुं. दि. नि. पृ. ४९).

१२१. विकलेला माल खरीददाराच्या स्वाधीन केला म्हणजे, नेमलेल्या वेळीं खरीददारानें किंमत दिली नाहीं म्हणून करार रहित करण्याचा विकणारास हक्क नाहीं; मात्र रहित करण्याचा हक्क त्याला असेल असें जर करारांत लिहिलें असेल तर तो रहित करूं शकेल.

खरीददारानें नेमलेल्या वेळीं किंमत न दिल्यास करार रहित करण्याचा विकणाराचा हक्क.

१२२. जर माल लिलांवानें विकला, तर प्रत्येक जुळींत* जितका माल असेल तितक्याची वेगळी वेगळी आणि भिन्न भिन्न विक्री होते, आणि प्रत्येक जुळीबद्दल हातोडा × पडतो तसतसें तिच्यांतील मालाचें स्वामित्व दिलें जातें, असें समजावें.

लिलांवानें विकलेल्या जुळ्या व त्यांजवरील स्वामित्व.

१२३. जर लिलांवानें माल विकीत असतां विकणारा किंमत वाढविण्याकरितां खोटी मागणी + वापरील, तर खरीददाराच्या इच्छेवरून विक्री निरर्थक करण्याजोगी होईल.

विकणारानें किंमत वाढविण्यासाठीं खोटी मागणी वापरल्याचा परिणाम.

---

## बाब ८ वी.

### हमी आणि जिम्मा यांविषयीं.

१२४. ज्या करारावरून एक पक्षकार खुद्द आपल्या वर्तणुकीनें अथवा दुसऱ्या कोणत्याही मनुष्याच्या वर्तणुकीनें दुसऱ्या पक्षकारास जो तोटा होईल त्यापासून त्याला मुक्त ठेवण्याचें वचन देतो, त्याला हमीचा करार असें नांव दिलें आहे.

'हमीचा करार' याचें लक्षण.

---

* "जुळें" म्हणजे, लिलांवाच्या वेळेस दोन किंवा दोहोंहून अधिक पदार्थ एक गठानें एकदम विकण्याकरितां ठेवितात ते पदार्थ, त्यास गट, किंवा साठें असेंही म्हणतात.

× कलम ८६ उदाहरण (ब) वरील पायथ्याची टीप पहा.

+ "खोटी मागणी" म्हणजे, लिलांव करणारे लोक आपल्या तर्फेच्या लोकांकडूनच, ते खरेदीदार आहेत असें भासवून, किंमत वाढविण्याकरितां उगीच मागणी करवितात ती.

## उदाहरण.

दोनशें रुपयांच्या कांहीं एक रकमेच्या संबंधानें क हा व विरुद्ध कांहीं जें काम चालवील त्यापासून होणाऱ्या परिणामानें झालेला खचा तोटा भरून देण्याविषयीं अ करार करितो. तर हा हमीचा करार होय.

## विशेष समजुतीची टीप.

लिंबडीचे ठाकुरसाहेब यांचे कित्येक तालुकदारी गांव अहमदाबाद जिल्ह्यांत आहेत व त्या सर्व गांवांबद्दल ते एक ठोक रक्कम सरकारास देतात. त्यांत अकू नांवचा एक गांव आहे. ते ठाकूरसाहेब आणि अकू गांवचे ग्रासिया लोक त्यांचे दरम्यान त्या गांवचे मालकीबद्दल तंटे उत्पन्न झाले. त्या ठाकुरानें ग्रासिया लोकांवर एक दावा केला व अखेरीस त्या दाव्यांत आपसांत तोडजोड झाली, आणि उभयतांचे संमत्तीनें सन १८८३ सालीं एक हुकुमनामा करण्यांत आला. त्या हुकुमनाम्यांत असा ठराव होता कीं, त्या गांवचा अर्धा भाग त्या ठाकुरानें ग्रासिया लोकांस द्यावा व सरकार देण्याची जबाबदारी त्यांजवर न राहतां त्यांनीं तो निम्मा गांव माफीनें वहिवाटावा आणि सरकारचें सर्व देण्याबद्दल तो ठाकूर एकटा जबाबदार व्हावा.

त्या हुकुमनाम्याप्रमाणें त्या गांवचा निम्मे भाग ग्रासिया लोकांच्या स्वाधीन करण्यांत आला. त्या निम्मे भागाच्या जमाबंदीबद्दल कलेक्टरानें मागणें केलें. त्या ठाकुरानें मध्यें येऊन त्या मागण्यास हरकत केली आणि असें सांगितलें कीं, ग्रासिया लोकांस त्या गांवच्या दिलेल्या निम्मे भागीसुद्धां मी आपल्या सर्व तालुक्याबद्दल ठोक जमा सरकारांत भरलेली आहे. तथापि तो निम्मे गांव त्या ग्रासिया लोकांचा आहे; त्याजपासून जमाबंदीची रक्कम वसूल करण्याचा सरकारास हक्क आहे; त्या ग्रासिया लोकांकरितां म्हणून पाहिजे असल्यास त्या ठाकुरानें ती जमाबंदीची रक्कम सरकारांत भरावी; आणि तशी रक्कम न भरल्यास ग्रासिया लोकांचा तो निम्मे हिस्सा जप्त करून व विकून ती रक्कम वसूल करण्यांत येईल, असा सरकारनें ठराव केला.

त्यावरून त्या ठाकुरानें त्या ग्रासिया लोकांचेतर्फे दोन वर्षांच्या जमाबंदीची रक्कम सरकारांत भरली आणि नंतर ती भरलेली रक्कम परत घेण्यासाठीं व आपल्या तालुक्याबद्दल ठरलेल्या ठोक रकमेपलीकडे सदहू गांवच्या कोणत्याही भागाबद्दल जमाबंदी वसूल करण्यास सरकारास हक्क नाहीं असें ठरवून घेण्यासाठीं त्या ठाकुरानें सरकारावर दावा केला.

त्या मागण्यां पैकीं कोणत्याही मागण्याचे संबंधानें सरकारावर दावा करण्यास त्या ठाकुरास कारण उत्पन्न झालेलें नाहीं, अशा प्रथमारंभींच्या कारणावरून तो दावा रद्द करण्यांत आला. ग्रासिया लोकांच्यातर्फेनें त्यानें जे भरणे केले होते ते आपखुशीनें केले होते, आणि त्या गांवच्या ग्रासिया लोकांच्या निम्मे हिश्शांत त्या ठाकुराचा कांहींएक संबंध नव्हता, असा अव्वल कोर्टाचा अभिप्राय होता.

हा दावा चालत नाहीं असा जो कनिष्ठ कोर्टानें फैसला केला होता तो रद्द करून अपील कोर्टानें ठराव केला तो:—पक्षकारांच्या संमत्तीनें जो हुकुमनामा होता त्या हुकुमनाम्यावरून सरकारच्या सर्व देण्यापासून त्या ग्रासिया लोकांस मुक्त ठेवण्याबद्दल तो ठाकूर हमीदार होतो. सबब त्या ग्रासिया लोकांचेतर्फे त्यानें जमाबंदीची जी रक्कम सरकारांत भरली होती ती त्यानें आपखुशीनें भरली नव्हती आणि त्यानें हरकत सांगून ती रक्कम भरली असल्यामुळें दावा करून तो परत घेण्याचा त्यास हक्क आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १४ पृ. २९९; न्या. पु. २५ मुं. दि. नि. पृ. १४८ व १४९ ).

१२५. हमीच्या करारांत जो वचन घेणारा असतो तो आपल्या अधिकाराच्या मर्यादेच्या आंत चालेल तर वचन देणाराकडून त्याला खालीं लिहिल्याप्रमाणें भरून मिळालें पाहिजे, म्हणजे: --

हमीदारावर दावा झाल्यास त्याचे हक्क आणि जबाबदारी.

( १ ) तोटा भरून देण्याचें वचन ज्या कोणत्याही बाबतीबद्दल असेल त्या बाबतीच्या संबंधाच्या कोणत्याही दाव्यांत जी नुकसानी वचन घेणारास भरून द्यावी लागेल ती सर्व;

( २ ) अशा कोणत्याही दाव्यांतील जो खर्च देणें त्याला भाग पडेल तो सर्व; मात्र, तो दावा आणण्यांत अगर दुसऱ्यानें आपल्यावर आणिल्यास उत्तरपक्ष चालविण्यांत तो वचन देणाराच्या हुकुमाविरुद्ध वर्तला नसावा, आणि हमीचा करार कांहीं नसता तर त्यानें जसें वर्तणें शहाणपणाचें झालें असतें तसा वर्तला असावा, अगर वचन देणारानें तो दावा आणण्याचा अथवा दुसऱ्यानें त्याजवर आणिल्यास त्याचा उत्तरपक्ष चालविण्याचा अधिकार वचन देणारानें त्याला दिला असावा.

( ३ ) असा कोणताही दावा होऊन त्याची आपसांत तोडजोड केली असल्यास त्याजबद्दल ज्या रकमा त्याला द्याव्या लागल्या असतील त्या सर्व रकमा; मात्र तोडजोड केली ती वचन देणाराच्या हुकुमाविरुद्ध नव्हती, आणि हमीचा करार नसता तर जी तोडजोड करणें हें वचन घेणाराचे अंगीं शहाणपणाचें झालें असतें अशा प्रकारची होती. अथवा वचन देणारानें दाव्याची आपसांत तोडजोड करण्याला त्याला अधिकार दिला होता, असें समजलें पाहिजे.

१२६. तिसरा मनुष्य आपलें वचन पुरें करण्यास चुकला अगर आपली जबाबदारी फेडण्यास चुकला तर तें पुरें करण्याविषयींचा अगर ती फेडण्याविषयींचा जो करार तो जिम्मेचा करार. जा मनुष्य जिम्मा देतो त्याचें नांव जामीन, ज्याच्या कसरीविषयीं जिम्मा दिला असेल त्याचें नांव मुख्य रिणको, ज्याला जिम्मा दिली असेल त्याचें नांव धनको. जिम्मा तोंडची अथवा लेखी असूं शकेल.

'जिम्मेचा करार' 'जामीन' 'मुख्य रिणको' आणि 'धनको.'

## विशेष समजुतीची टीप.

'जबाबदारी' या शब्दाचा अर्थ.—अ. ची. ज. ब्याचलर:—हिंदुस्थानांतील कराराच्या आक्टाचीं कलमें १२६ व १२८ मध्यें 'पात्रता' हा जो शब्द वापरण्यांत आला आहे त्याचा अर्थ कायद्याअन्वयें पात्रतेची अम्मलबजावणी करतां येईल अशी पात्रता असा आहे. अशी पात्रता अस्तित्वांत नसेल तर हमीचा करार होणार नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. न्हा. ४२ [illegible] मुं. दि. सि. पृ. [illegible] ).

१२७. मुख्य रिणकोच्या हितासाठीं कांहीं तरी केलें असेल अथवा कांहीं तरी वचन दिलें असेल तर तो, जामिनानें जिम्मा दिल्याबद्दल जामिनाला पुरता मोबदला होऊं शकेल.

जिम्मेचा मोबदला.

### उदाहरणें.

(अ.) ब हा अकडून कांहीं माल विकत मागतो आणि स्वाधीन करून मागतो व किंमत उधार राहूं द्यावी म्हणतो. अ म्हणतो, मालाची किंमत दिली जाईल अशी जिम्मा क देईल तर त्याप्रमाणें आपण करीन. अ माल स्वाधीन करून देतो असें वचन देतो. त्याच्या मोबदल्या ऐवजीं क किंमत मिळेल अशी जिम्मा देतो. तर हा कच्या वचनास पुरतां मोबदला होय.

(ब.) अ कांहीं माल बला विकतो आणि त्याच्या स्वाधीन करितो. नंतर अनें बवर एक वर्षभर त्या कर्जाबद्दल दावा आणूं नये अशी क अची विनंती करितो, आणि असें वचन देतो कीं, अनें दावा आणणें तहकूब केलें तर बनें मालाची किंमत न दिल्यास आपण (क) देईन. त्याप्रमाणें अ दावा न आणण्याचें कबूल करितो. तर हा कच्या वचनास पुरता मोबदला झाला.

(क.) अ बला कांहीं माल विकतो, आणि तो स्वाधीन देतो. नंतर क, बनें पैसा न दिल्यास, आपण देईन असें कांहीं मोबदल्याशिवाय कबूल करितो. तर ही कबुलायत निरर्थक होय.

१२८. करारांत अन्यथा ठरविलें नसेल, तर जामिनाची जबाबदारी मुख्य रिणकोच्या जबाबदारीशीं समव्यापक असते.

जामिनाची जबाबदारी.

### उदाहरण.

कनें हुंडी सकारून घेतली आहे. तो तिचा पैसा मी देईन अशी जिम्मा अ बला देतो. नंतर हुंडी कनें नाकारली. तर अ हा हुंडीच्या रकमेपुरताच नव्हे पण तिजवर व्याज व खर्च जो कांहीं येणें झाला असेल त्याबद्दलही जबाबदार आहे.

### विशेष समजुतीची टीप.

जो वाद चालविण्याची अवश्यकता नव्हती असा वाद चालविण्यासाठीं कर्जाऊ घेतलेल्या पैक्याबद्दल एखादे अल्पवयी मनुष्यानें लिहून दिलेल्या रोख्यांत जो मनुष्य जामीन राहिला असेल तो त्या रोख्यावरून दावा करून घेण्यास पात्र होतो, मग त्या अल्पवयी मनुष्यानें केलेला करार निरर्थक आहे किंवा निरर्थक करण्याजोगा आहे असें वाटत असलें तथापि चिंता नाहीं. (इं. ला. रि. मुं. सी. व्हा. १९ पृ. ६९७; न्या. पु. ३० मुं. दि. नि. पृ. ३११).

१२९. जी जिम्मा कित्येक व्यवहारांचें मालिकेस लागू असते तिला अखंड जिम्मा असें नांव दिलें आहे.

अखंड जिम्मा.

## उदाहरणें.

( अ. ) बनें आपल्या जमिनदारीचे सारे वसूल करण्याचे कामीं कला लावें, या मोबदल्या ऐवजीं बला अ असें वचन देतो कीं, क हा ते सारे चांगल्यां रीतीनें जमा करून भरणा करील, आणि न करील तर ५,००० रुपयेपर्यंत मी ( अ ) जबाबदार आहे. ही अखंड जिम्मा होय.

( ब. ) ब हा चहा विकणारा वेळोवेळीं कला चहा देईल त्याबद्दल बला किंमत मिळेल, म्हणून अ १,००० रुपयेपर्यंत जिम्मा सांगतो. ब कला १,००० रुपयांहून जास्त किंमतीचा चहा देतो. आणि क त्याची किंमत बला देतो. नंतर ब कला २,००० रुपये किंमतीपर्यंत चहा पुरवितो. क त्याची किंमत देत नाहीं. तर अनें दिलेली जिम्मा अखंड जिम्मा होय आणि त्यामुळें तो १,००० रुपयेपर्यंत बला जबाबदार आहे.

( क. ) बनें ५ गोणते पीठ कच्या स्वाधीन करावयाचें आहे आणि त्याची किंमत एक महिन्यानें द्यावयाची आहे. अ त्या किंमतीविषयीं बला जिम्मा सांगतो. ब ५ गोणते कच्या स्वाधीन करितो. क त्याची किंमत देतो. नंतर ब ४ गोणते कच्या स्वाधीन करितो आणि त्यांची किंमत क देत नाहीं. तर अनें दिलेली जिम्मा अखंड जिम्मा नव्हती, आणि त्यामुळें तो ४ थैल्यांच्या किंमतीबद्दल जबाबदार नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. तिसऱ्या एखाद्या मनुष्यावर दावा करण्याचें त्याच्या धनकोनें तहकूब करावें म्हणून कोणी मनुष्यानें त्या धनकोस जामीनकदया लिहून दिला असेल तर त्या जामीनकदब्यास योग्य मोबदला आहे असें समजावें. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३१ पृ. २४२; न्या. पु. ३९ क. दि. नि. पृ. २२ ).

२. मृत्युपत्राची वहिवाट करणारा, मयताची मिळकत संपादन करील व त्याची योग्य व्यवस्था करील, एवढ्याकरितां राहिलेला जामीन हा, कराराचा आक्ट कलम १२९ मधील अर्थाप्रमाणें ' अखंड हमीदार ' होत नाहीं. अशल्या जामिनाला आपल्या जामिनकीं स्वतःच्या इच्छेस येईल तेव्हां सोडतां येणार नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३१ पृ. ५६; न्या. पु. ४४ अ. दि. नि. पृ. ८ ).

## उदाहरणें.

अखंड जिम्मा रद्द करणें.

**१३०.** भविष्य व्यवहारांविषयीं अखंड जिम्मा, जामीन, धनकोस खबर देऊन, पाहिजे तेव्हां रद्द करूं शकेल.

( अ. ) अच्या सांगण्यावरून ब हा कच्या हुंड्या घेऊन कटमित्तीनें पैसा देण्याचें कबूल करितो, आणि अशा सर्व हुंड्यांचा पैसा बारा महिनेंपर्यंत बरोबर मिळत जाईल म्हणून बनें कटमित्तीनें पैसा देण्याचें कबूल केलें. त्या मोब-

दल्याऐवजीं, ५,००० रुपयेपर्यंत अ हा जिम्मा सांगतो. त्याप्रमाणें ब कच्या २,००० रुपयेपर्यंत हुंड्या घेऊन कटमित्तीनें पैसा देतो. नंतर अ हा तीन महिने संपल्यावर जिम्मा रद्द करितो. या रद्दीमुळें अ हा त्यानंतर बला जबाबदार नाहीं असें झालें. परंतु कनें सदहू २,००० रुपये न दिल्यास अ तेवढ्याबद्दल बला जबाबदार आहे.

(ब.) ब हा कवर जितक्या हुंड्या करील तितक्यांचा पैसा क देईल, अशाबद्दल अ बला १०,००० रुपयेपर्यंत जिम्मा सांगतो. त्याप्रमाणें ब कवर हुंडी करितो. क हुंडी सकारितो. अ हा जिम्मा रद्द करण्याची खबर देतो. क हा हुंडीचे दिवस भरल्यावर हुंडी नाकारतो. तर अ जिम्मेवरून जबाबदार आहे.

## विशेष समजुतीची टीप.

अल्पवयी मुलांचा सांभाळ करावयाचा आक्ट सन १८६४ चा २० कलम १२ अन्वयें अल्पवयी मुलाच्या इस्टेटीचा नेमलेल्या पालनकरणाराच्या जामिनानें, पालनकरणारा अल्पवयी मनुष्याच्या इस्टेटीची गैर व्यवस्था करीत आहे, सबब जामिनकीच्या जबाबदारींतून आपली मुक्तता व्हावी म्हणून अर्ज केला.

**ठरावः**—पालनकरणारानें अल्पवयी मनुष्याच्या मिळकतीची गैर व्यवस्था करूं नये या उद्देशानें जामीन घ्यावयाचा असतो आणि याजकरितां जामिनाची मुक्तता करितां येत नाहीं व अशा बाबतींस सन १८७२ चा आक्ट ९ कलम १३० लागू पडत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १९ पृ. २४५; न्या. पु. ३० मुं. दि. नि. पृ. १०४ व १०५).

जामीन मेल्यावर अखंड जिम्मा रद्द.

**१३१.** जामीन मेला तर, अन्यथा करार नसल्यास, भविष्य व्यवहारांच्या पुढील कामासंबंधानें अखंड जिम्मा रद्द होतो.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. प्रतिवादीच्या बापानें एक जामीनकदवा लिहून दिला होता. पुढें प्रतिवादीचा बाप मयत झाला तेव्हां वादी यानें प्रतिवादीचें हातीं त्याचे मयत बापाची जी इस्टेट आली होती त्या इस्टेटींतून त्या जामीनकदव्याची रक्कम घेण्याकरितां प्रतिवादी यांजवर एक दावा केला.

**ठरावः**—हिंदुशास्त्राच्या मूलतत्वावरुन पाहतां, पुत्राच्या हातीं असलेली मिळकत बापाच्या जामीनकदव्याची फेड करण्यास पात्र आहे, आणि कराराच्या आक्टाचें कलम १३१ यांत जामिनाचे संबंधानें जो ठराव आहे त्याजवरुन त्या पात्रतेस बाध येत नाहीं. (इं. ला. री. म. सी. व्हा. ११ पृ. ३७३; न्या. पु. २३ म. दि. नि. पृ. ३२).

२. **जामीन मेल्यावर त्याच्या वारसावरील पात्रता.**—पोस्ट-खात्यांतील एका शिपायाकरितां दोन इसम जामीन राहिले. या दोन इसमांनीं जो जामीनकदवा लिहून दिला होता तो सर्वसाधारणपणें लागू करितां येईल अशा ठरविलेल्या नमुन्याप्रमाणें लिहून दिलेला होता. या जामीन

कदब्याअन्वयें जामीनावर जातीनें जबाबदारी येत असून त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या वारसांवरही जबाबदारी येत होती. नेमलेल्या पोस्टांतील अधिकाऱ्यांस सहा महिन्याची नोटीस देऊन पुढील सर्व जबाबदारीमधून जामिनास मुक्त होतां येईल अशी एक शर्त जामीनकदब्यांत होती.

दाव्यांतील जामीनकदवा सन १९०२ सालीं लिहून देण्यांत आला होता. सन १९१० सालीं एक जामीन मयत झाला. सन १९१६ सालीं ज्या इसमाकरितां जामीन राहिले त्यानें एका रकमेचा अपहार केल्यामुळें ती रक्कम पोस्ट-खात्यानें हयात असलेल्या जामिनाकडोन वसूल करून घेतली. हयात असलेल्या जामिनानें मयत जामिनाच्या वारच्या असामींवर त्यांचेकडून त्यांचे हिश्शाची रक्कम मिळण्याबद्दल दावा लावला.

**ठराव:**—वादीस रक्कम वसूल करून मिळण्याचा हक्क आहे. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४३ पृ. १३२; न्या. पु. ५६ अ. दि. नि. पृ. ५ व ६).

दोन मनुष्य प्रथमतः जबाबदार असलें आणि त्यांनीं आपसांत अमूक जामीन आणि अमूक मालक असा बंदोबस्त केल्यास त्यांच्या जबाबदारीस व्यत्यय येत नाहीं.

**१३२.** जर दोन मनुष्यें तिसऱ्या मनुष्याशीं करार करून कांहीं एक जबाबदारी पतकरतील, आणि जर आपल्यांतून एक असामी चुकला तरच दुसरा जबाबदार होईल असा आपसांतही पण करार करतील, आणि अशा ह्या दोन मनुष्यांच्या आपसांतील करारास तो तिसरा मनुष्य पक्षकार नसेल, तर पहिल्या कराराअन्वयें जी त्या दोघांतून प्रत्येकाची तिसऱ्याला जबाबदारी तिला तो दुसरा करार असला म्हणून तेणें करून व्यत्यय येत नाहीं, मग त्या तिसऱ्या मनुष्यास तो दुसरा करार झाल्याविषयीं माहित असलें म्हणून चिंता नाहीं.

## उदाहरण.

अ आणि ब हे कला एक कदबा लिहून देतात आणि दोन्ही असामी मिळून व प्रत्येकींही त्याबद्दल जबाबदार होतात. पण त्यांत अ हा बचा जामीन म्हणून पक्षकार झाला आणि कदबा होतेवेळीं कला तीं गोष्ट ठाऊक आहे. आतां कनें सदर्हू कदब्याबद्दल अवर दावा आणिल्यास, आपण केवळ बला जामीन राहिलो आणि ही गोष्ट कला ठाऊक होती, असा कनें जबाब दिल्यास चालणार नाहीं.

करारांतील संकेतांत फेरफार झाल्यास जामीन मोकळा होतो.

**१३३.** करारांतील संकेतांत धनकोनें आणि मुख्य रिणकोनें मिळून जामिनाच्या राजी शिवाय, कोणताही फेरफार केल्यास त्या फेरफारानंतरच्या व्यवहारासंबंधीं जबाबदारी जामिनावर रहात नाहीं.

## उदाहरणें.

(अ.) ब हा कच्या पेढीवर कारभारी आहे. त्याच्या वर्तणुकीबद्दल अ हा कयाशीं जामीन रहातो. नंतर ब आणि क अच्या राजी शिवाय करार करितात

कीं बचा पगार वाढवावा, आणि कोणी कुळानें पेढींतून जास्त पैसा काढल्यास त्यापासून होणाऱ्या तोट्याच्या एक चतुर्थांशाबद्दल बनें जबाबदार व्हावें. ब एक कुळाला जास्त पैसा काढूं देतो, आणि त्यामुळें पेढीचें कांहीं रकमेनें नुकसान होतें. तर अच्या राजी शिवाय फेरफार केल्यामुळें तो आपल्या जामिनकींतून मोकळा झाला आणि तें नुकसान भरून देण्यास पात्र नाहीं.

(ब.) बला कनें कांहींएक हुद्यावर नेमिलें आहे. आणि त्या हुद्याचें काम काय आहे तें कायदे करणाऱ्या मंडळीच्या एका आक्टावरून उघड ठरलें आहे. ब त्या हुद्यावर असतां वाईट रीतीनें वागणार नाहीं अशी अनें कपाशीं जिम्मा दिली आहे. नंतर एक दुसरा आक्ट होऊन त्या हुद्याचें स्वरूप तत्वतः बदललें. त्यानंतर बनें कांहीं गैरवागणूक केली. तर जरी बची गैरवागणूक नंतरच्या आक्टानें ज्याला व्यत्यय आला नाहीं अशा एका कर्तव्य कामाबद्दल होती, तरी फेरफार झाल्यामुळें अ हा भविष्य जबाबदारींतून मोकळा झाला.

(क.) बला माल विकण्यासाठीं कारकुनीच्या जाग्यावर ठेविल्यास त्या संबंधानें जो पैसा त्याच्या हातीं येईल तेवढ्याचा हिशेब ब देईल अशा विषयीं अ कजवळ जामीन राहिल्यावर, बला वर्षाचे कांहींएक वेतन करून त्या जाग्यावर त्याला नेमण्याचें क हा कबूल करितो. नंतर अला न समजतां आणि अच्या राजी खेरीज क आणि ब कबुलायत करितात कीं, बला वार्षिक वेतन न देतां जितका माल ब विकील तितक्यावर त्याला दस्तुरी द्यावी. तर त्यानंतर बची गैरवर्तणूक झाल्यास त्याजबद्दल अ जबाबदार नाहीं.

(ड.) क बला जितके उधार तेल पुरवील तितक्याबद्दल अ हा कला ३,००० रुपयेपर्यंत अखंड जिम्मा सांगतो. नंतर बच्या व्यापारांत तंगचाई येते. आणि अला न कळतां ब आणि क असा करार करतात कीं, कनें बला रोख पैशाला तेल पुरवीत जावें आणि दिलेला पैसा त्यावेळीं ब आणि कच्या मध्यें असलेलीं कर्जें फेडण्याकडे योजावा. तर हा नवीन बंदोबस्त केल्यानंतर जो कांहीं माल दिला असेल त्याजबद्दल अ आपल्या जिम्मेमुळें जबाबदार नाहीं.

(ई.) क बला मार्च महिन्याचे पहिले तारखेस ५,००० रुपये कर्जाऊ देण्याचा करार करतो. अ हा ते पैसे परत मिळतील अशा विषयीं जिम्मा सांगतो. क हा सदरहू ५,००० रुपये बला जानेवारी महिन्याच्या पहिल्या तारखेस देतो. तर अ आपल्या जबाबदारीपासून मोकळा झाला; कारण, करार बदलला आणि तो असा कीं, तारीख १ ली मार्च पूर्वीं क हा बवर पैशाबद्दल दावा आणूं शकेल.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. मुंबई येथील बंगाल ब्यांकेच्या खजानचीचे हुद्याची कर्तव्यकर्में व पात्रता योग्य रीतीनें भाऊ कृष्णराव नांवाचा मनुष्य अमलांत आणील अशाबद्दल प्रतिवादी हे सन १८८१ चे आगष्ट महिन्यांत भाऊ कृष्णरावाकरितां बंगाल ब्यांकेबरोबर जामीन राहिले. भाऊ कृष्णराव हा त्या ब्यांकेंत सेकंड ( दुसरा ) क्लार्क होता व त्यानें पुढें तेंच काम करावें अशी तो व त्या ब्यांकेचा एजंट यांचे दरम्यान व्यवस्था करण्यांत आली. खजानचीचे कामावर त्याची नेमणूक झाल्यानंतर तो सेकंड क्लार्केचेंच काम पहात असे व पूर्वीप्रमाणें त्या जागयाचाच त्यास पगार मिळत असे. सन १८८९ सालीं त्या ब्यांकेंत १, ४२, १४२ रुपयांची तूट आली आहे असें आढळून आलें व खजानची या नात्यानें भाऊ कृष्णराव हा त्या रकमेबद्दल जबाबदार होता. त्या सर्व रकमेबद्दल त्या ब्यांकेनें त्याजवर एक हुकुमनामा मिळविला आणि प्रतिवादी हे त्याचे जामीन असल्यामुळें त्या ब्यांकेनें प्रतिवादीवर दावा केला. प्रतिवादींनीं अशी तक्रार केली कीं, त्या ब्यांकेनें आह्मांस कळविल्यावांचून व आमची संमत्ती घेतल्यावांचून खजानचीचे कामाशिवाय सेकंड क्लार्कांची कामें करण्यास भाऊ कृष्णरावास नेमिलें होतें व त्या नेमणुकीमुळें आमच्या पूर्वीच्या करारांत नंतर फेरफार झाला आहे, सबब त्या फेरफारानंतरच्या व्यवहाराबद्दल, सन १८७२ चा आक्ट ९ वरून आमचेवरील जबाबदारी नाहींशी झाली आहे.

भाऊ कृष्णराव याची खजानचीचे कामावर ज्यावेळेस नेमणूक झाली त्या वेळेस तो सेकंड क्लार्कांचे जाग्यावर होता व तो आणि त्या ब्यांकेचा एजंट यांचे दरम्यान ठरलेल्या व्यवस्थेवरून तेंच काम तो पुढें पहात होता, असें ज्यापेक्षां पुराव्यावरून दिसून येत आहे त्यापेक्षा, त्या करारांत पुढें फेरफार झाला होता किंवा नव्हता, असा प्रश्न उत्पन्न होत नसून, ती ब्यांक आणि भाऊ कृष्णराव यांचे दरम्यान झालेल्या या व्यवस्थेबद्दल जामिनकीच्या दस्तऐवजांत कांहींएक उल्लेख नसल्यामुळें व ( प्रतिवादी ह्मणतात त्याप्रमाणें ) त्यांस कळविल्यावांचून व त्यांची संमत्ती घेतल्यावांचून ती व्यवस्था केली असल्यामुळें, एकादी तात्विक गोष्ट त्या ब्यांकेनें प्रतिवादीस कळूं दिली नाहीं असे कारणावरून प्रतिवादी हे आपल्या पात्रतेंतून मुक्त झाले आहेत किंवा नाहींत, असा प्रश्न उत्पन्न होतो, असा कोर्टाचा अभिप्राय होता.

**ठरावः**—प्रतिवादी हे आपल्या पात्रतेंतून मुक्त होत नाहींत. कराराच्या आक्टाचें कलम १४३ यांत " मौन धरून " असे जे शब्द आहेत त्यांचा अर्थ एकादी गोष्ट नुसती न कळविणें, असा होत नसून समजून उमजून एकादी गोष्ट लपविणें, असा होतो हें उघड आहे. भाऊ कृष्णराव हा सेकंड क्लार्कांचे काम पुढें करणार आहे ही गोष्ट त्या ब्यांकेनें समजून उमजून प्रतिवादीपासून लपवून ठेविली होती अशी कल्पना करण्यास या कज्जांत कांहींएक कारण नाहीं, किंवा ती गोष्ट प्रतिवादींस जर कळविली असती तर खजानचीचीं कामें भाऊ कृष्णराव याजकडून योग्य रीतीनें करण्यांत येतील अशाबद्दल आपल्यावर जबाबदारी घेण्याची जी त्यांची तयारी होती तीस कांहीं तरी बाध आला असता, अशी कल्पना करण्यासही या कज्जांत कांहींएक कारण नाहीं. त्या दोन हुद्यांचीं कार्यें अगदीं पृथक् आहेत असें पुराव्यावरून दिसून येतें, आणि याजकरितां, खजानचीचे कामावर नेमणूक झाल्यानंतर भाऊ कृष्णराव यास सेकंड क्लार्कांचे जाग्यावर जरी पुन्हां नेमिलें असते तरी सुद्धां ज्या मुद्याच्या फेरफारावरून प्रतिवादीवरील जबाबदारी नाहींशी झाली असती असा एकादा मुद्याचा फेरफार खजानचीचे कामांत झाला नसता; फक्त एका हुद्यास दुसरा हुद्दा जोडला गेला आहे, इतकेंच झालें असतें आणि मुख्यानें दुसरें कोणतेंही काम पतकरूं नये असा करार त्या जामिनखतांत नसेल तर त्या गोष्टीमुळें जामिनांच्या पात्रतेस त्या नवीन हुद्यावरून बाध येणार नाहीं.

प्रतिवादींचें तर्फे आणखी अशीही तक्रार करण्यांत आली आहे कीं, सन १८८३ सालांत त्या ब्यांकेंत ज्या कांहीं हुंड्या पटवल्या गेल्या त्या हुंड्यांवरील नांवें बनाऊ केलीं होतीं असें आढळून आल्यामुळें आह्मांवरील जबाबदारी दूर झाली आहे. त्या हुंड्यांचे संबंधानें नंतर त्या ब्यांकेनें भाऊ कृष्णराव याजकडे मागणें केलें होतें व त्यानें आपलेवरील जबाबदारी दूर केली होती. या गोष्टीबद्दलची माहिती त्या ब्यांकेनें त्याच वेळेस आम्हांस दिली पाहिजे होती अशी तक्रार प्रतिवादी यांनीं, फिलिप्स वि० कॉक्सऑल ( ला. री. ७ क्विन्स बेंच पृ. ६६६ ) यांतील ठरावाचें आधारें केली आहे.

**ठरावः**—बनाऊ लेखांचा शोध लावण्याचे कामांत कृष्णरावाची चूक होण्याजोगी नव्हतीच अशी कल्पना करितां येत नाहीं आणि म्हणून तशी समजूत प्रतिवादींची असून प्रतिवादी हे जामीन झाले नव्हते हें उघड आहे आणि याजकरितां कृष्णराव हा चुकीस पात्र आहे असें समजल्यावरोबर लागलीच त्या ब्यांकेनें प्रतिवादींस कळविलें पाहिजे होतें असें शिध्या व्यवहारानें ह्मणतां येणार नाहीं. फिलिप्स वि० कॉक्सऑल या कज्यांतील भेद दाखविण्यांत आला. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १५ पृ. ५८५; न्या. पु. २६ मुं. दि. नि. पृ. २६६ ).

२. **करारांत फेरफार केल्यामुळें जामिनकीतून मुक्तता.**—वादींनीं आपल्या मालाची विक्री करण्यास प्रतिवादी नं. १ ला आपले पोट-एजंट ह्मणून नेमलें; यांबद्दल प्रतिवादी नं. १ ला त्याचा कचेरीचा सर्व खर्च व विक्रीच्या रकमेवर ७ पूर्णांक एक द्वितियांश टक्के अशी रक्कम मिळावयाची होती. याच वेळीं प्र. नं. २ हा प्रतिवादी नं. १ ला जामीन राहिला व त्यानें हमीपत्र लिहून दिलें. या हमीपत्रांत प्र. नं. २ नें यांस जामीन या नात्यानें मिळणारे व हमीपत्रांतील शर्तीशीं विरुद्ध असलेले सर्व हक्कसंबंध, कायदा, न्यायतत्त्वें अथवा अन्य तन्हेनें मिळणारे थे जे हक्कसंबंध सांगण्याचा व अमलांत आणण्याचा त्यांस अन्य रीतीनें हक्क होता ते ते सर्व स्पष्ट शब्दांत सोडून दिले असून पोट-एजन्सीचा करार जोंपर्यंत चालू राहील तोंपर्यंत कोणत्याही वेळीं आपणांस जामिनकी सोडून देतां येणार नाहीं असाही त्यानें हमीपत्रांत करार करून दिलेला होता. यानंतर प्रतिवादी नं. २ ला न कळवितां प्रतिवादी नं. १ नें मूळ करारांत बदल केला व या नवीन कराराप्रमाणें कचेरीच्या सर्व खर्चातकट प्रतिवादी नं. १ ला २२ टक्के कमिशनदाखल मिळावे असें ठरलें. पोट-एजन्सीचा करार संपल्यामुळें वादींनीं पोट-एजन्सीच्या कराराप्रमाणें येणें असलेली रक्कम वसूल करण्याकरितां दोन्ही प्रतिवादीवर दावा लावला. आपल्या अपरोक्ष वादी व प्रतिवादी नं. १ यांनीं करारांत फेरबदल केला असल्यामुळें कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ ) कलम १३३ मधील ठरावाप्रमाणें आपण जबाबदारीमधून मुक्त झालों आहों अशी प्रतिवादी नं. २ नें तक्रार केली.

**ठरावः**—करारांत फरक झाल्यामुळें कराराच्या आक्टाचें कलम १३३ मधील ठरावाप्रमाणें सदरहू फरकाच्या नंतरच्या व्यवहाराबद्दलच्या जबाबदारीमधून प्रतिवादी नं. २ हे मुक्त झाले. हमीपत्रांत कायद्याप्रमाणें प्राप्त होणारे सर्व हक्कसंबंध आपण सोडून दिले आहेत असें प्रतिवादी नं. २ नें लिहून दिलें होतें येवढ्यामुळें कलम १३३ मधील अर्थाप्रमाणें करारांत फरक करण्यास प्रतिवादी नं. २ नें आक्षिप्तपणें संमती दिली होती अगर यामुळें कायद्याप्रमाणें प्रतिवादी नं. २ हा जबाबदारीमधून मुक्त झाला असला तरी त्यांजकडून रक्कम वसूल करण्याचा हक्क वादीस रहातो असें ह्मणतां येत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४१ पृ. १५७; न्या. पु. ५६ मुं. दि. नि. पृ. १३ व १४ ).

३. करारांतील शर्तीप्रमाणें तहशीलदार या नात्यानें बुनें आपलें कर्तव्य योग्य रीतीनें

बजावण्याबद्दल बचें तर्फेनें अनें एक जामीनकदवा लिहून दिला होता; परंतु तारणाची रक्कम मात्र निश्चित केलेली होती. प्रत्येक वर्षी बनें आपल्या तहशिलाचा हिशोब देत जावा, अशी त्या करारांतील शर्तींपैकीं एक शर्त होती. १३०८ सालचा हिशोब बनें दिला नव्हता आणि करारांतील शर्तीविरुद्ध १३०९ चा महसूल बला करूं देण्यांत आला होता. ब आणि त्याचा जामीन यांजवर हिशोबासाठीं दावा करण्यांत आलाः

ठरावः—कराराच्या आक्टाचें कलम १३३ यांत सांगितल्या प्रकारचा फेरफार पक्षकारांचे दरम्यानचे करारांत झालेला नाहीं आणि जामीन हा कराराप्रमाणें पात्र झाला आहे. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३६ पृ. ६२६; न्या. पु. ४४ क. दि. नि. पृ. २३ व २४ ).

मुख्य रिणको सुटला अथवा मोकळा झाला तर जामीन मुक्त होतो.

**१३४.** धनको आणि मुख्य रिणको यांजमध्यें जर असा कांहीं करार होईल कीं, तेणेंकरून मुख्य रिणको सुटेल अथवा धनकोकडून असें कांहीं कृत्य अथवा वर्जन होईल कीं त्याचें कायद्याच्या दृष्टीनें फळ मुख्य रिणको मोकळा होणें हें होय, तर जामीन मुक्त झाला असें समजावें.

## उदाहरणें.

( अ. ) कनें बला कांहीं माल द्यावयाचा आहे. त्याबद्दल अ हा कला जिम्मा सांगतो. क बला माल पुरवितो आणि नंतर बच्या व्यापारांत गडबड होते आणि तो आपल्या धनकोशीं ( त्यांत क आहे ) असा करार करितो कीं, त्यानें आपली मालमत्ता त्यांच्या हवाली करावी, आणि त्यांनीं त्याला आपल्या मागण्यांपासून सोडावें. आतां ब हा कबरोबर करार झाल्यामुळें आपल्या कर्जातून सुटला आणि अ आपल्या जामिनकींतून मोकळा झाला.

( ब. ) अ बशीं करार करितो कीं अनें आपल्या जमिनींत नीळ पिकवावी आणि कांहीं नेमलेल्या दरानें ती बच्या स्वाधीन करावी, आणि हा करार अ पुरा करील म्हणून क जामीन राहतो. नंतर अच्या जमिनीस ज्याच्या पाण्याची जरूर आहे असा एक नाला ब फिरवितो, आणि त्यामुळें अला नीळ पिकविण्यास हरकत आणितो. तर क आतां आपल्या जामिनकीबद्दल जबाबदार नाहीं.

( क. ) अ बशीं करार करितो कीं, आपण ( अनें ) कांहीं एका नेमलेल्या किंमतीला कांहीं ठरविलेल्या वेळाच्या आंत बला एक घर बांधून देईन, आणि बनें अवश्य असलेलें लांकूड पुरवावें. क अकडून करार पुरा होईल म्हणून जिम्मा सांगतो. ब लांकूड पुरवीत नाहीं. तर क हा आपल्या जामिनकींतून मुक्त झाला.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. मुख्य रिणको आणि त्याचा जामीन यांजवर झालेल्या दाव्यांत, मुख्य रिणकोवर समन्स बजावण्याचें धनकोनें सोडून दिलें असेल तर, सन १८७२ चा आक्ट ९ कलम १३४ वरून जामिनाची त्याच्या पात्रतेंतून मुक्तता होणार नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १४ पृ. २६७; न्या. पु. २५ मुं. दि. नि. पृ. १२५ ).

२. प्रतिवादी नं. १–२ यांनीं वादीस सन १९१२ मध्यें एक प्रामिसरी नोट करून दिली होती. सदरहू प्रामिसरी नोटींत प्रतिवादी नं. १ हा मुख्य रिणको असून प्रतिवादी नं. २ हा जामीन होता. वादीनें सन १९१३ मध्यें सदर प्रामिसरी नोटीवरून दावा लावला. प्रतिवादी नं. १ चें समन्स लागू करतां न आल्यामुळें प्रतिवादी नं. १ चें नांव काढून टाकून फक्त प्रतिवादी नं. २ विरुद्ध दाव्याचें काम पुढें चालविण्यांत आलें. वादीनें प्रतिवादी नं. १ चें नांव काढून टाकले या वादीच्या कृत्यामुळें प्रतिवादी नं. १ हा कर्जांतून मोकळा झाला असल्यामुळें प्रतिवादी नं. २ हाही कर्जांतून मुक्त झाला आहे या मुद्यावर कनिष्ठ कोर्टानें वादीचा दावा रद्द केला. वादीनें हायकोर्टाच्या असाधारण अधिकारांत हायकोर्टाकडे अर्ज केला. सदर अर्जांत कनिष्ठ कोर्टाचा हुकुमनामा रद्द करून दावा परत चौकशीकरितां पाठवितांना पुढील ठराव करण्यांत आलाः

ठरावः—वादीनें प्रतिवादीं पैकीं एकाविरुद्ध दाव्याचें काम पुढें न चालवितां त्याचें नांव प्रतिवादींमधून कमी केलें व त्याचेवरील दावा सि. प्रो. कोड आर्डर ९ कानू ५ प्रमाणें रद्द करून घेतला येवढ्यामुळें मुख्य रिणकोवरील दावा मुदतींत असल्यास जामीन कर्जमुक्त होत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३९ पृ. ५२; न्या. पु. ५१ मुं. दि. नि. पृ. १९ व २० ).

धनको मुख्य रिणको बरोबर तोडजोड करील, त्याला मुदत देईल, अथवा दावा न आणण्याचें कबूल करील तर जामीन मुक्त होईल.

**१३५.** धनको आणि मुख्य रिणको यांजमध्यें जर असा कांहीं करार होईल, कीं तेणेंकरून धनको मुख्य रिणकोशीं तोडजोड करील अगर मुख्य रिणकोला मुदत देण्याचें, अथवा त्यावर दावा न आणण्याचें वचन देईल, तर, तशा करारास जामिनानें आपली संमती दिली नसल्यास त्या करारामुळें जामीन मुक्त होतो असें समजावें.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. प्रतिवादी हजर राहण्याबद्दल राहिलेल्या जामिनाची मुक्तता.—प्रतिवादी हजर राहण्याबद्दल एखादा इसम जामीन राहिला असल्यास सदरहू प्रतिवादी हा कोर्टांत आपला दावा चालविण्यास हजर आहे येवढ्यामुळें जामिनकीमधून आपणांस मुक्त करावें असें म्हणण्याचा अधिकार सि. प्रो. कोड आर्डर ३८ कानु ३ प्रमाणें जामिनास नसतो; कारण, प्रतिवादीचें हें हजर होणें हें सदर कानूमधील अर्थाप्रमाणें आपखुषीनें स्वाधीन होणें या सदरांत येत नाहीं; व त्याचप्रमाणें प्रतिवादीनें आपल्या संमत्तीशिवाय तडजोडीचा हुकुमनामा करून दिला येवढ्यामुळेंही जामीन आपल्या जबाबदारींमधून मुक्त होत नाहीं. कराराच्या आक्टाचें कलम १३५ येथें लागू पडत नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४३ पृ. २७२; न्या. पु. ५५ म. दि. नि. पृ. १४ ).

२. रेस्पांडेंटाच्या बँकेनें रोखा लिहून घेऊन ज्या रिणकोस पैका कर्जाऊ दिला होता त्या रिणकोस दोघे इसम जामीन राहिले होते. त्यांच्या पैकीं एक इसम मयत झाला होता व त्याची

इस्टेट ज्या मनुष्याकडे गेली होती तो इसम आणि दुसरा जामीन अशा दोघांनीं मिळून हें अपील केलें होतें. त्या मुख्य रिणकोचे जरी आह्मीं नुसते जामीन आहों तरी त्या रिणकोनें कर्जाची फेड केली नाहीं तर मुख्य रिणकोचे ठिकाणीं आह्मीं रिणको आहोंत असें ब्यांकेनें समजावें आणि ब्यांक आणि मुख्य रिणको यांचे दरम्यान कोणत्याही प्रकारचे व्यवहार झाले तथापि आह्मीं आपल्या पात्रतेतून मुक्त होणार नाहीं, असें त्या दोघांही जामिनांनीं लिहून दिलें होतें.

मुख्य रिणकोनें कर्जाची फेड केली नाहीं व त्या ब्यांकेनें कर्जाची फेड करण्यासाठीं त्या मुख्य रिणकोस मुदत दिली होती.

ठरावः—त्या करारनाम्यावरून पाहतां, मुख्य रिणकोनें कर्जाची फेड केली नसल्यामुळें मुख्य रिणकोप्रमाणें त्या कर्जाची फेड करण्यास ते जामीन पात्र झालेले आहेत आणि त्या ब्यांकेनें मुख्य रिणकोस कर्जाची फेड करण्यासाठीं जास्त मुदत दिली होती एवढ्यावरून त्या जामिनांची मुक्तता झालेली नाहीं.

त्या दोघां जामिनांपैकीं जो एक जामीन मयत झाला आहे तो एक काश्मिरी स्त्री होती व ती बुद्धिवान असून व्यवहार करण्यास लायक होती व तिनें आपल्या खुषीनें जामिनकी घातली होती असें दोन्हीं कनिष्ठ कोर्टांनीं ठरविलें आहे. गैर समजाविशीं केल्याबद्दल किंवा अयोग्य दाब घातल्याबद्दल पुरावा नसल्यामुळें त्या जामिनांपैकीं कोणत्याही जामिनाची मुक्तता होऊं शकत नाहीं. (इं. लॉ. री. अ. सी. व्हा. २३ पृ. १३७; न्या. पु. २६ अ. दि. नि. पृ. १२).

मुख्य रिणकोला मुदत देण्याकरितां तिसऱ्या मनुष्याशीं कबुलायत केल्यास जामीन मुक्त होत नाहीं.

१३६. जर मुख्य रिणकोस मुदत देण्याविषयीं करार धनकोनें तिसऱ्या मनुष्याशीं केला, आणि मुख्य रिणकोशीं केला नाहीं, तर जामीन मुक्त होत नाहीं.

## उदाहरणें.

अ हा बला जामीन आहे आणि त्या नात्यानें अनें केलेली हुंडी बनें सकारली आहे, आणि ती कच्या हातीं असून तिची मुदत होऊन गेली आहे. क हा बला मुदत देण्याकरितां मशीं करार करतो. तर अ मुक्त झाला नाहीं.

धनकोनें दावा न आणिला म्हणून जामीन मुक्त होत नाहीं.

१३७. जर धनको मुख्य रिणकोवर दावा आणावयाचा तो न आणील, अथवा त्याजविरुद्ध दुसरा कोणताही उपाय अमलांत आणावयाचा तो न आणील, तर, जामीनकींत अन्यथा ठरविलेलें नसल्यास, केवळ तितक्यानेंच जामीन मुक्त होत नाहीं.

## उदाहरण.

बनें कचें कांहीं कर्ज देणें आहे आणि त्याबद्दल अ जामीन आहे. तें फेडण्याची वेळ आली परंतु वेळ चुकून एक वर्ष गेलें तरी, क बवर दावा आणीत नाहीं. तर अ आपल्या जामिनकींतून मुक्त झाला नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

कलम १३४ वरील टीप २ पहा.

१३८. जर अनेक सहजामीन असतील, तर धनकोनें एकाची सुटका केली म्हणून दुसरे मुक्त होतात असें नाहीं; आणि ज्याची सुटका केली त्याची दुसऱ्या जामिनाशीं जी जबाबदारी तिजपासून त्याची मोकळीक होते असें नाहीं.

कित्येक सहजामिनांपैकीं एकाच्या सुटकेनें दुसरे मुक्त होत नाहींत.

१३९. जर धनको असें एकादें कृत्य करील कीं जें जामिनाच्या हक्कांला विरोधी आहे, अथवा असें एकादें कृत्य करणें वर्जील, कीं जें जामिनाशीं जें त्याचें कर्तव्यकर्म त्यावरून पाहिलें असतां, त्यानें केलें पाहिजे, आणि जेणेंकरून जामिनाचा मुख्य रिणकोविरुद्ध जो शेवटील उपाय तो विघडेल, तर जामीन मुक्त होईल.

जें कृत्य धनकोनें केल्यानें अगर जें कृत्य करणें वर्जिल्यानें जामिनाचा शेवटील उपाय विघडेल, तेणेंकरून जामिनाची मोकळीक.

उदाहरणें.

(अ.) ब कांहीं एक रकमेला ककरितां एक जहाज बांधून देण्याचा करार करितो. ती रक्कम काम कांहींएक अंशापर्यंत पोंचत येईल तसतशी हप्त्या हप्त्यांनीं द्यावयाची. ब करार यथायोग्य पुरा करील म्हणून अ हा कपाशीं जामीन राहतो. क हा अला नकळत शेवटचे दोन हप्ते बला अगाऊ देतो. तर हा आगाऊ पैसा दिल्यानें अ मुक्त झाला.

(ब.) क बला कांहीं पैसा कर्जाऊ देतो, त्याबद्दल कच्या नांवें ब आणि बला जामीन अ असे दोघेजण, संयुक्त आणि निरनिराळ्या जबाबदारीनें, कर्जखत लिहून देतात, आणि बचें घरसामान विकण्याविषयीं रोखाही ब लिहून देतो. तें घरसामान विकून त्याचा पैसा कदव्याची फेड करण्याकरितां लावण्याचा अधिकार कला त्या रोख्यांनं दिला आहे. नंतर क हा तें घरसामान विकतो. परंतु त्याच्या गैर वागणुकीमुळें आणि मुद्दाम हयगय केल्यामुळें त्याची किंमत फार थोडी आली. तर कदव्यासंबंधीं जबाबदारीपासून अ मुक्त झाला.

(क.) अ मला बजवळ उमेदवारीस ठेवितो आणि मच्या विश्वासूपणाविषयीं बला जिम्मा सांगतो. ब आपल्यापक्षीं असें वचन देतो कीं, आपण दर महिन्याला एक वेळ तरी मजवळून हिशेबाचा आणि शिलकेचा मेळ पाहून घेईन. परंतु वचनाप्रमाणें ब तसें करून घेत नाहीं, आणि म पैसा खातो. तर अ आपल्या जामिनकीबद्दल बपाशीं जबाबदार नाहीं.

१४०. ज्या कर्जाला जामीन आहे तसें कर्ज फेडण्याची वेळ येऊन गेली म्हणजे, अथवा ज्या कामाला जामीन आहे तसें काम करण्यास मुख्य रिणको चुकला म्हणजे, जर जामीन जें देण्यास अथवा करण्यास पात्र असेल तें सर्व देईल

जामिनानें रुपये दिल्यावर अथवा काम पुरें केल्यावर जामिनाचें हक्क.

अगर सर्व करील, तर जे हक्क धनकोला मुख्य रिणकोविरुद्ध होते ते सर्व त्यास येतील.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. एखादा इसम मुख्य रिणकोच्या संमत्तीशिवाय जामीन झाला असेल तर त्यास रिणकोविरुद्ध फक्त कराराच्या आक्टाचीं ( सन १८७२ चा आक्ट ९ ) कलमें १४० व १४१ मध्यें दिलेले हक्क प्राप्त होतात; कलम १४५ मध्यें दिलेले हक्क प्राप्त होत नाहींत. अशा इसमास कलमें ६९ व ७० मधील ठरावांचा फायदा घेतां येत नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३९ पृ. ९६५; न्या. पु. ५१ म. दि. नि. पृ. ५६ ).

२. **जामिनास तारणाचा फायदा.**—पलच्या मयत नवऱ्यानें दोन गहाणखतें करून दिलीं होतीं. या दोन्हीं गहाणखतांवरून देणें असलेली रक्कम देण्याची हमी पलच्या विनंतीवरून तिची बहीण बी हिनें घेतली. बीनें गहाणखतांवरून देणें असलेली रक्कम दिली; व नंतर गहाण मिळकत विकून येणें असलेली रक्कम वसूल करण्याकरितां बीनें पलच्या वारच्या असामींवर—पल ही दरम्यान मयत झाली होती—दावा लावला.

**ठरावः**—गहाण घेणाराकडे कर्जाकरितां जें तारण होतें त्याचा फायदा मिळण्याचा बीला हक्क आहे; परंतु या बाबतींत गहाण घेणारापेक्षां बीची परिस्थिती जास्त चांगली आहे असें म्हणतां येत नाहीं. एका गहाणखतावरून मूळ गहाण घेणारानें दावा लावला असतां तर त्या दाव्यास मुदतीची हरकत आली असती, असें आढळून आल्यामुळें जामिनाचाही या गहाणखतावरून लावलेला दावा मुदतींबाहेर गेलेला आहे. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ४२ पृ. ७०; न्या. पु. ५५ अ. दि. नि. पृ. ६ ).

**धनकोजवळ तारणें असतील त्याचा फायदा जामिनास मिळाला पाहिजे.**

**१४१.** जामिनकीचा करार झाल्यावेळीं मुख्य रिणकोविरुद्ध धनकोजवळ जें जें कांहीं तारण असेल, मग तारण आहे ही गोष्ट जामिनास माहीत असो अथवा नसो, त्या सर्वांचा फायदा जामिनास मिळाला पाहिजे; आणि जर धनको तें तारण हरवील, अथवा, जामिनाच्या राजी खेरीज, हातचें जाऊं देईल, तर तारणाच्या किंमतीच्या मानानें जामीन आपल्या जबाबदारींतून मुक्त होईल.

## उदाहरणें.

( अ. ) ब हा कचा भाडोत्री आहे. क अच्या जामिनकीवर बला २,००० रुपये कर्जाऊ देतो. अच्या जामिनकी शिवाय कजवळ सदर्हू २,००० रुपयांस आणखी दुसरें एक तारण आहे, तें हें कीं, बचें घरसामान कजवळ गहाण आहे. नंतर क गहाण बातल करितो. व नादार होतो, आणि क अवर जामिनकीमुळें दावा आणितो. तर घरसामानाच्या किंमती इतकी अची जबाबदारी कमी झाली असें समजलें पाहिजे.

( ब. ) बनें कचें कर्ज द्यावयाचें आहे. त्याबद्दल कला हुकुमनामा मिळाला आहे. पण त्याशिवाय क हा त्या कर्जाला अस जामीन घेतो. नंतर क आ-

पला हुकुमनामा बजावण्याकरितां बचा माल जप्त करून आणितो, आणि नंतर, अला न कळतां, दरखास्त काढून घेतो. तर अ मुक्त झाला.

(क.) बनें कचें कर्ज द्यावयाचें आहे. त्याला अ जामीन राहतो आणि अ आणि ब मिळून त्याजबद्दल कला खत लिहून देतात. नंतर त्याच कर्जाकरितां क हा बजवळून आणखी कांहीं तारण घेतो. नंतर हें तारण क सोडून देतो. तर अ मुक्त झाला नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

खिमजी जयराम नांवाचे एका मनुष्याला सन १८८९ सालचे आगष्ट महिन्यांत बंगालच्या ब्यांकेचे ३,१५,००० रुपये देणें होतें, ती रक्कम घेण्याकरितां किंवा तिजबद्दल तारण मिळावें म्हणून त्या ब्यांकेनें तगादा लाविला व खिमजी जयराम यानें कांहीं स्थावर मिळकतींचीं २ गहाणखतें ता. ५ सप्टेंबर सन १८८९ रोजीं त्या ब्यांकेस लिहून दिलीं. त्या स्थावर मिळकतीची किंमत अदमासें १,३५००० रुपये होती. त्या गहाणखतांस किंमतीच्या रकमेच्या मानानें जरी स्टांप लाविला होता तरी खिमजी जयराम यास त्या ब्यांकेचें जें कांहीं देणें होतें त्या सर्व देण्याबद्दल तीं गहाणखतें लिहून दिलेलीं होतीं, व कांहीं हुंड्या वगैरेबद्दल खिमजी जयराम यास ब्यांकेचें पुष्कळ देणें आहे असेंही त्या गहाणखतांत लिहिलें होतें व त्या देण्याबद्दल पुढें दुसरें तारण देण्याविषयीं त्यानें त्यांत कबूल केलें होतें, व त्या हुंड्या वगैरेबद्दल ज्या रकमा देणें झाल्या होत्या व ज्या पुढें देणें व्हावयाच्या होत्या त्या सर्व रकमांची फेड करण्याबद्दल खिमजी जयराम यानें त्या गहाणखतांत कांहीं करार लिहून दिले होते. त्या २ गहाणखतांखेरीज त्या ब्यांकेनें ५५,००० रुपयांच्या रकमेबद्दल दुसरीं कांहीं तारणें घेतलीं होतीं. मिळून १,९०,००० रुपयांबद्दल तारण होतें व १,२५,००० रुपयांबद्दल तारण नव्हतें. अशी हकीगत असल्यामुळें आणखीं तारण दिल्यावांचून, ता. ९ सप्टेंबर सन १८८९ रोजीं मुदत भरलेल्या हुंड्यांचे पैसे आह्मी देणार नाहीं असें त्या ब्यांकेनें खिमजी जयराम यास कळविलें; आणि ह्मणून वादी हा १,२५,००० रुपयांचे रकमेबद्दल खिमजी जयराम यास जामीन राहिला. पुढें वादी यास तीं रक्कम ब्यांकेत देणें भाग पडलें. तेव्हां ब्यांकेकडे तारणादाखल गहाण असलेल्या मिळकतीच्या उत्पन्नांतील हिस्सा घेण्याकरितां वादीनें दावा केला. वादीनें अशी तक्रार केलीं कीं, त्या ब्यांकेचे खिमजी जयराम याजकडे जें ३,१५,००० रुपये येणें होतें त्या सर्व रकमेच्या तारणाकरितां तीं २ गहाणखतें लिहून दिलेलीं होतीं; त्या रकमेपैकीं १,२५,००० रुपये त्या ब्यांकेस जामीन ह्मणून मीं दिलेले आहेत, सबब मीं दिलेल्या रकमेच्या प्रमाणानें त्या गहाण मिळकतीच्या उत्पन्नांतील हिस्सा घेण्याचा मला हक्क प्राप्त झाला आहे.

**ठरावः—**सदहूं ब्यांकेस खिमजी जयराम याजपासून जें कांहीं घेणें आहे त्या सर्व घेण्याचा उलगडा होईपर्यंत, त्या ब्यांकेपाशीं असलेल्या तारण मिळकतीचा फायदा घेण्याचा वादीस हक्क नाहीं.

ज्या जामिनानें हमी घेतलेल्या कर्जाची फेड केली आहे त्याला धनकोपाशीं असलेल्या तारण मिळकतीचा फायदा घेण्याचा हक्क आहे; कारण, मुख्य रिणको आणि जामीन यांचे दरम्यानच्या संबंधावरून पाहतां मुख्य रिणकोला जामिनाचें नुकसान भरून देणें भाग आहे. धनको आणि जामीन यांचे दरम्यानचे संबंधानें पाहतां ज्या योगानें जामिनाचा तो हक्क नाहींसा होईल असें एकही कृत्य धनकोनें करितां कामा नये; परंतु सर्व कर्जाची फेड होईपर्यंत तारण मिळकत आपलेपाशीं

ठेवण्याचा जो धनकोचा हक्क आहे तो हक्क जामिनाचे हक्काहून श्रेष्ठ आहे, कारण धनकोच्या सर्व कर्जांची फेड त्या तारणांतून झाल्यानंतर मात्र त्या तारणावर जामिनाचा हक्क पोंचतो. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १५ पृ. ४८; न्या. पु. २६ मुं. दि. नि. पृ. ३१ व ३२ ).

गैरसमजाविशीनें मिळविलेली जिम्मा व्यर्थ होय.

१४२. ज्या व्यवहाराविषयीं जिम्मा आहे त्या व्यवहाराच्या एखाद्या तात्विक भागाच्या संबंधानें धनकोनें केलेली अथवा त्याला माहित असून त्याचे संमत्तीनें केलेली जी गैरसमजाविशी तिच्या योगानें ती जिम्मा मिळविली असेल, तर ती व्यर्थ समजावी.

छपून ठेविल्यानें मिळविलेला जिम्मा व्यर्थ होय.

१४३. एखाद्या तात्विक गोष्टीविषयीं धनकोनें मौन धरून त्यामुळें मिळविलेली जिम्मा व्यर्थ होय.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा आपला पैसा वसूल करण्याकरितां बला कारकून ठेवितो. कांहीं पैशाची व्यवस्था काय केली तें बच्यानें सांगवत नाहीं असें झालें आणि त्यामुळें पैशाचा हिशोब बरोबर देईन अशाबद्दल बकडून अ तारण मागतो. ब हिशोब बरोबर देईल अशाबद्दल क आपली जिम्मा सांगतो. अ हा बच्या पूर्वील वागणुकीविषयीं कला कांहीं कळवीत नाहीं. नंतर ब हा हिशोबांत कसूर करितो. तर जिम्मा व्यर्थ समजावी.

( ब. ) कनें बला २,००० टनपर्यंत लोखंड पुरविल्यास त्याजबद्दल किंमत मिळेल अशी अ कला जिम्मा सांगतो. ब आणि क यांनीं गुप्तपणें अशी कबुलायत केली आहे कीं, बनें बाजार भावापेक्षां दर टनास पांच रुपये अधिक द्यावे, आणि ते पांच रुपये पूर्वींचें कांहीं कर्ज आहे ते फेडण्याकडे लावावें. ही कबुलायत अपासून गुप्त ठेविली आहे. तर अवर जामिनकीची जबाबदारी राहिली नाहीं.

दुसरा मनुष्य सहजामीन होण्यापूर्वी धनकोनें जामिनकीकरून कोणतेंही कृत्य करूं नये अशा कबुलायतीनें जामीन राहणें.

१४४. जर कोणी मनुष्य अशा करारावर जिम्मा सांगेल कीं, दुसरा एक मनुष्य सहजामीन होणार आहे तो झाल्या खेरीज आपली जामिनकी धनकोनें पूर्ण समजून तिजवरून कोणतेंही कृत्य करावयाचें नाहीं, आणि जर तो दुसरा मनुष्य सहजामीन न होईल, तर ती जिम्मा व्यर्थ समजावी.

जामिनास तोट्यापासून मुक्त ठेवण्याचें गर्भित वचन.

१४५. जिम्मेच्या प्रत्येक करारांत जामिनाचा तोटा होऊं देणार नाहीं असें मुख्य रिणकोचें गर्भित वचन असतें असें समजावें; आणि जामिनानें जिम्मेअन्वयें जी कांहीं रक्कम वाजवी रीतीनें दिली असेल ती मुख्य रिणकोपासून त्याला भरून मिळाली पाहिजे, परंतु ज्या रकमा त्यानें गैर रीतीनें दिल्या असतील त्या भरून मिळणार नाहींत.

## उदाहरणें.

(अ.) बनें कचें कर्ज द्यावयाचें आहे, आणि त्या कर्जाला अ जामीन आहे. क हा अजवळ पैसा मागतो, आणि अनें न दिल्यामुळें त्याजवर त्या रकमेचा दावा आणितो. दाव्याचा उत्तरपक्ष चालविण्यास योग्य कारण असल्या-मुळें अ तो चालवितो, परंतु कर्जाची रक्कम आणि खर्च देणें अला भाग पडतें. तर बजवळून जशी त्याला कर्जाची रक्कम भरून मिळेल तशीच खर्चाचीच रक्कम भरून मिळेल.

(ब.) क बला कांहीं पैसा कर्जाऊ देतो. आणि त्या पैशाच्या तारणा-साठीं म्हणून ब अवर एक हुंडी लिहितो, आणि तो अला सकारून ध्यावयास सांगतो आणि त्याप्रमाणें ती अ सकारतो. कच्या हातीं ती हुंडी आहे, आणि तिजबद्दल तो अजवळ पैसा मागतो, आणि अनें न दिल्यामुळें तिजबद्दल अवर दावा आणतो. त्या दाव्याचा उत्तरपक्ष चालविण्यास योग्य कारण नाहीं तरी तो चालवितो आणि हुंडीची रक्कम व खर्च देणें त्याला (अला) भाग पडतें. तर हुंडीची रक्कम बजवळून त्याला मिळेल, परंतु खर्च म्हणून दिलेली रक्कम मिळणार नाहीं, कारण कीं, उत्तरपक्ष चालविण्यास योग्य कारण नव्हतें.

(क.) क हा बला तांदूळ पुरविणार आहे. त्याच्या किंमतीबद्दल २,००० रुपयेपर्यंत अ कजवळ जामीन राहतो. क दोन हजार रुपयांपेक्षां कमी किं-मतीपर्यंत तांदूळ बला पुरवितो, परंतु दिलेल्या तांदुळाबद्दल अजवळून दोन ह-जार रुपयांची रक्कम घेतो. तर खरोखर तांदुळाच्या दिलेल्या किंमतीपेक्षां जास्त पैसा बकडून अला मिळणार नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

दोघां इसमांनीं मिळून स नांवचे इसमाला एक हजार रुपयांची व्यवहार्य वायदेचिठ्ठी लि-हून दिली होती, व त्यापैकीं प्रत्येकानें पांचशें रुपयांची रक्कम घेतली होती. त्यानंतर सनें सदहू वायदेचिठ्ठीवरून त्या दोघांवर एक दावा केला व १४८० रुपयांचा त्यावर एक समाईक हुकुम-नामा मिळविला होता. त्या हुकुमनाम्याची बजावणी त्या दोघां रिणकोपैकीं एकावर, ह्मणजे हल्लींचे वादीवर करण्यांत आली; वादीनें व आणखी एका इसमानें मिळून, सदर हुकुमनाम्यावरून एकंदर देणें होत असलेल्या रकमेबद्दल, ह्मणजे रक्कम रुपये १४८० बद्दल सला एक वायदेचिठ्ठी लिहून दिली. सदर वायदेचिठ्ठी सनें हुकुमनाम्यावरून येणें होत असलेल्या रकमेच्या फेडी ऐ-वजीं घेतली होती व ती वायदेचिठ्ठी सनें घेऊन त्यानें, वादी व त्या दुसरे इसमास भरपाईची पावती दिली होती. वादीनें ज्या तारखेस दावा केला त्या तारखेस सदर वायदेचिठ्ठींतील रकमेची फेड करण्यांत आली नव्हती. पहिली वायदेचिठ्ठी लिहून देणारे जोडीदार इसमावर हल्लीं वादीनें त्याचे हिश्शाची वर्गणी घेण्यासाठीं दावा केला होता.

ठरावः—दाव्याचे तारखेस वादीला दावा करण्याचें कारण घडलें नव्हतें. (इं. ला. रि. मुं. सी. व्हा. २६ पृ. ३२२; न्या. मु. १८ मा. हि. नि. पृ. ३९).

सहजामीन सारखे सारखे भाग देण्यास पात्र आहेत.

१४६. जर एकाच कर्जाला किंवा एकाच कामाला दोन अथवा अधिक मनुष्यें संयुक्त किंवा निरनिराळ्या जबाबदारीनें, आणि एकाच किंवा वेगवेगळ्या करारांनीं, एकमेकांस माहीत असून अगर नसून, सहजामीन असतील, तर अन्यथा करार कांहीं झाला नसल्यास, त्यांच्या एकमेकांतील संबंधानें पाहिलें असतां, ते सहजामीन सगळ्या कर्जाचा, अथवा मुख्य रिणकोकडून जें द्यावयाचें राहिलें असेल त्याचा, प्रत्येकीं सारखा भाग देण्यास पात्र होत.

## उदाहरणें.

( अ. ) डनें ईला ३,००० रुपये कर्ज दिलें. त्याला वजवळ अ, ब आणि क हे जामीन आहेत. ईजवळ पैसा थकतो. तर आपसांतील संबंधानें पाहिलें असतां अ, ब आणि क हे प्रत्येकीं एकेक हजार रुपये देण्यास पात्र आहेत.

( ब. ) डनें ईला १,००० रुपये कर्जाऊ दिले आहेत, आणि त्याजबद्दल अ, ब आणि क हे डजवळ जामीन आहेत, आणि अ, ब आणि क यांचा अपसांत असा करार आहे कीं, अनें एक चतुर्थांशाबद्दल, बनें एक चतुर्थांशाबद्दल आणि कनें निम्मेबद्दल जबाबदार व्हावें. नंतर ईजवळून पैसा पोहोंचत नाहीं. तर जामिनांचा आपसांतील संबंध पाहिला असतां, अ २५० रुपये, ब २५० रुपये आणि क ५०० रुपये देण्यास पात्र आहे.

कित्येक सहजामिनांनीं निरनिराळे दंड देण्याचे बांड लिहून दिले असतील तर त्यांची जबाबदारी.

१४७. जर कित्येक सहजामीन वेगळ्या वेगळ्या दंडाच्या रकमा देण्यास बांधले गेले असतील तर त्यांच्या त्यांच्या जबाबदारीचे मर्यादेनुसार होईल तितके सारखे भाग देण्यास ते पात्र होत.

## उदाहरणें.

( अ. ) अ, ब आणि क हे डला जामीन होतात आणि वेगळ्या वेगळ्या दंडाच्या किंमतीचे वेगवेगळे तीन बांड लिहून देतात, म्हणजे, अ १०,००० रुपयांचा, ब २०,००० रुपयांचा आणि क ४०,००० रुपयांचा. तिन्हीं बांडांची शर्त अशी आहे कीं, ड हा ईकडे कांहीं पैशाचा यथायोग्य हिशोब देईल. नंतर ड ३०,००० रुपयांची कसुरी करितो. तर अ, ब आणि क हे प्रत्येकीं १०,००० रुपये देण्यास पात्र आहेत.

( ब. ) अ, ब आणि क हे डला जामीन होतात आणि वेगळ्या वेगळ्या दंडाच्या किंमतीचे वेगळे वेगळे तीन बांड लिहून देतात, म्हणजे, अ १०,००० रुपयांचा, ब २०,००० रुपयांचा, आणि क ४०,००० रुपयांचा. तिन्हीं बांडांची शर्त अशी आहे कीं ड हा ईकडे कांहीं पैशाचा यथायोग्य हिशोब देईल.

नंतर ड ४०,००० रुपयांची कसुरी करितो. तर अ १०,००० रुपये देण्यास पात्र आहे, आणि ब आणि क हे प्रत्येकीं १५,००० रुपये देण्यास पात्र आहेत.

(क.) अ ब आणि क हे डला जामीन होतात, आणि वेगळ्या वेगळ्या दंडाच्या किंमतीचे वेगवेगळे तीन बांड लिहून देतात. म्हणजे, अ १०,००० रुपयांचा, ब २०,००० रुपयांचा, आणि क ४०,००० रुपयांचा. तिन्हीं बांडांची शर्त अशी आहे कीं, ब हा ईला कांहीं पैशाचा यथायोग्य हिशोब देईल. नंतर ब ७०,००० रुपयांची कसुरी करितो. तर अ, ब आणि क हे आपआपल्या बांडांतील सर्व दंड देण्यास पात्र आहेत.

---

## बाब ९ वी.*

### निक्षेपाविषयीं.

‘निक्षेप’ ‘निक्षेप्ता’ आणि ‘निक्षेपी’ यांचीं लक्षणें.

१४८. एक मनुष्य कांहीं माल कांहीं कामासाठीं दुसऱ्या मनुष्याच्या स्वाधीन करितो आणि असा करार झालेला असतो, कीं तें काम झालें म्हणजे तो माल परत द्यावा अथवा ज्यानें तो स्वाधीन केला तो मनुष्य हुकूम देईल त्याप्रमाणें त्याची व्यवस्था करावी, तर, अशा रीतीनें जो माल स्वाधीन करणें त्या स्वाधीन करण्यास निक्षेप असें नांव दिलें आहे. जो मनुष्य माल स्वाधीन करितो त्याला निक्षेप्ता असें नांव दिलें आहे. ज्याच्या स्वाधीन माल केला जातो त्याचें नांव निक्षेपी.

खुलासा.—जर एखाद्या मनुष्याच्या ताब्यांत दुसऱ्या मनुष्याचा माल पूर्वींच असेल, आणि तो आपण निक्षेपीप्रमाणें ठेवून घेण्याचा करार करील, तर तो तेणेंकरून त्या मालाचा निक्षेपी होईल आणि मालक निक्षेप्ता होईल, मग तो माल प्रथमतः निक्षेपाप्रमाणें स्वाधीन केला नसेल म्हणून चिंता नाहीं.

निक्षेपीच्या स्वाधीन करण्याचा प्रकार.

१४९. निक्षेपीच्या स्वाधीन करावयाचा तो, जें कांहीं तरी केल्यानें माल विवक्षित निक्षेपीच्या अथवा त्याच्यातर्फे माल ठेऊन घेण्याचा अधिकार ज्याला आहे अशा कोणत्याही मनुष्याच्या स्वाधीन केल्याप्रमाणें होईल, तें केलें म्हणजे स्वाधीन केला असें समजावें.

---

* सन १८७२ चा आक्ट ९ बाब ९ हींत निक्षेपाबद्दल जरी कांहीं सर्वसाधारण ठराव केलेले आहेत तरी साधारण हुंडेकऱ्याच्या जबाबदारीस तो आक्ट लागू पडत नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. १८ पृ. ६२०; मा. मु. ३८ क. हि. नि. पृ. ३८).

## विशेष समजुतीची टीप.

**माल ताब्यांत दिला असें केव्हां म्हणतां येईल.**—कांहीं माल पाठविण्याकरितां एका रेलवे स्टेशनवर आणण्यांत आला व माल भरणाऱ्या कारकुनाजवळ माल पाठविण्याबद्दलचा चिठ्ठी देण्यांत आली. या कारकुनानें या चिठ्ठीवर नंबर लिहिला व माल आणून देणाऱ्या इसमास दुसऱ्या दिवशीं पावती करितां व चिठ्ठीवरील नंबर मालावर घालून घेण्याकरितां येण्याविषयीं सांगितलें. दरम्यान एका पत्र्याच्या पडवींत हा माल ठेवला होता. मालकाच्या ताब्यांत अशा परिस्थितींत पडवीमध्यें माल ठेवण्याची वहिवाट होती. माल पाठविण्याबद्दलच्या चिठ्ठीवरील नंबर मालावर घालण्यांत आला होता परंतु तो कोणाही रेलवे अम्मलदारानें घातला होता. त्या रात्रीं सदर माल चोरीस गेला.

ठरावः—रेलवे कंपनीवर जबाबदारी येत नाहीं; कारण, कराराच्या आक्टाचें (सन १८७२) कलम १४९ प्रमाणें हा माल रेलवेच्या ताब्यांत देण्यांत आला नव्हता. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४५ पृ. २३५; न्या. पु. ५८ अ. दि. नि. पृ. १५).

निक्षिप्त मालाला असलेले दोष सांगणें हें निक्षेप्त्याचें काम आहे.

**१५०.** निक्षिप्त मालाला जे दोष असतील आणि जे निक्षेप्त्याला ठाऊक असतील, आणि ज्यांच्यायोगें निक्षिप्त मालाच्या उपयोगास तत्वतः व्यत्यय येईल, अथवा ज्याच्या योगानें निक्षेपीस असाधारण धोका येण्याचा संभव आहे, असे दोष निक्षेप्त्यानें निक्षेपीस सांगणें अवश्य आहे, आणि जर तो न सांगेल तर प्रत्यक्ष त्या दोषापासून निक्षेपीस जी खराबी होईल त्याबद्दल निक्षेप्ता जबाबदार आहे.

जर माल भाड्याकरितां निक्षिप्त असेल, तर सदहू प्रकारच्या खराबीबद्दल निक्षेप्ता जबाबदार होय, मग तसे दोष निक्षिप्त मालाला असल्याविषयीं माहिती त्याला होती अथवा नव्हती म्हणून चिंता नाहीं.

### उदाहरणें.

(अ.) अ बला एक घोडा वापरण्यास देतो, आणि त्या घोड्याला कांहीं खोड आहे हें अला ठाऊक आहे. घोड्याला खोड असलेली अ सांगत नाहीं. घोडा बुजून पळतो आणि ब त्यावरून पडून त्याला दुखापत होते. तर बला झालेल्या खराबीबद्दल अ बजवळ जबाबदार आहे.

(ब.) अ बची एक गाडी भाड्यानें घेतो. ती निर्भय नाहीं. परंतु निर्भय नाहीं हें बला ठाऊक नव्हतें, नंतर अला दुखापत होते तर या दुखापतीबद्दल अला ब जबाबदार आहे.

निक्षेपीनें काळजी घेतली पाहिजे ती.

**१५१.** जेव्हां जेव्हां माल निक्षिप्त असेल, तेव्हां तेव्हां साधारण हुषारीचा एकादा मनुष्य त्यासारख्या प्रसंगीं, त्याच आकाराच्या, त्याच गुणाच्या, आणि त्याच किंमतीच्या आपल्या खुद्द मालाची जेवढी काळजी घेईल तेवढीच निक्षिप्त मालाची निक्षेपीनें काळजी घेतली पाहिजे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. (१) रेलवेनें नेण्यासाठीं कोणत्याही रेलवे आडमिनिस्ट्रेशनच्या हवाली केलेली जनावरें अगर माल हरवलीं, नाश पावलीं, अगर बिघडलीं असतां त्याबद्दलच्या आडमिनिस्ट्रेशनाची जबाबदारी, ह्या आक्टाच्या इतर ठरावांस पात्र राहून, सन १८७२ चा इंडियाचा कराराविषयीं आक्ट याच्या १५१ व्या, १५२ व्या व १६१ कलमाअन्वयें निक्षेपीवर असलेल्या जबाबदारी इतकी आहे असें समजावें.

(२) अशा जबाबदारीची इयत्ता जीवरून मर्यादित होत आहे असें दिसत असेल ती कोणतीही कबुलायत, ती जेथवर ती इयत्ता मर्यादित करीत असेल तेथवर रद्द आहे असें समजलें जाईल; मात्र

(अ) ती कबुलायत लेखी असून तिच्यावर ती जनावरें अगर माल त्या रेलवे आडमिनिस्ट्रेशनकडे पाठविणाऱ्या अगर त्या आडमिनिस्ट्रेशनाच्या हवाली करणाऱ्या इसमाची अगर त्याच्या रतींच्या इसमाची सही असल्यास, आणि

(ब) ती कबुलायत इतर रीतीनें गव्हर्नर जनरल इन् कौन्सिल यांनीं पसंत केलेल्या नमुन्याबरहुकूम असल्यास,

ती रद्द आहे असें समजलें जाणार नाहीं.

(३) जनावरें अगर माल नेण्याबद्दलची साधारण हुंडेकऱ्यांची [ नेणारांची ] जी जबाबदारी तिच्या संबंधाच्या इंग्लंडाच्या मामूल कायद्यांतील अगर सन १८६५ चा हुंडेकऱ्यांचा आक्ट यांतील कोणत्याही ठरावावरून ह्या कलमांत निर्दिष्ट केलेल्या रेलवे आडमिनिस्ट्रेशनाच्या जबाबदारीस बाध येतो असें समजूं नये. (सन १८९० चा आक्ट ९ [ रेलवेबाबद ] कलम ७२ ).

२. ज्या मालाबद्दल "जास्त भाडें" दिलें नसेल त्या मालाबद्दल रेलवे कंपनी, सन १८७९ चा आक्ट ४ कलम ११ वरून जबाबदार होत नाहीं, त्या मालाबद्दल जास्त भाडें दिलें असतां त्या कंपनीकडे जी जबाबदारी येते ती त्याच कलमांत विशेष रीतीनें सांगितली नाहीं अशा मालाबद्दलच्या जबाबदारीहून जास्त नसते. "जास्त भाडें" देणें ही गोष्ट विमा उतरल्याप्रमाणें नाहीं.

रुप्याच्या जिनसा भरलेली एक पेटी वादींनीं प्रतिवादींच्या कंपनीपाशीं सागर येथें नेण्याकरितां सन १८९० चे जानेवारी महिन्यांत मुंबईंत त्यांचे स्वाधीन केली. ती पेटी स्वाधीन केली ते वेळेस त्या पेटींत काय आहे तें वादींनीं प्रतिवादींस कळविलें व नेहमींच्या पार्सलाबद्दल जें भाडें देण्यांत येतें त्याहून जास्त भाडें वादींनीं प्रतिवादींस दिलें. सागर येथें जात असतां वाटेंत ती पेटी हरवली व इटारसी आणि सागर यांचे दरम्यान त्या पेटीचें काय झालें, याजबद्दल प्रतिवादींनीं पुरावा दिला नाहीं. त्या पेटीची किंमत घेण्याकरितां वादींनीं सन १८९३ सालीं प्रतिवादींवर फिर्याद केली.

**ठरावः**—सन १८७२ चा आक्ट ९ कलम १५१ यांत निक्षेपींचीं जीं कर्तव्यकर्मे सांगितलीं आहेत तीं पुरीं केलीं होतीं असें दाखविण्याचा बोजा प्रतिवादींवर असतां प्रतिवादींनीं तसें केलें नाहीं व तें वादींनीं मागितलेल्या रकमेबद्दल जबाबदार आहेत. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. १७ पृ. ७२३; न्या. पु. २८ मुं दि. नि. पृ. ३०९ व ३१० ).

३. **ठरावः**—रेलवेबाबद आक्टाचें ( सन १८९० चा आक्ट ९ ) कलम ७२ मध्यें ठरवि-

त्याप्रमाणें, प्रतिवादीकडे वहातुकीकरितां दिलेला माल हरवणें, नष्ट होणें अगर त्याचा नाश होणें याबद्दलची प्रतिवादींवर येणारी पात्रता कराराचा आक्ट कलमें १५१, १५२ व १६२ अन्वयें निक्षेपीवर येणाऱ्या पात्रतेप्रमाणें आहे. रेलवेज आक्टाचें कलम ७६ अन्वयें कॅरिअर्स आक्टाचें (सन १८६५) कलम ९ मध्यें घालून दिलेलें तत्त्व रेलवे कंपनीवर आणलेल्या दाव्यांस लागू करण्यांत आलेलें नाहीं, व कराराच्या आक्टाचें कलम १५१ अन्वयें पुराव्याचा जो बोजा प्रतिवादीवर ठेवण्यांत आलेला आहे तो वाढविण्यांत आलेला नाहीं. ज्या वस्तूचा निक्षेप करण्यांत आला आहे त्याच वस्तूच्या किंमतीच्या, आकाराच्या व दर्जाच्या स्वतःच्या मालकीच्या वस्तूचा एखादा साधारण हुषारीचा मनुष्य जितकी काळजी घेईल तितकी काळजी त्यानें निक्षिप्त वस्तूची घेतली पाहिजे, असें कराराचा आक्ट कलम १५१ मध्यें ठरविण्यांत आलें आहे; परंतु, प्रतिवादीनें अशा प्रकारची काळजी घेतल्यावर, विशेष कराराच्या अभावीं, माल नष्ट झाल्यावर, हरवल्यास अगर खराब झाल्यास त्याची जबाबदारी प्रतिवादीवर रहाणार नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३७ पृ. १; न्या. पु. ४८ मुं. दि. नि. पृ. १ व २).

४. एखाद्या इसमानें वहातुकीकरितां रेलवे कंपनीच्या स्वाधीन माल केल्यानंतर सदर माल रेलवे कंपनीच्या ताब्यांत असतांना हरवल्यास, त्याचें नुकसान झाल्यास, अगर तो नष्ट झाल्यास, सदर माल हरवला, त्याचें नुकसान झालें अगर तो नष्ट झाला ही गोष्ट आपणाकडून कोणत्याही प्रकारची हयगय झाल्यामुळें सदर माल हरवला नाहीं ही गोष्ट शाबीत करण्याचा बोजा रेलवे कंपनीवर येतो. कराराचा आक्ट कलमें १५१ व १५२ मध्यें हयगय केव्हां झाली असें समजावें याबद्दल ठराव केलेले आहेत. तथापि प्रत्येक कज्जांत रेलवे कंपनीनें कोणत्या प्रकारचा व किती पुरावा आणला असतां रेलवे कंपनीवरील जबाबदारी नष्ट होईल याबद्दल सार्वत्रिक असा कायद्याचा सर्वसाधारण नियम घालून देतां येणार नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३९ पृ. १८२; न्या. पु. ५० मुं. दि. नि. पृ. ९२ ते ९७).

**१५२.** निक्षिप्त मालाची जर निक्षेपीनें १५१ वे कलमांत सांगितल्याप्रमाणें काळजी घेतली असेल, तर तो निक्षिप्त माल जर हरवला तर किंवा त्याचा जो नाश अथवा त्याची जी बिघड होईल त्याजबद्दल निक्षेपी, कांहीं विशेष करार नसल्यास, जबाबदार होत नाहीं.

*निक्षिप्त वस्तु हरवल्याबद्दल वगैरे निक्षेपी केव्हा जबाबदार नसतो.*

## विशेष समजुतीची टीप.

हुंडेकरी याचा कायदा सन १८६५ चा आक्ट ३ हा ज्या वेळेस अमलांत आला त्या वेळेस, साधारण हुंडेकऱ्याच्या जबाबदाऱ्यांच्या संबंधानें जो इंग्लंड कायदा या देशांत चालू होता तोच इंग्लंड कायदा अद्यापि या देशांत चालू आहे व त्यास सन १८७२ चा आक्ट ९ कलमें १५१ व १५२ यांतील ठरावावरून व्यत्यय आलेला नाहीं.

वादी यानें सन १८६५ चा आक्ट ३ अन्वयें प्रतिवादी हे साधारण हुंडेकरी आहेत असें समजून प्रतिवादींपाशीं दुसरे ठिकाणीं नेमण्याकरितां कांहीं माल स्वाधीन केला. प्रतिवादीच्या आगबोटींपैकीं एका आगबोटीवरून तो माल जात असतां त्या बोटीस एक भोंक पडून तो माल नाहींसा झाला. तो माल घेण्याकरितां वादीनें प्रतिवादींवर फिर्याद केली. प्रतिवादींनीं जो कांहीं पुरावा दिला त्याजवरून असें आढळून आलें कीं, अशा प्रकारचा, इतकाच, व इतक्याच किंमतीचा जर कोणा मनुष्याचा तो माल असता तर अशा प्रसंगीं त्यानें त्या-

बद्दल जितकी खबरदारी घेतली असती व काळजी वाहिली असती तितक्या प्रकारची खबरदारी व काळजी व तत्परता प्रतिवादी यांनीं त्या वादीच्या मालाबद्दल घेतली होती. तो माल एकाद्या दैविक कृत्यामुळें किंवा राणीसाहेबांच्या शत्रूच्या कृत्यामुळें नाहींसा झाला नव्हता. त्या मालाबद्दल सन १८६५ चा आक्ट ३ कलम ६ यांत सांगितलेल्या तऱ्हेचा एकादा विशेष करारही झालेला नव्हता.

**ठरावः**—अशा प्रसंगीं सन १८७२ चा आक्ट ९ कलमें १५१ व १५२ यांतील ठराव लागू पडत नाहींत व त्याजवरून प्रतिवादींचें संरक्षण होत नाहीं. सबब प्रतिवादीं हे त्या मालाच्या नुकसानीबद्दल वादीस जबाबदार आहेत. ( इं. ला. रि. क. सी. व्हा. १० पृ. १६६; न्या. पु. १९ क. दि. नि. पृ. २५ ).

शर्तीस विरोध असें कृत्य निक्षेपीनें केल्यास निक्षेपाचा शेवट.

**१५३.** निक्षेपाच्या शर्तीस विरोधी असें जर एकादें कृत्य, निक्षिप्त मालाच्या संबंधानें निक्षेपी करील तर निक्षेपाचा करार, निक्षेप्त्याच्या इच्छेवरून, निरर्थक करण्याजोगा असा होतो.

## उदाहरण.

बनें स्वतः बसण्याकरितां अ हा बला एक घोडा भाड्यानें देतो. व त्या घोड्याला आपल्या गाडीस जोडून हांकतो. तर येणेंकरून, अच्या इच्छेस आल्यास निक्षेपाचा शेवट झाला असें समजावें.

निक्षिप्त मालाचा अधिकाराशिवाय उपयोग केल्याबद्दल निक्षेपीची जबाबदारी.

**१५४.** जर निक्षेपाच्या शर्तीस अनुसरून नाहीं असा निक्षिप्त मालाचा कोणताही उपयोग निक्षेपी करील, तर तसा उपयोग झाल्यानें अथवा होत असतांना मालाची जी कांहीं खराबी होईल तिजबद्दल निक्षेप्त्यास नुकसानी भरून देण्यास पात्र आहे.

## उदाहरणें.

( अ. ) केवळ कलाच बसण्यासाठीं म्हणून अ एक घोडा बला देतो. ब हा आपल्या कुटुंबांतील क या मनुष्यास त्या घोड्यावर बसावयाला परवानगी देतो. क काळजीनें बसतो, परंतु घोडा यदृच्छेनें पडतो आणि त्याला दुखापत होते. तर घोड्याला झालेल्या दुखापतीबद्दल अला नुकसानी भरून देण्याला ब पात्र आहे.

( ब. ) अ मुद्दाम वाराणशीला जाण्याकरितां म्हणून कलकत्ता येथें ब जवळून एक घोडा भाड्यानें घेतो. अ घोड्यावर काळजीनें बसतो, परंतु वाराणशीबद्दल कटक येथें जातो. घोडा यदृच्छेनें पडतो आणि त्याला दुखापत होते. तर घोड्याला झालेल्या दुखापतबिद्दल अ बची नुकसानी भरून देण्यास पात्र आहे.

१५५. जर निक्षेपी, निक्षेप्त्याच्या राजीनें निक्षेप्त्याचा माल खुद्द आपल्या

निक्षेप्त्याच्या राजीनें त्याचा माल निक्षेपीच्या मालांत मिसळल्यास मिश्री करण्याचा परिणाम कसा.

मालांत मिसळील, तर तेणेंकरून झालेल्या मिश्रणाशीं निक्षेप्त आणि निक्षेपी यांचा त्यांच्या त्यांच्या भागांच्या हिस्सेरसीनें नफ्या तोट्याचा संबंध राहील.

**१५६.** जर निक्षेपी, निक्षेप्त्याच्या राजी खेरीज निक्षेप्त्याचा माल खुद्द आपल्या मालांत मिसळील, आणि जर माल वेगळा करितां येईल किंवा विभागतां येईल, तर मालावरचे पक्षकाराचें स्वामित्व ज्याचे त्याच्या मालावर राहील, परंतु वेगळा करण्याला अथवा विभागण्याला जो खर्च लागेल तो आणि मिश्रीकरणापासून जी खराबी होईल ती निक्षेपीनें सोसली पाहिजे.

निक्षेप्त्याच्या राजी खेरीज माल मिसळला, पण माल निराळा करितां येत आहे तर मिश्रीकरणाचा परिणाम.

## उदाहरण.

अ कापसाचे शंभर गठ्ठे कांहीं विशेष निशाणी असलेले बला निक्षेपतो. ब ते शंभर गठ्ठे दुसरी निशाणी असलेले आपल्या दुसऱ्या गठ्ठ्यांत अच्या राजी खेरीज मिसळतो. तर अला त्याचे शंभर गठ्ठे परत मिळाले पाहिजेत, आणि गठ्ठे वेगळे करण्याला येईल तो सर्व खर्च व मिश्रणासंबंधीं कांहीं खराबी होईल ती सर्व बनें सोसली पाहिजे.

**१५७.** जर निक्षेपी, निक्षेप्त्याच्या राजी खेरीज, निक्षेप्त्याचा माल खुद्द आपल्या मालांत अशा रीतीनें मिसळील, कीं निक्षिप्त माल दुसऱ्या मालापासून निराळा करणें आणि तो परत स्वाधीन करणें हें अशक्य होईल, तर माल नाहींसा झाला याजबद्दल निक्षेपीकडून नुकसानी भरून घेण्याचा हक्क निक्षेप्त्यास आहे.

निक्षेप्त्याच्या राजी खेरीज माल मिसळला आणि तो निराळा करितां येत नाहीं तर त्या मिश्रीकरणाचा परिणाम.

## उदाहरण.

अ ४५ रुपये किंमतीचे केपेहून आलेल्या कणकीनें भरलेलें एक पीप ब जवळ निक्षेपितो. ब हा अच्या राजी खेरीज ती कणीक आपल्या देशीय कणकींत मिसळतो, आणि ती देशीय कणीक पिपास फक्त २५ रुपये भावाची आहे. तर अची कणीक नाहींशी झाली त्याजबद्दल बनें अची नुकसानी भरून दिली पाहिजे.

**१५८.** जर निक्षेपाच्या शर्तींत असें असेल कीं, माल निक्षेपीनें निक्षेप्त्याकरितां ठेवावा अथवा न्यावा, अथवा त्याजवर कांहीं काम करावें आणि निक्षेपीला त्याजबद्दल कांहीं देणगी मिळावयाची नाहीं. तर निक्षेपासाठीं निक्षेपीला जो अवश्य खर्च आला असेल, तो निक्षेप्त्यानें निक्षेपीस भरून दिला पाहिजे.

निक्षेप्त्यानें निक्षेपीचा अवश्य खर्च भरून देणें.

१५९. वापरण्याकरितां कोणी कांहीं वस्तु उसनी दिली तर ती फुकट उसनी दिली असल्यास, देणारा ती कोणत्याही वेळीं परत मागूं शकेल. मग देतेवेळीं प्रथम कांहीं नेमलेल्या वेळेपर्यंत किंवा नेमलेल्या कामासाठीं दिली असेल म्हणून चिंता नाहीं; परंतु नेमलेल्या वेळेपर्यंत अथवा नेमलेल्या कामासाठीं उसनी मिळाली आहे या भरंवशावर जर उसनी आणणारा अशा रीतीनें वर्तला असेल, कीं उसनी आणलेली वस्तु नेमलेल्या वेळेपूर्वीं देऊं लागल्यास उसनवार वस्तुपासून खरोखर झालेल्या फायद्यापेक्षां तोटा जास्त होईल, तर उसनें देणाऱ्याच्या मागण्यामुळें परत देणें भाग पडल्यास, तेणेंकरून झालेला तोटा भोगलेल्या फायद्यापेक्षां जितक्या रकमेनें जास्त असेल तितक्या रकमे एवढी नुकसानी उसनें देणारानें उसनें घेणाराची भरून दिली पाहिजे.

फुकट निक्षिप्त माल परत देणें.

१६०. निक्षिप्त माल ज्या काळाकरितां निक्षिप्त असेल तो काळ संपताच, अथवा ज्या कामाकरितां निक्षिप्त असेल तें काम होतांच, मागणें झाल्याशिवाय, परत करणें अथवा निक्षेप्त्याच्या हुकुमाप्रमाणें स्वाधीन करणें, हें निक्षेपीचें काम होय.

काळ संपताच अथवा काम होतांच निक्षिप्त माल परत करणें.

१६१. जर निक्षेपीच्या कसुरीमुळें माल योग्य वेळीं परत झाला नाहीं अथवा स्वाधीन केला गेला नाहीं अथवा देण्यास आणिला गेला नाहीं तर त्या वेळेपासून माल हरवेल, नाश पावेल, किंवा विघडेल तर त्याबद्दल निक्षेप्त्यास तो जबाबदार आहे.

माल योग्य काळीं स्वाधीन न केल्यास अथवा स्वाधीन करण्यास न आणिल्यास निक्षेपीची जबाबदारी.

## विशेष समजुतीची टीप.

**रेलवे कंपनीच्या स्वाधीन केलेला माल.**—एका इसमानें व्हिस्कीचे तीन गठ्ठे मालकाच्या जोखमीवर ( जोखीम-चिठ्ठी नमुना व ) वहातुकीकरतां रेलवे कंपनीच्या स्वाधीन केले होते. या तीन गठ्ठ्यांपैकीं एक गठ्ठा न मिळाल्यामुळें मालकानें नुकसान-भरपाईचा दावा कंपनीवर लावला.

**ठरावः**—हा दावा करारावरून आहे अपकृत्यावरून नाहीं. ( इं. ला. री. पा. सी. व्हा. २ पृ. ४४२; न्या. पु. ५८ पा. दि. नि. पृ. १९ ).

१६२. निक्षेप फुकट असल्यास त्याचा शेवट निक्षेप्त्याच्या अथवा निक्षेपीच्या मरणानें होतो.

फुकट केलेल्या निक्षेपाचा मरणानें शेवट.

१६३. अन्यथा कांहीं करार नसेल तर, निक्षिप्त मालापासून वृद्धि अथवा फायदा झाल्यास तो निक्षेपीनें निक्षेप्त्याच्या अथवा तो सांगेल त्याप्रमाणें स्वाधीन करून दिला पाहिजे.

निक्षिप्त मालापासून वृद्धि अथवा नफा झाल्यास तो निक्षेप्त्यास मिळाला पाहिजे.

## उदाहरण.

अ जोपासनेसाठीं एक गाय बच्या ताब्यांत ठेवून जातो. नंतर ती एक वासरूं विते. तर बनें गाय व त्याप्रमाणेंच वासरूंही अच्या स्वाधीन केलीं पाहिजेत.

१६४. निक्षेप करण्याचा निक्षेप्त्याला हक्क नव्हता, माल परत घेण्याचा हक्क नव्हता, अथवा मालाविषयीं हुकूम देण्याचा हक्क नव्हता, या कारणानें निक्षेपीस जो कांहीं तोटा येईल, त्याजबद्दल निक्षेप्ता निक्षेपीला जबाबदार आहे.

निक्षेप्त्याची निक्षेपीजवळ जबाबदारी.

१६५. जर मालाचे कित्येक संयुक्त मालक माल निक्षेपितील, तर अन्यथा कांहीं कबुलायत नसल्यास, तो माल निक्षेपीनें, सर्वांची राजी न घेतां, एका संयुक्त मालकाच्या स्वाधीन केल्यास अथवा एका संयुक्त मालकाच्या हुकुमाप्रमाणें स्वाधीन केल्यास चालेल.

कित्येक संयुक्त मालकांनीं केलेला निक्षेप.

१६६. जर निक्षेप्त्याला मालावर हक्क नसेल, आणि निक्षेपी इमानानें तो निक्षेप्त्याच्या परत स्वाधिन करील अथवा निक्षेप्त्याच्या हुकुमाप्रमाणें स्वाधीन करून देईल तर तशा रीतीनें स्वाधीन केल्याबद्दल निक्षेपी मालकाजवळ जबाबदार होणार नाहीं.

ज्या निक्षेप्त्यास हक्क नाहीं अशाच्या स्वाधीन माल परत करून दिल्याबद्दल निक्षेपी जबाबदार होत नाहीं.

१६७. जर निक्षेप्त्याशिवाय दुसरा मनुष्य निक्षिप्त मालावर हक्क सांगत असेल, तर माल निक्षेप्त्याच्या स्वाधीन करण्याचें थांबवावें व मालावरच्या हक्कांचा निर्णय करावा म्हणून तो मनुष्य कोर्टाला अर्ज करूं शकेल.

निक्षिप्त मालावर तिसरे माणसाचा हक्क.

१६८. जर कांहीं माल कोणास सांपडेल, तर माल संभाळून ठेवण्यास आणि मालकाचा शोध लावण्यास जे त्यानें आपखुर्षानें श्रम घेतले आणि जो खर्च केला, त्याबद्दल नुकसानी भरून मागण्यासाठीं मालकावर दावा आणण्याचा हक्क त्याला नाहीं, परंतु तशी नुकसानी भरून मिळेपर्यंत त्यानें तो माल मालकाविरुद्ध अटकावून ठेवल्यास चालेल; आणि हरवलेला माल परत आणून दिल्यास अमूक बक्षीस दिलें जाईल असें मालकानें म्हटलेलें असेल, तर ज्याला माल सांपडला तो या बक्षीसाबद्दल दावा आणूं शकेल, आणि तें मिळेपर्यंत माल अटकावून ठेवूं शकेल.

ज्याला माल सांपडेल त्याचा हक्क.

अमूक एक बक्षीस दिलें जाईल, असें म्हटलेलें असल्यास तशा बक्षिसाबद्दल दावा आणितां येईल.

१६९. जी वस्तु बहुधा विक्रीत असतात ती हरवली आहे, आणि योग्य शो-

जी बहुधा विक्रीत असतात अशी वस्तु सांपडल्यास ज्याला सांपडली ती त्यानें केव्हां विकावी.

धानें तिचा मालक सांपडत नाहीं, अथवा ज्याला ती सांपडली त्याला कायदेशीर रीतीनें आलेला खर्च मागितला असतां तो मालक देत नाहीं, तर ती वस्तु ज्याला सांपडली तो विकूं शकेल; मात्र

( १ ) जर ती वस्तु नासून जाण्याची भीति आहे अथवा तिची बहुतेक किंमत नाहींशीं होण्याचा संभव आहे; तर, अथवा

( २ ) ती वस्तु ज्याला सांपडली त्याला तिच्या संबंधानें आलेला कायदेशीर खर्च तिच्या किंमतीच्या दोन तृतियांशा इतका जर असेल, तर

तो विकूं शकेल.

निक्षेपीचा विशेष लियन.

१७०. जर, निक्षेपाच्या हेतु अन्वयें निक्षिप्त मालाच्या संबंधानें श्रम अथवा चतुराई यांचा ज्यांत खर्च आहे असें निक्षेपीनें कांहीं काम केलें असेल, तर, अन्यथा कांहीं करार नसल्यास, मालाच्या संबंधानें निक्षेपीनें जें कांहीं काम केलें असेल त्याजबद्दल योग्य देणगी त्याला मिळेपर्यंत त्याला सदर्हू माल अटकावून ठेवण्याचा हक्क आहे.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा ब या जवाहिऱ्याजवळ छाटून गुळगुळींत करण्याकरितां एक खरबरीत हिरा देतो, आणि त्याप्रमाणें ब हा हिरा नीट करितो. तर बनें केलेल्या कामाबद्दल त्याला देणगी मिळेपर्यंत तो हिरा ठेवून घेण्याचा हक्क बला आहे.

( ब. ) अ ब या शिंप्याला आंगरखा करण्याकरितां कापड देतो. आंगरखा तयार होतांच आणून देण्याविषयीं ब अला वचन देतो आणि शिलाई तीन महिन्यांनीं घेण्याचें कबूल करितो. तर शिलाई मिळेपर्यंत आंगरखा ठेवून घेण्याचा हक्क बला नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

स यानें जपाशीं एक बाजाची पेटी दुरुस्त करण्याकरितां दिली. त्या दुरुस्तीबद्दल रु. १०० घेण्याचें त्यानें कबूल केलें होतें. पुढें तितक्या रकमेस दुरुस्ती करण्याचें त्यानें नाकबूल केलें आणि जे थोडेसें काम झालें आहे त्याजबद्दलचे पैसे येईपर्यंत ही पेटी तुह्मांस परत देणार नाहीं म्हणून स यास सांगितलें. तेव्हां ती पेटी परत घेण्याकरितां स यानें ज याजवर दावा केला. त्यांत ठराव झाला तोः

ठरावः—ज्या वेळेस एखादें काम करण्याबद्दल स्पष्ट करार झालेला असतो त्या वेळेस तो सर्व करार पुरा केला पाहिजे, किंवा पुरा न केल्यास त्याजबद्दल कांहींच मागण्याचा हक्क पोंचत नाहीं. ज्या वेळेस स्पष्ट करार झालेला नसतो त्या वेळेस मात्र झालेल्या कामाबद्दल पैसा मागतां येतो. स व ज यांचा स्पष्ट करार झालेला होता आणि म्हणून झालेल्या कामाचे पैसे येईपर्यंत ती

पेटी ठेवण्याचा ज यास हक्क नाहीं. सबब ती त्यानें कांहीं न घेतां स्त यास परत दिली पाहिजे. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ६ पृ. १३९; न्या. पु. १९ अ. दि. नि. पृ. ५२ ).

पेढीवाले, फ्याक्टर लोक, धक्केवाले, अटर्नी लोक आणि विमेदलाल यांचा साधारण लियन.

**१७१.** पेढीवाले फ्याक्टर लोक, *धक्केवाले, हायकोर्टांचे अटर्नी, आणि विमेदलाल यांजवळ कांहीं माल निक्षिप्त असेल, तर तो, अन्यथा कांहीं करार नसल्यास, देवघेवीच्या साधारण बाकीबद्दल तारणाऐवजीं, ते अटकावून ठेवूं शकतील; परंतु अशा बाकीबद्दल निक्षिप्त माल तारणाऐवजीं, त्याविषयीं स्पष्ट करार नसल्यास, अटकावून ठेवण्याचा हक्क दुसऱ्या कोणत्याही मनुष्यास नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. मेसर्स, ई. एल. आणि कंपनी, हे सदरीं लिहिलेल्या कंपनीचे चिटणीस व खजिनदार होते. सदहू कंपनीचें काम चालविण्यासाठीं वेळोवेळीं सदहू कंपनीस ज्या रकमा कर्जाऊ दिल्या व ज्या त्या कंपनीकारितां खर्च केल्या त्यांजबद्दल सदहू कंपनीकडे आमचे १,१२,००० रुपयें येणें आहेत, असें त्यांनीं मागणें केलें. त्यांपैकीं एक लाख रुपयांची रक्कम सदहू कंपनीस कर्जाऊ दिली होती व बाकीची रक्कम त्या कंपनीचें काम चालविण्याचें कामीं खर्च केली होती. मेसर्स ई. एल. आणि कंपनी यांचें असें म्हणणें होतें कीं, सदहू कंपनीची सर्व रक्कम आमचे कबजांत आहे व १,१२००० रुपयांची रक्कम आम्हांस मिळेपर्यंत त्या मिळकतीवर आमचा हक्क आहे. दुसऱ्या धनकोनीं वादीचा तो कबजा व हक्क नाकबूल केला.

**ठरावः**—मेसर्स ई. एल. आणि कंपनी यांजकडे त्या कंपनीच्या मिळकतीचा जरी कबजा असला तरी ते म्हणतात त्याप्रमाणें त्यांचा त्या मिळकतीवर हक्क नाहीं.

लियन ( हक्क ) साधारण असतो किंवा विशेष प्रकारचा असतो. मेसर्स ई. एल. आणि कंपनी यांचा सदहू कंपनीच्या मिळकतीवर तसा साधारण लियन नाहीं, कारण ते " पेढीवाले, फ्याक्टर्स लोक, धक्केवाले, हायकोर्टांचे अटर्नी, विमेदलाल " नाहींत आणि सन १८७२ चा आक्ट ९ कलम १७१ वरून तशा लोकांकडे मात्र साधारण लियन असतोः किंवा त्याच आक्टाचें कलम २१७ वरूनही त्यांचा त्या मिळकतीवर हक्क नाहीं; कारण, तें कलम या प्रकरणास लागत नाहीं, कारण मुख्यासाठीं ( मालकासाठीं ) गुमास्त्याच्या हातीं आलेल्या पैक्यास मात्र तें कलम लागू आहेः किंवा कलम २२१ वरूनही त्यास हक्क पोंचत नाहीं, कारण त्यांनीं जो पैका त्या कंपनीला दिला किंवा जो पैका त्यांनीं खर्च केला तो त्या कलमांत सांगितलेल्या रीतीनें, ज्या मिळकतीवर ते लियन सांगत आहेत त्या मिळकतीच्या संबंधानें किंवा आपल्या मेहनतीच्या संबंधानें त्यांनीं ती रक्कम त्या कंपनीस कर्जाऊ दिली नव्हती किंवा तो खर्च केला नव्हता; परंतु त्यांनीं त्या कंपनीकरितां त्या कंपनीच्या तर्फें तीं कर्जें सर्वसाधारण रीतीनें व सर्व कामाकरितां म्हणून दिलेलीं होतीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. १३ पृ. ३१४; न्या. पु. २४ मुं. दि. नि. पृ. १७२ व १७३ ).

२. **हाटेलवाल्याची जबाबदारी.**—हाटेलवाल्यावर त्याचे पाहुण्यांचे संबंधांत असलेली

---

* " फ्याक्टर " म्हणजे, ज्याकडे एखादा माल विकण्याकरितां किंवा अन्य कारणाकरितां दिला असतो, तो; ( महादेव चिमणाजीकृत अपकृत्य शास्त्राचें कलम ३१३ ), पहा.

जबाबदारी कराराच्या आक्टाअन्वयें नियमित करण्यांत आलेली आहे; व एखाद्या विशिष्ट स्थलीं विशिष्ट करार झाला नसल्यास सदर्हू आक्टाचें प्रकरण ९ मधील नियम लागू पडतात.

हाटेलमध्यें आलेला पाहुणा हा हाटेलच्या इमारतीमध्यें दुसरीकडे जेवावयास गेला असतां त्याचें खोलींमधून त्याचें सामान चोरीस गेलें. सदर पाहुण्याच्या ताब्यांत जी खोली होती ती असुरक्षित स्थितीमध्यें आहे हें हाटेलवाल्यास माहीत असून त्यानें ती दुरुस्त करण्याची कांहीं तजवीज केलेली नव्हती असें शाबीत झालें होतें.

ठरावः—हाटेलवाल्यावर जबाबदारी आहे. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४४ पृ. ७३५; न्या. पु. ५७ अ. दि नि. पृ. ५५).

## गहाणाचे निक्षेप.

**१७२.** कर्ज फेडलें जाईल अथवा कांहीं एक वचन पुरें केलें जाईल अशा गोष्टींच्या तारणाबद्दल जो मालाचा निक्षेप त्याला गहाण असें नांव दिलें आहे. अशा प्रकारचा जो निक्षेप्ता त्याचें नांव गहाण देणारा, आणि अशा प्रकारचा जो निक्षेपी त्याचें नांव गहाणदार.

'गहाण' 'गहाणदेणारा' आणि 'गहाणदार' यांचें लक्षण.

**१७३.** गहाण दिलेला माल केवळ कर्जाच्या फेडी करितां अथवा वचनाच्या पूर्ततेकरितांच नव्हे, पण कर्जाच्या व्याजाकरितां, आणि गहाण ठेविलेला माल ताब्यांत राहिल्याच्यासंबंधानें अथवा तो संभाळून ठेवण्याच्या संबंधानें गहाणदाराला जे कांहीं अवश्यकतेचे खर्च आले असतील त्या सर्व खर्चांकरितां सुद्धां गहाणदार अटकावून ठेऊं शकेल.

अटकावून ठेवण्याचा गहाणदाराला हक्क.

**१७४.** ज्या कर्जाकरितां अथवा वचनाकरितां माल गहाण दिला असेल त्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहीं कर्जाकरितां अथवा वचनाकरितां, तसें करण्याबद्दल कांहीं करार नसल्यास, गहाणदार गहाण दिलेला माल अटकावून ठेऊं शकणार नाहीं; परंतु अन्यथा समजण्यास कारण नसल्यास, गहाणदारानें नंतर दिलेल्या कर्जी रकमांच्या संबंधानें, तसा करार गर्भित आहे असें ग्रहण केलें पाहिजे.

ज्या करितां माल गहाण दिला त्या शिवाय अन्य कर्जाकरितां किंवा वचनाकरितां गहाणदारानें माल अटकावून ठेवू नये.

मागाहून दिलेल्या रकमा असल्यास करार गर्भित समजणें.

## विशेष समजुतीची टीप.

मागाहून घेतलेल्या कर्जाची (त्या कर्जास जमीन गहाण लावून दिली नव्हती) फेड होईपर्यंत पूर्वीचें गहाण सोडवून घेऊं नये असा करार नंतरच्या कर्ज रोख्यांत लिहून घेतला असेल तर व्यवहारोपयोगी होईल. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २० पृ. ३४६; न्या. पु. ३१ मुं. दि. नि. पृ. १६०).

१७५. गहाण दिलेला माल संभाळून ठेवण्याला गहाणदाराला जो असाधारण खर्च आला असेल तो गहाण देणाराकडून भरून घेण्याचा हक्क गहाणदाराला आहे.

गहाणदाराला जे असाधारण खर्च आलें असतील ते भरून घेण्याचा त्याला अधिकार.

१७६. ज्यासाठीं माल गहाण ठेविला असेल तें कर्ज अथवा वचन ठरविलेल्या वेळीं गहाण देणारा न फेडील अथवा ठरविलेल्या वेळीं पुरें न करील तर गहाणदार त्या कर्जाबद्दल अथवा वचनाबद्दल गहाण देणाऱ्यावर दावा आणून, गहाण दिलेला माल स्वतंत्र तारण ऐवजीं अटकावून ठेऊं शकेल, अथवा गहाण देणाराला विक्रीबद्दल योग्य खबर देऊन गहाण दिलेली वस्तु विकूं शकेल.

गहाण देणारा कसुरी करील तर गहाणदाराचा हक्क.

विक्रीचा पैसा येईल तो जर कर्ज अथवा वचन ह्यांच्या संबंधानें यावयाच्या पैशापेक्षां कमी येईल, तर बाकीच पैसा देण्यास गहाण देणारा पात्र राहील. यावयाच्या पैशापेक्षां विक्रीनें आलेला पैसा जास्त आला असेल, तर फाजील गहाणदारानें गहाण देणाराला परत दिलें पाहिजे.

## विशेष समजुतीची टीप.

**गहाण ठेवणारास नोटीस देणें याचा अर्थ.**—कराराच्या आक्टाचें कलम १७६ मध्यें 'गहाण ठेवणारास मालाच्या विक्रीबद्दल योग्य नोटीस देऊन गहाण घेणारानें माल विकावा' असे शब्द आहेत त्यांचा अर्थ आपला माल विकण्याचा इरादा आहे अशाबद्दल गहाण घेणारानें गहाण देणारास योग्य नोटीस दिली पाहिजे असा आहे. नोटीस देण्यापूर्वीं मालाची विक्री करण्याबद्दलची योग्य तजवीज केली असली पाहिजे व या विक्रीच्या सर्व तपशिलासंबंधाची माहिती गहाण घेणारानें गहाण देणारास दिली पाहिजे असा या शब्दांचा अर्थ होत नाहीं. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४० पृ. ५२२; न्या. पु. ५३ अ. दि. नि. पृ. ३२ ).

१७७. ज्या करितां माल गहाण ठेविला तें कर्ज फेडावयाला अथवा तें वचन पुरें करावयाला जर वेळ नेमिली असेल, आणि गहाण देणारा नेमिल्यावेळीं कर्ज न फेडील अथवा वचन पुरें न करील तर गहाण ठेविलेल्या मालाची वस्तुतः विक्री होण्यापूर्वीं गहाण ठेविलेला माल नंतर कोणत्याही वेळीं गहाण देणारा सोडवून घेऊं शकेल; परंतु तो तसें करील तर त्याच्या कसुरीमुळें आलेला खर्च सुद्धां त्यानें भरून दिला पाहिजे.

गहाण देणारा कर्ज न फेडील किंवा वचन पुरें न करील तर सोडवून घेण्याविषयीं त्याचा हक्क.

१७८. कोणा मनुष्याच्या ताब्यांत कांहीं माल असेल, अथवा एखादें बिल आफ लेडिंग, डाकवारंट, वखारवाल्याचें सर्टिफिकेट, धक्केवाल्याचें सर्टिफिकेट, अथवा स्वाधीन करण्याचें वारंट अथवा हुकूम, अथवा मालावरील हक्कांबद्दल दुसरा कोण-

ज्याच्या ताब्यांत माल अथवा मालावरील हक्काचे दस्तऐवज असतील त्यानें

तें गहाण ठेवणें.

ताहीं दस्तऐवज हीं असतील, आणि तो माल अथवा ते दस्तऐवज हीं त्यानें गहाण ठेविल्यास, तें गहाण कायदेशीर होईल; मात्र, गहाणदार इमानानें वर्तत आहे आणि अशा प्रसंगानें वर्तत आहे कीं, गहाण देणारा अयोग्य रीतीनें वागत आहे असें योग्य अनुमान ज्यापासून करितां येईल असा प्रसंग तो नव्हे, असें समजलें पाहिजे.

आणखी असें ठरविलें आहे कीं, तसला माल किंवा तसले दस्तऐवज हे त्यांच्या कायदेशीर मालकाजवळून अथवा ते ज्यांच्या ताब्यांत कायदेशीर रीतीनें असतील अशा कोणत्याही मनुष्याकडून, अपराधाच्या किंवा कपटाच्या योगानें मिळविलेले असूं नयेत.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. वादीच्या मयत बायकोनें प्रतिवादीपाशीं हडप ठेविलेल्या दागिन्यांची किंमत घेण्यासाठीं वादीनें प्रतिवादीवर दावा केला. वादी आणि त्याची बायको एकत्र रहात असत व वादीच्या माहितीनें आणि संमत्तीनें दागिन्यांची पेटी बायकोच्या ताब्यांत असे, परंतु ते सर्व दागिनें निखालस रीतीनें वादीचे होते. वादीस कळविल्यावांचून किंवा त्याची संमत्ती घेतल्यावांचून त्याच्या बायकोनें प्रतिवादीस लिहून दिलेल्या वायदेचिठ्यांचे फेडीकरितां तारण म्हणून तिनें ते दागिने प्रतिवादीकडे हडप ठेविले होते. ती मेल्यानंतर प्रतिवादीनें त्या वायदेचिठ्यांची रक्कम घेण्यासाठीं वादीकडे मागणें केलें. वादीनें ती रक्कम देण्याचें नाकबूल केलें आणि त्या दागिन्यांची किंमत घेण्याकरितां त्यानें प्रतिवादीवर दावा केला.

**ठरावः**—सन १८७२ चा आक्ट ९ कलम १७८ मधील ठरावाअन्वयें, जेणेंकरून तें तारण कायदेशीर होईल अशा प्रकारचा वादीच्या बायकोकडे प्रथमपासून किंवा पुढें त्या दागिन्यांचा कबजा नव्हता. सदहू कलमाअन्वयें कोणतेंही गहाण कायदेशीर होण्यास जो माल गहाण ठेविला असेल त्या मालाचा कबजा गहाण देणाराकडे मालकीचें हक्कानें असावा लागतो; नुसता त्या मालाचा त्याजकडे ताबा असेल तर तेवढ्यावरून तो माल दुसऱ्यास लावून देण्याचा त्यास अधिकार पोंचणार नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २४ पृ. ४५८; न्या. पु. ३५ मुं. दि. नि. पृ. २९८ व २९९ ).

२. रेस्पांडेंटानें ( वादी ) कापसाचे कांहीं गठ्ठे विकत घेतले; व ते त्यानें प्रतिवादी नं. २ च्या हवाली मुकादम या नात्यानें केले. प्रतिवादी नं. २ नें सदर गठ्ठयांचा निक्षेप अपेलेंट ब्यांकेकडे ( प्रतिवादी नं. १ ) केला. प्रतिवादी नं. २ चा ब्यांकेबरोबर जो व्यवहार चालला होता त्या व्यवहाराच्या क्रमांत प्रतिवादी नं. २ नें ते गठ्ठे विकून ते प्रतिवादी नं. २ कडे अगर प्रतिवादी नं. २ च्या सांगण्यावरून ते एखाद्या त्रयस्थ इसमाकडे जाईपर्यंत ते गठ्ठे ब्यांकेच्या गोदामांत पडले होते. वादीनें कापसाचे गठ्ठे अगर त्यांची किंमत मिळण्याकरितां दावा आणला. ब्यांकेनें आपल्या मालकीचे कापसाचे गठ्ठे वापरले आहेत असें वादीनें कथन केलें. आपण जी दाद मागितली आहे ती आपणांस देतां येत नाहीं असें ठरल्यास, आपण प्रतिवादी नं. २ च्या जागीं आलों आहों असें ठरवावें, आपले हक्क निश्चित करून ज्ञापित करण्यांत यावे, व प्रतिवादी नं. २ नें ब्यांकेजवळ जीं तारणें ठेविलीं असतील त्यांची व्यवस्था आपल्या फायद्याकरितां करण्यांत यावी; अशा वैकल्पित दादी वादीनें मागितल्या होत्या.

ठरावः—ब्यांकेजवळ ज्या इसमानें कापूस ठेवला होता त्या इसमास अगर तो इसम सांगेल त्यास ब्यांकेनें कापूस दिला. कोणत्याही इसमाचा कापसावर हक्क आहे अशी खबर त्या वेळीं ब्यांकेस नव्हती यामुळें, वादीच्या दाव्यास पूर्णपणें उत्तर मिळत आहे. कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ चा आक्ट ९ ) कलम १७८ चा अर्थ काय आहे याबद्दल कनिष्ट कोर्टांचा मतभेद झालेला आहे. सदर कलमामुळें ब्यांकेचें संरक्षण होत आहे व कापसाचा निक्षेप कायदेशीर होता असें अव्वल कोर्टाचें मत होतें. अपेलेट कोर्टाचें मत याविरुद्ध होतें. आमचें मत वर दिल्याप्रमाणें असल्यामुळें कराराच्या आक्टाचें कलम १७८ चा अर्थ काय याबद्दल मत देण्याची अवश्यकता राहिली आहे असें आह्मांस वाटत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३७ पृ. १२२; न्या. पु. ४८ मुं. दि. नि. पृ. ८९ ).

जेव्हां गहाणदेणाराचा संबंध नियमित आहे तेव्हां गहाण दिल्यास कसें.

**१७९.** कांहीं मालाशीं ज्या मनुष्याचा नफ्यातोट्याचा संबंध नियमित आहे त्यानें तो माल गहाण ठेविल्यास तें गहाण त्या संबंधापुरतें कायदेशीर समजावें.

## विशेष समजुतीची टीप.

**या कलमाचा कलम १७८ वर परिणाम.**—कराराच्या आक्टाचें कलम १७९ मधील ठरावामुळें कराराच्या आक्टाचें कलम १७८ चें क्षेत्र मर्यादित करण्यांत आलेलें नाहीं; परंतु माल गहाण टाकणारास गहाण टाकलेल्या मालांत जे हितसंबंध असतील तेवढ्यांपुरतें सदर गहाण–कलम १७८ मधील नियमनांत समावेश होणारी एखादी शर्त सदर गहाणांत असून तें गहाण बेकायदेशीर होत असलें तरी–सदर कलम १७९ मधील ठरावाप्रमाणें कायदेशीर करण्यांत आलें आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास ज्या इसमाच्या कवजांत माल अगर मालासंबंधाचे दस्तऐवज आहेत अशा इसमास सदर मालांत कांहीं हितसंबंध असेल तर निदान आपल्या हितसंबंधापुरता सदर मालावर बोजा उत्पन्न करण्याचा विनशर्त अधिकार सदर इसमास असतो. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४२ पृ. २०५; न्या. पु. ५३ मुं. दि. नि. पृ. १३ ).

## निक्षेपींनीं आणि निक्षेप्त्यांनीं अन्याय करणाराविरुद्ध दावे आणणें.

निक्षेप्त्यांनीं अथवा निक्षेपीनें अन्याय करणारावर दावा आणणें.

**१८०.** जर तिसरा मनुष्य निक्षेपीजवळून निक्षिप्त मालाचा वापर अथवा कबजा अन्यायानें हरण करील, अथवा त्या मालास कांहीं इजा करील, तर निक्षेप झाला नसता तर मालकानें तशा प्रसंगीं जे उपाय योजिले असते ते योजण्याचा हक्क निक्षेपीस आहे; आणि तशा रीतीनें हरण केल्याबद्दल अथवा इजा केल्याबद्दल तिसऱ्या मनुष्यावर दावा आणणें तो निक्षेप्त्यानें किंवा निक्षेपीनें आणिल्यास चालेल.

अशा दाव्यांनीं समाधानाबद्दल अथवा नुकसानीबद्दल म्हणून जें मिळेल त्याची हिस्सेरसी.

**१८१.** अशा प्रकारच्या एखाद्या दाव्यांत समाधानाबद्दल अथवा नुकसानीबद्दल म्हणून जें कांहीं मिळेल त्याची निक्षिप्ता आणि निक्षेपी यांच्या दरम्यान, त्यांच्या त्यांच्या नफ्यातोट्याच्या संबंधाप्रमाणें व्यवस्था केली पाहिजे.

## बाब १० वी.

### * अडत.

### गुमास्त्यांची नेमणूक आणि त्यांचा अधिकार.

'गुमास्ता' आणि 'मुख्य' यांचें लक्षण.

१८२. गुमास्ता म्हणजे दुसऱ्या मनुष्याकरितां कांहीं तरी कृत्य करण्याला, अथवा तिसऱ्या मनुष्याशीं असलेल्या लेवादेवींत दुसऱ्या ऐवजीं प्रतिनिधीदाखल वागण्याला, नेमलेला जो मनुष्य, तो होय. ज्या मनुष्याकरितां तें कृत्य केलें जातें, अथवा गुमास्ता ज्याचा प्रतिनिधी असतो, त्याचे नांव मुख्य.

गुमास्ता कोण नेमूं शकेल.

१८३. प्रत्येक मनुष्य, कीं जो त्याला लागू असलेल्या कायद्याप्रमाणें वयांत आला असेल आणि जो वेडा नाहीं, तो गुमास्ता नेमूं शकेल.

### विशेष समजुतीची टीप.

कोणी मनुष्य, त्यास लागू असलेल्या कायद्याप्रमाणें, वयांत केव्हां येतो, याबद्दल मागील कलम ११ वरील टिपा ५ व ६ पहा.

गुमास्ता कोणास होतां येईल.

१८४. मुख्य आणि तिसरी मनुष्यें यांच्यामधील संबंधानें पाहिलें असतां कोणत्याही मनुष्याला गुमास्ता होतां येईल; परंतु जो वयांत आला नाहीं आणि वेडा असेल असा कोणताही मनुष्य गुमास्ता होऊं शकणार नाहीं, आणि झाल्यास त्याविषयीं जे ठराव या आक्टांत आहेत त्याअन्वयें तो आपल्या मुख्याजवळ जबाबदार असणार नाहीं.

मोबदला अवश्य नाहीं.

१८५. गुमास्तगिरी उत्पन्न होण्यास मोबदला असणें अवश्य नाहीं.

गुमास्त्याचा अधिकार स्पष्ट किंवा गर्भित असेल.

१८६. गुमास्त्याचा अधिकार स्पष्ट किंवा गर्भित असूं शकेल.

स्पष्ट किंवा गर्भित अधिकारांचीं लक्षणें.

१८७. जेव्हां अधिकार बोललेल्या किंवा लिहिलेल्या शब्दांनीं दिलेला असतो तेव्हां त्याला स्पष्ट अधिकार असें म्हणावें; आणि अधिकार असल्याविषयीं कोणत्याही कामाच्या हवालांबद्दल जेव्हां अनुमान करितां येतें तेव्हां त्या अधिकाराला गर्भित अधिकार असें नांव आहे; आणि एखाद्या कामांत बोललेल्या किंवा लिहिलेल्या ज्या

* अडत म्हणजे, मुनीमपणा किंवा गुमास्तेपणा.

गोष्टी आणि व्यवहाराचा नेहमींचा जो क्रम यावरून त्या कामाचे हवाले असें म्हणतां येईल.

## उदाहरण.

अचे श्रीरामपूर येथें एक दुकान आहे; तो स्वतः कलकत्त्यास राहून केव्हां केव्हां दुकानाला जातो. दुकानाची व्यवस्था ब पाहतो आणि दुकानाकरितां तो अच्या नांवें कजवळून माल मागवीत असतो आणि अच्या पैशांतून त्याची किंमत देत असतो, आणि ही गोष्ट बला माहीत आहे. तर बला दुकानाच्या कामाकरितां कजवळून अच्या नांवें माल आणण्याचा गर्भित अधिकार अजवळून आहे असें समजावें.

## विशेष समजुतीची टीप.

जरूर वाटल्यास पैसा कर्जाऊ काढण्याचा, कराराच्या आक्टाचीं कलमें १८७ व १८८ यांतील सामान्य ठरावास अनुसरून गुमास्त्याला अधिकार पोंचतो यांत शंका नाहीं, परंतु विशेष बाबतींत आणि कर्ज काढण्याचा गर्भित अधिकार गुमास्त्यास आहे असें व्यवहारावरून दिसून येण्यासारखें नसेल अशा बाबतींत विशेषेंकरून वरील ठराव मर्यादीत होण्यास पात्र आहे. (इं. ला. री. क. सी. व्हा. ३३ पृ. ३४३; न्या. पु. ४१ क. दि. नि. पृ. १७ व १८).

गुमास्त्याचा अधिकार कोठपर्यंत.

१८८. जर गुमास्त्यास एखादें कृत्य करण्यास अधिकार असेल, तर तें कृत्य करण्यासाठीं ज्या कोणत्याही कायदेशीर गोष्टी करणें अवश्य असेल, त्या सर्व करण्याचा त्याला अधिकार आहे. जर गुमास्त्याला कांहींएक उद्योग चालविण्याचा अधिकार असेल तर त्यासाठीं ज्या सर्व कायदेशीर गोष्टी जरूर असतील अथवा तो उद्योग चालवितांना नेहमीं ज्या केल्या जातात त्या सर्व गोष्टी करण्याचा अधिकार त्याला असतो.

## उदाहरणें.

(अ.) ब हा लंडन येथें राहतो. त्यानें मुंबई येथें त्याचें (बचें) कांहीं कर्ज यावयाचें आहे तें वसूल करण्याकरितां अला नेमिलें. तर तें कर्ज वसूल करण्याकरितां कायद्यासंबंधीं ज्या कोणत्याही कामाची जरूर असेल तें काम चालविण्याचा अधिकार त्याला आहे; आणि रिणकोस त्या कर्जापासून त्यानें मुक्त केल्यास ती मुक्तता कायदेशीर होईल.

(ब.) अ हा गलबतें बांधण्याचा आपला उद्योग चालविण्यासाठीं बला गुमास्ता नेमतो. तर लांकूड व दुसरें सामान विकत घेण्याचा, आणि तो उद्योग चालविण्याकरितां कामगार ठेवण्याचा अधिकार बला आहे.

१८९. जरूरीचा प्रसंग आल्यास साधारण शहाणपणाचा मनुष्य त्यासारख्या

जरूरीच्या प्रसंगीं गुमास्त्याचा अधिकार.

प्रसंगीं खुद्द आपल्या कामीं जीं कृत्यें करील, तीं सर्व, आपल्या मुख्याला तोटा येऊं नये म्हणून, करण्याचा अधिकार गुमास्त्याला आहे.

### उदाहरणें.

( अ. ) माल विकण्याकरितां गुमास्ता नेमल्यास, जरूर असेल तर तो माल दुरुस्त करण्याचा अधिकार त्याला आहे.

( ब. ) अ बच्या नांवें कलकत्त्याला सामान पाठवितो, आणि तें लागलेंच कटक येथें कजवळ रवाना करण्याविषयीं हुकूम देतो. तर तें सामान कटकला पाठविल्यास नासून जाईल असें असेल तर तें कलकत्ता येथें विकण्याचा अधिकार बला आहे.

### पोटगुमास्ते.

गुमास्ता पोटगुमास्त्याची नेमणूक केव्हां करूं शकणार नाहीं.

१९०. जीं कृत्यें गुमास्त्यानें जातीनें करण्याचा स्पष्ट किंवा गर्भित रीतीनें पतकर घेतला असेल, तीं करण्यासाठीं त्यानें दुसरा नेमल्यास तें कायदेशीर होणार नाहीं; मात्र, व्यापाराच्या साधारण प्रचाराअन्वयें पोटगुमास्ता नेमल्यास चिंता नाहीं असें असेल, अथवा त्या अडतीचें स्वरूप असें असेल कीं पोटगुमास्ता नेमलाच पाहिजे, तर कायदेशीर होईल.

'पोटगुमास्ता' याचें लक्षण.

१९१. पोटगुमास्ता म्हणजे मूळ गुमास्त्यानें अडतीच्या कामीं लाविलेला आणि मूळ गुमास्त्याच्या सत्तेखालीं काम करणारा मनुष्य.

कायदेशीर रीतीनें नेमतां येत असून नेमलेला जो पोटगुमास्ता तो मुख्याचा प्रतिनिधी कोठपर्यंत समजावयाचा.

१९२. जर पोटगुमास्ता, नेमणें कायदेशीर असून नेमला असेल, तर तिसऱ्या मनुष्याच्या संबंधानें पाहिलें असतां, पोटगुमास्ता मुख्याचा प्रतिनिधी अशा रीतीनें समजावयाचा, आणि त्याच्या कृत्यांनीं तो मुख्य असा बांधला जातो व जबाबदार होतो, कीं जसें काय त्याला मुख्यानें प्रथमतः आपला गुमास्ता नेमिलें होतें.

पोटगुमास्त्याबद्दल गुमास्त्याची जबाबदारी.

पोटगुमास्ता जीं कृत्यें करील त्यांजबद्दल गुमास्ता मुख्याजवळ जबाबदार असतो.

पोटगुमास्त्याची जबाबदारी.

पोटगुमास्ता आपल्या कृत्यांबद्दल गुमास्त्याला जबाबदार असतो, परंतु कपट अथवा समजून उमजून अन्याय केला असल्यास ते प्रसंग खेरीज करून, मुख्याजवळ तो जबाबदार नसतो.

## विशेष समजुतीची टीप.

या कलमाचे पहिले पारिग्राफांतील " नेमणें कायदेशीर असून नेमिला असेल " या शब्दांचा अर्थ योग्य रीतीनें नेमिला असेल, इतकाच आहे.

नेमण्याचा अधिकार नसतां पोटगुमास्ता नेमल्यास त्याच्याबद्दल गुमास्त्याची जबाबदारी.

**१९३.** जर पोटगुमास्ता नेमण्याचा अधिकार नसतांना गुमास्त्यानें पोटगुमास्त्याचें काम करण्यास [illegible]ला नेमिलें असेल, तर मुख्याचा आणि गुमास्त्याचा जो संबंध असतो तो त्या गुमास्त्याचा आणि त्या पोटगुमास्त्याचा संबंध होतो, आणि त्या पोटगुमास्त्याच्या कृत्यांबद्दल गुमास्ता मुख्याजवळ आणि तिसऱ्या मनुष्यांजवळ जबाबदार होईल; तशा रीतीनें नेमलेला मनुष्य मुख्याचा प्रतिनिधी समजावयाचा नाहीं, आणि तशा रीतीनें नेमलेल्या मनुष्याच्या कृत्यांबद्दल मुख्य जबावदार नाहीं व तो मनुष्यही मुख्याजवळ जबाबदार होणार नाहीं.

गुमास्तगिरीच्या उद्योगांतील काम करण्यास ज्याला गुमास्त्यानें अधिकारावरून नेमले असेल त्याचा आणि मुख्याचा संबंध.

**१९४.** जर अडतीच्या कामीं मुख्याच्या जागीं काम करण्याला दुसरा मनुष्य नेमण्याचा गुमास्त्याला स्पष्ट किंवा गर्भित अधिकार असून, गुमास्त्यानें त्याप्रमाणें दुसरा मनुष्य नेमला असेल, तर त्या मनुष्याला पोटगुमास्ता समजावयाचें नाहीं, परंतु अडतीचें जेवढें काम त्याच्या स्वाधीन केलें असेल तेवढ्यापुरता तो मनुष्य मुख्याचा गुमास्ताच असें समजलें पाहिजे.

### उदाहरणें.

(अ.) अ हा ब या आपल्या सालिसिटरास आपली ( अची ) इस्टेट लिलांवानें विकावयाला हुकूम देतो आणि त्या कामासाठीं एक लिलांवदार नेमावयाला सांगतो. ब हा क या लिलांवदाराला लिलांव करण्यास नेमतो. तर क हा पोटगुमास्ता होत नाहीं, परंतु लिलांव करण्याकरितां अचा गुमास्ता समजला पाहिजे.

(ब.) अ हा ब या कलकत्यांतील सावकारास क आणि कंपनीकडून अला यावयाचा पैसा वसूल करावयाचा अधिकार देतो. ब, ड या वकिलाला पैसा उपविण्याकरितां क आणि कंपनी यांजवर कायद्याप्रमाणें काम चालविण्यास सांगतो. तर ड हा पोटगुमास्ता नव्हे पण अचा वकील होय.

तसा मनुष्य नेमतांना गुमास्त्याचें कर्तव्य.

**१९५.** आपल्या मुख्याकरितां असा गुमास्ता निवडतांना, जितका विचार साधारण शहाणपणाचा मनुष्य खुद्द आपल्या कामीं खर्च करील, तेवढाच विचार गुमास्त्यानें खर्च करणें भाग आहे, आणि जर तो तसें करील, तर अशा निवडलेल्या गुमास्त्याच्या कृत्यांबद्दल अथवा हयगईबद्दल तो मुख्याजवळ जबाबदार होणार नाहीं.

## उदाहरणें.

(अ.) अ हा व या सावकाराला आपणासाठीं एक गलबत विकत घेण्यास सांगतो. ब हा अकरितां जहाज निवडून घेण्याला एका सर्व्हेअराची योजना करितो. तो मनुष्य जहाजें तपासण्याचा धंदा करितो व त्याविषयीं त्याची प्रख्याती आहे. सर्व्हेअर जहाज निवडतांना हयगई करितो, आणि निवडलेलें तारूं समुद्रयानाला अयोग्य ठरतें आणि फुटतें. तर ब अजवळ जवाबदार नाहीं परंतु सर्व्हेअर आहे.

(ब.) अ हा व या सावकाराजवळ कांहीं माल विकावयाला पाठवून देतो. नंतर व अचा माल विकण्याकरितां एका पत असलेल्या लिलांवदाराची योजना करितो, आणि विक्रीचा पैसा वसूल घेण्यास ह्या लिलांवदाराला सांगतो. नंतर लिलांवदार पैशाचा हिशोब देण्यापूर्वींच नादार होतो. तर विक्रीच्या पैशाबद्दल व अजवळ जवाबदार नाहीं.

## वहाल करणें.*

कोणा एका मनुष्याकरितां परंतु त्याच्या अधिकाराशिवाय केलेल्या कृत्यांबद्दल त्याचा हक्क.

वहाल केल्याचा परिणाम.

१९६. जर एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याच्या तर्फे परंतु त्याला न कळतां किंवा त्याच्या अधिकाराशिवाय कांहीं कृत्यें करील, तर तीं कृत्यें वहाल करणें अथवा तीं नाकबूल करणें यांतून त्यानें पाहिजे तें करावें. जर तो वहाल करील, तर तीं त्यानें दिलेल्या अधिकारावरून जर केली असतीं तर त्यांपासून जो परिणाम झाला असता तोच परिणाम होईल.

### विशेष समजुतीची टीप.

जी स्त्री मालक आहे ती मयत झाल्यावर तिचा उत्तराधिकारी वारस या नात्यानें हक्क सांगणाऱ्या एका इसमानें सुमारें तीन लाख रुपयांच्या किंमतीची मिळकत दुसरे एका मनुष्यास रक्कम रुपये ५२६०० यास विकत दिली. तें खरेदीखत झालें त्या तारखेस खरेदी घेणारानें खरेदी देणारास त्या पैकीं रुपये ६०० दिले होते आणि ती मिळकत देण्यासाठीं त्या दोघांनीं मिळून जो दावा केला होता त्या दाव्यास जसजसें यश येत जाईल तसतशा प्रमाणानें बाकीच्या रकमेची फेड करावयाची होती आणि त्या दाव्याचे खर्चा करितां जी रक्कम लागेल ती, खरेदी घेणारानें पुरवावयाची होती.

**ठरावः**—तो व्यवहार राजनीतीच्या विरुद्ध नाहीं आणि खरेदीच्या पैक्याची फेड करण्याबद्दल त्यांत ठराव असल्यामुळें तो व्यवहार निरर्थकही होत नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. २५ पृ. ४२०; न्या. पु. ४३ क. दि. नि. पृ. १३).

वहाली स्पष्ट किंवा गर्भित असूं शकेल.

१९७. वहाल करणें तें स्पष्ट असूं शकेल अथवा ज्या करितां तीं कृत्यें केलीं त्या मनुष्याच्या वर्तणुकीवरून गर्भित समजतां येईल.

---

* वहाल करणें म्हणजे, मंजूर करणें, कबूल करणें.

## उदाहरणें.

(अ.) अला बकरितां माल विकत घेण्याचा अधिकार नसतां अ बकरितां माल विकत घेतो. नंतर ब तो माल आपला असें समजून कला विकतो; तर बच्या वर्तणुकीवरून असें दिसतें कीं त्याजकरितां अनें केलेली खरेदी त्यानें बहाल केली.

(ब.) अ हा बच्या अधिकाराशिवाय, बचा पैसा कला कर्जाऊ देतो. नंतर त्या पैशावर ब कजवळून व्याज घेतो. तर बच्या वर्तणुकीवरून असें समजलें पाहिजे कीं त्यानें अनें दिलेलें कर्ज बहाल केलें.

कायदेशीर बहाली देण्यास माहिती अवश्य असली पाहिजे.

१९८. बहाल करण्याचा प्रसंग असून जें बहाल करावयाचें त्याच्या हकीकतीची जी माहिती बहाल करणारास आहे ती तत्वतः कच्ची असेल आणि तो बहाल करील, तर ती बहाली कायदेशीर होणार नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. या कलमांतील आरंभींचे शब्द 'बहाल करण्याचा प्रसंग असून,' हे फाजील आहेत असें इंग्रजी आक्टावरून दिसतें. या कलमांतील 'कच्ची' या शब्दाचा अर्थ अपुरी असा समजावा, तपशिलवार असा समजूं नये.

२. हिशोब घेण्याबद्दलच्या एका दाव्यांतील हुकुमनाम्यावर उभय पक्षकारांनीं अपिलें केलीं. त्या दोन्हीं अपिलांचा निकाल एका फैसल्यावरून करण्यांत आला. दोन हुकुमनामे तयार करण्यांत आले; परंतु ते वास्तविक रीतीनें एकसारखेच होते; फक्त एका अपिलांतील हुकुमनाम्यावर वादीनें अपील केलें.

ठरावः—दुसऱ्या अपिलांतील हुकुमनाम्यावर त्यानें अपील केलें नाहीं एवढ्याकारणावरून त्याच्या ह्या अपिलास प्रतिबंध येत नाहीं. मरियमनिसा बिबी वि० जिनाब बिबी (इं. ला. री. क. सी. व्हा. ३३ पृ. ११०१) आणि पंचानंद वेलन वि० वेधीनाथ शास्त्री अल (इं. ला. री. म. सी. व्हा. २९ पृ. ३३३) यांतील ठरावास अनुसरून सदहू फैसला करण्यांत आला.

पुढें जें धान्य आम्हाकडे येईल त्याची विक्री आम्हीं करूं असा प्रतिवादींनीं वादीचे एजंट म्हणून वादीशीं करार केला. आपला स्वतःचा माल विकून प्रतिवादींनीं तो करार पुरा केला आणि पुढें तो करार पुरा करण्यासाठीं वादीनें ज्या वेळेस प्रतिवादींकडे धान्य पाठविलें त्या वेळीं प्रतिवादींनीं तें धान्य फायद्यानें विकलें. आम्हीं आपल्या स्वतःचे धान्यानें ते करार पुरे केले आहेत किंवा वादीकडून आलेलें धान्य नफा घेऊन विकलें आहे ही गोष्ट प्रतिवादींनीं वादीस कळविली नाहीं.

ठरावः—वादीनें पाठविलेल्या धान्यावर प्रतिवादींनीं जो फायदा मिळविला आहे तो घेण्याचा वादीस हक्क आहे.

आणखी असाही ठराव झाला कीं, आपल्या करितां धान्य खरेदी करण्याबद्दल मुख्यानें आपल्या गुमास्त्यांस सांगितलें असेल आणि बाजारांत चालू असलेल्या भावाहून जास्त भाव घेऊन त्या गुमास्त्यानें आपलें स्वतःचें धान्य मुख्यास म्हणजे मालकास विकत दिलें असेल तर तो व्यवहार रद्द करण्याचा मालकास हक्क पोंचेल आणि गुमास्ता आपलें स्वतःचें धान्य बाजारभा-

चापेक्षां जास्त भावानें आपणांस विकीत आहे ही गोष्ट मालकास माहीत नसेल तर मालकानें तो व्यवहार मान्य केला आहे असें म्हणतां येणार नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. २९ पृ. ७३०; न्या. पु. ४२ अ. दि. नि. पृ. ४४ ).

अधिकाराशिवाय केलेलें कृत्य कांहीं कामाचा भाग असेल आणि तें कृत्य बहाल केलें तर त्याचा परिणाम.

१९९. कोणा मनुष्याच्या अधिकाराशिवाय त्याच्या तर्फे कांहीं कृत्य केलें गेलें, आणि त्यानें तें मागाहून बहाल केलें तर तें कृत्य ज्या व्यवहाराचा भाग असेल तो सर्व व्यवहार त्यानें बहाल केला असें समजलें पाहिजे.

अधिकार नसतांना केलेलें कृत्य बहाल केलें म्हणून त्याजपासून तिसऱ्या मनुष्याची हानी होऊं नये.

२००. जर एक मनुष्य दुसऱ्या मनुष्यानें अधिकार न देतां त्या दुसऱ्या मनुष्याच्या तर्फे कांहीं कृत्य करील, आणि तें कृत्य असें आहे कीं जर तें अधिकार घेऊन केलें असतें तर त्याच्या कारणानें तिसऱ्या मनुष्यास कांहीं खराबी सोसणें प्राप्त झालें असतें अथवा तिसऱ्या मनुष्याच्या हक्काचा अथवा नफ्यातोट्याच्या संबंधाचा शेवट झाला असतां, तर तें कृत्य बहाल केलें म्हणून त्यापासून तो परिणाम होईल असें समजूं नये.

### उदाहरणें.

( अ. ) बचा कांहीं माल कच्या ताब्यांत आहे. अला बनें मागण्याचा अधिकार दिला नसतां, तो माल बच्या तर्फे म्हणून अ हा कजवळून स्वाधीन करून मागतो. कनें स्वाधीन करून देत नाहीं म्हटलें, तर अनें मागणें केलें तें योग्य केलें, आपणास मान्य आहे, अशी बहाली मागाहून बनें दिली म्हणून क खराबीबद्दल नुकसानी भरून देण्यास पात्र होईल असें नाहीं.

( ब. ) अ हा बचा भाडेकरी आहे. अशी बोली आहे कीं, ३ महिन्यांची नोटीस दिली म्हणजे अनें निघून जावें. कला नोटीस देण्याचा अधिकार नसतां क अला निघून जाण्याची नोटीस देतो. तर ती नोटीस बनें बहाल केली म्हणून अ तिजबद्दल जबाबदार होईल असें नाहीं.

### अधिकार रद्द करणें.

अडतीची समाप्ति.

२०१. अडतीची समाप्ति होणें ती मुख्यानें आपण दिलेला अधिकार रद्द केला म्हणजे होते; अथवा गुमास्त्यानें अडतीचें काम टाकून दिलें म्हणजे होते; अथवा अडतीचें काम पूर्ण झालें म्हणजे होते; अथवा मुख्य आणि गुमास्ता या दोघांतून एक मेला तर अगर वेडा झाला तर होते; अथवा नादार रिणकोस मदत करण्याकरितां विवक्षित काळीं चालू असलेल्या कोणत्याही आक्टांतील ठरावांअन्वयें मुख्य नादार असा ठरविला गेला असेल तर होते.

## विशेष समजुतीची टीप.

आपल्याकरितां कापूस खरेदी करण्याबद्दल प्रतिवादींनीं वादीस पाठविलेलें पत्र वादीस मिळालें. कापूस खरेदी करण्याबद्दलची सूचना रद्द करून दुसऱ्या दिवशीं वादीनें प्रतिवादीस तार पाठविली ती तार पोंचण्यापूर्वीच वादीस आदल्या दिवशींचें पत्र पोंचलें होतें. तुम्हीं पत्रांत लिहिल्याप्रमाणें कापूस खरेदी केल्यानंतर उशिरानें तुमची तार पोंचली, असा वादीनें प्रतिवादीस पत्र पाठवून जबाब दिला. प्रतिवादींची सूचना वादीस पोंचण्यापूर्वी आदलें दिवशीं वादी यानें तिसऱ्या मनुष्याबरोबर केलेल्या कराराअन्वयें वादीनें जो कापूस खरेदी केला होता तोच कापूस प्रतिवादीकरितां म्हणून ठेऊन दिला होता. इतकेंच कायतें वादीनें केलें होतें.

**ठरावः**—आदले दिवशींच्या पत्रांत प्रतिवादींनीं वादी यास जी सूचना केली होती ती दुसऱ्या दिवशींच्या तारेवरून महकूब करण्यांत आली होती.

आणखी असाही ठराव झाला कीं, प्रतिवादींनी केलेली सूचना रद्द करण्यास जेणेंकरून प्रतिवादींस प्रतिबंध येईल अशा प्रकारचा वादीस हक्क उत्पन्न झाला नव्हता, किंवा ज्या अधिकारावरून मालक बांधला जाईल अशा प्रकारचा अधिकार वादीनें चालविला होता असेंही नाहीं; कारण, प्रतिवादींकडून तार पोंचल्यापूर्वी वादीनें तिसरे एकादे मनुष्याबरोबर कापूस खरेदी करण्याविषयीं प्रत्यक्ष करार केला नव्हता.

खऱ्या घडलेल्या गोष्टीचीही प्रतिवादींस माहिती नसल्यामुळें, वादी यास तो कापूस खरेदी करण्याचे व पुन्हां विक्री करण्याचे कामांत झालेल्या नुकसानीबद्दल म्हणून प्रतिवादी यांनीं वादी यास जी कांहीं रक्कम दिली होती तिजबद्दल प्रतिवादींनीं उलट मागणें केलें नव्हतें. तें मागणें करण्याबद्दल कनिष्ठ कोर्टानें प्रतिवादींस परवानगी दिली होती.

**ठरावः**—सदहू रकमेबद्दल उलट मागणें करण्याबद्दल पुरवणी लेखी कैफियत लिहिल्याबद्दल प्रतिवादी यांस कनिष्ठ कोर्टानें परवानगी दिली ती बरोबर आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २४ पृ. ४०३; न्या. पु. ३५ मुं. दि. नि. पृ. २५० ).

अडतीच्या तत्वविषयावर गुमास्त्याचा नफ्यातोट्याचा संबंध असल्यास अडतीची समाप्ति.

**२०२.** जो माल अडतीचा तत्वविषय आहे त्याजवर जर गुमास्त्याचा कांहीं स्वतःच्या नफ्यातोट्याचा संबंध असेल, तर, करार नसल्यास, ती अडती, त्या संबंधास धक्का लागे अशा रीतीनें, समाप्त करितां येणार नाहीं.

### उदाहरणें.

( अ. ) अ हा बला असा अधिकार देतो कीं, त्यानें ( बनें ) अची जमीन विकावी, आणि अजवळून जें त्याचें ( बचें ) कर्ज यावयाचें आहे तें त्या विक्रीच्या पैशांतून फेडून घ्यावें. तर हा अधिकार अ रद्द करूं शकणार नाहीं आणि तो मेला अगर वेडा झाला तरी तो अधिकार नाहींसा होणार नाहीं.

( ब. ) बनें अला कांहीं कापसाच्या तारणावर कर्जाऊ रकमा दिल्या आहेत. त्या कापसाचे १,००० गठ्ठे अ बच्या नांवें पाठवून देतो आणि सांगतो कीं बनें तो कापूस विकावा आणि येईल त्या किंमतींतून त्यानें ( बनें ) आपलें कर्ज फेडून घ्यावें. तर हा अधिकार अ रद्द करूं शकणार नाहीं, आणि तो वेडा झाला अगर मेला म्हणूनही तो नाहींसा होणार नाहीं.

गुमास्त्याचा अधिकार मुख्य केव्हां रद्द करूं शकेल.

**२०३.** मुख्यानें गुमास्त्याला दिलेला अधिकार मुख्य हा जबाबदारीनें बांधला जाई अशा रीतीनें अद्याप वापरला नसेल तर तसा वापरण्यापूर्वी कोणत्याही वेळीं तो अधिकार मुख्य रद्द करूं शकेल; मात्र वर शेवटील कलमांत जो अन्यथा ठराव आहे त्याविषयीं अपवाद समजला पाहिजे.

## विशेष समजुतीची टीप.

प्रतिवादी यानें वादी व वादीचे वंशज यांस आपले वंशपरंपरेचे मुखत्यार नेमून त्यांस एक मुखत्यारपत्राच्या स्वरूपाचें पत्र लिहून देऊन त्यांत असा करार लिहून दिला कीं, एका इनाम गांवांत जो माझा हिस्सा आहे त्या हिश्शाचा सारा वसूल करावा आणि त्यांतून सालीना आपला पगार घेत जावा.

त्या कामांत असा ठराव झाला कीं, या करारास किंमतदार मोबदला असो अगर नसो तो करार ज्या लोकांच्या दरम्यान झाला होता ते लोक जिवंत होते तोंपर्यंत ती नेमणूक कायदेशीर होती व ती दोघांसही मान्य करणें भाग होतें. वादी यानें तें काम करण्याचें पतकरलें हीच गोष्ट त्याच्या नेमणुकीचा मोबदला आहे.

परंतु त्या करारांतील शर्ती एकीकडे ठेवून पाहिलें तर ( आणि ती मुखत्यारी किंमतदार मोबदल्याकरितां उत्पन्न झालेली असो अगर नसो ) सन १८७२ चा आक्ट ९ कलम २०३ यांतील सर्वसाधारण ठरावावरून पाहतां, तो वादीस दिलेला अधिकार रद्द करण्याचा प्रतिवादीस हक्क होता; कारण, साऱ्याच्या रकमेंतून वादी यानें पगार घ्यावा असा जो त्या करारांत ठराव आहे त्याजवरून कलम २०२ यांताल अर्थाप्रमाणें त्या मिळकतींत वादी यास हक्कसंबंध उत्पन्न झाला आहे असें समजतां येत नाहीं.

अयोग्य रीतीनें मुखत्यारपत्र रद्द केलें असतां, करार तोडल्यामुळें झालेल्या नुकसानीबद्दल दावा करून तजवीज करण्याचा मार्ग असतो. सन १८७२ चा आक्ट ९ कलम २०५ यांत असा ठराव आहे कीं, अडत कांहीं काळपर्यंत चालू रहावी असा जर स्पष्ट किंवा गर्भित करार असेल तर तो करार तोडला असतां मुख्यानें गुमास्त्यास नुकसानी भरून दिली पाहिजे.

प्रतिवादी यानें अयोग्य रीतीनें जर तें मुखत्यार रद्द केलें असेल, तर साधारणरित्या करार मोडल्याबद्दल नुकसानी घेण्याकरितां दावा करून वादीस तजवीज करितां येईल, तथापि तो करार विशेष रीतीनें अमलांत आणण्याकरितां व आपल्या पगाराची बाकी घेण्याकरितां जर वादी दावा करील, तर प्रतिवादीनें दिलेल्या वचनास किंमतदार मोबदला नसल्यामुळें प्रतिवादी यानें वादीस लिहून दिलेला करार निरर्थक होईल; परंतु वादी यानें प्रतिवादी करितां खरोखर जें काम व नोकरी केली असेल त्याचे नुकसानीबद्दल मात्र वादी यास प्रतिवादीवर दावा करितां येईल. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ५ पृ. २५३; न्या. पु. १६ मुं. दि. नि. पृ. २०६ ).

गुमास्त्याला दिलेला अधिकार अंशतः वापरला गेला असेल तर तो रद्द करणें.

**२०४.** मुख्यानें गुमास्त्याला दिलेला अधिकार अंशतः वापरला गेला, तर त्या अडतीच्या संबधानें केलीं गेलीं अशीं जीं कृत्यें त्यापासून उत्पन्न होणाऱ्या कृत्यांपुरता आणि जबाबदाऱ्यांपुरतां तो अधिकार मुख्य रद्द करूं शकणार नाहीं.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा बला असा अधिकार देतो कीं, बनें आपल्यासाठीं ( असाठीं ) १,००० गठ्ठे कापूस खरेदी करावा आणि अचा पैसा बजवळ शिल्लक आहे त्यांतून कापसाची किंमत द्यावी. नंतर ब १,००० गठ्ठे कापूस खुद्द आपल्या नांवानें घेतो, कीं जेणेंकरून तो किंमतीबद्दल स्वतः जबाबदार होईल. तर कापसाची किंमत देणें यासंबंधानें पाहिलें असतां अ हा बचा अधिकार रद्द करूं शकणार नाहीं.

( ब. ) अ बला असा अधिकार देतो कीं, बनें आपल्यासाठीं ( असाठीं ) १,००० गठ्ठे कापूस खरेदी करावा आणि अचा पैसा बजवळ शिल्लक आहे त्यांतून कापसाची किंमत द्यावी. नंतर ब १,००० गठ्ठे कापूस अच्या नांवानें विकत घेतो, कीं जेणेंकरून तो ( ब ) स्वतः त्याच्या किंमतीबद्दल जबाबदार होत नाहीं. तर कापसाची किंमत देण्याविषयीं बचा अधिकार अ हा रद्द करूं शकेल.

मुख्यानें अडत रद्द केल्यास अगर गुमास्त्यानें ती टाकून दिल्यास नुकसानी भरून देणें.

२०५. अडत कांहींएक काळपर्यंत चालू रहावी असा जर स्पष्ट किंवा गर्भित करार असेल, तर, पुरतें कारण नसतां ती अडत मुख्यानें पूर्वी रद्द केल्यास अगर अडतीचें काम गुमास्त्यानें पूर्वींच टाकून दिल्यास मुख्यानें गुमास्त्याची किंवा गुमास्त्यानें मुख्याची, जसें असेल त्याप्रमाणें, नुकसानी भरून दिली पाहिजे.

मुख्यानें रद्द केल्यास अगर गुमास्त्यानें टाकून दिल्यास खबर देणें.

२०६. अशा रीतीनें अडत मुख्याला रद्द करावयाची असल्यास अगर गुमास्त्यास टाकून द्यावयाची असल्यास योग्य खबर दिली पाहिजे; नाहीं तर त्यामुळें मुख्याची अगर गुमास्त्याची खराबी होईल ती, जसें असेल त्याप्रमाणें, एकानें दुसऱ्यास भरून दिली पाहिजे.

रद्द करणें अगर टाकून देणें तें स्पष्ट किंवा गर्भित असूं शकेल.

२०७. अडत मुख्यानें रद्द करणें ती किंवा गुमास्त्यानें टाकून देणें ती स्पष्ट शब्दांनीं रद्द केली जाऊं किंवा टाकिली जाऊं शकेल, किंवा अनुक्रमानें मुख्य अगर गुमास्ता यांच्या वर्तणुकीवरून तसा गर्भित अर्थ समजतां येईल.

## उदाहरण.

अ हा आपलें घर भाड्यानें देण्याचा अधिकार बला देतो. नंतर तें घर अ हा स्वतःच भाड्यानें देतो. तर येणेंकरून बचा अधिकार रद्द केला असा गर्भित अर्थ समजावयाचा.

## विशेष समजुतीची टीप.

प्रतिवादी ब आणि र यांनीं ता. ६ डिसेंबर सन १८९५ रोजीं एक हमीपत्र लिहून दिलें. " एन. सी. मुकर्जी " नांवच्या पेढीवर ब हा जोंपर्यंत खजीनदाराचें काम करीत राहील तोंपर्यंत तो इमानानें व विश्वासानें काम करील अशाबद्दल व यास र हा जामीन राहिला होता. सन १८९६ चे जुलै महिन्यांत त्या पेढीच्या घटनेंत वदल झाला व पुढें ती पेढी " एन. मुकरजी आणि सन " नांवानें प्रसिद्ध झाली. जानेवारी सन १८९७ आणि मे सन १९०० यांचे दरम्यान म्हणजे, तें हामीपत्र ज्या सालांत लिहून देण्यांत आलें त्या सालानंतर पुढील सालांत जी " एन. मुकरजी आणि सन " नांवाची नवीन पेढी स्थापन झाली त्या पेढींत ब नोकरी करीत असतां, बनें हिशेबांत कांहीं घोटाळा केला आहे असें आढळून आलें. नवीन पेढींतील लोकांनीं त्या हामीपत्रावरून प्रतिवादीवर दावा केला. आम्हावर दावा करण्यास वादीस दाव्याचें कारण उत्पन्न झालें नाहीं अशी प्रतिवादींनीं तक्रार केली.

**ठरावः**—ब यानें हिशेबांत जो घोटाळा केला असें म्हणणें आहे तो घोटाळा होण्यापूर्वींच त्या पेढीच्या घटनेंत वदल झाला असल्यामुळें रनें दिलेली हामी कराराच्या आक्टाचें कलम २६० वरून रद्द झाली आहे असें समजलें पाहिजे. " एन. मुकरजी आणि सन " या नव्या पेढीच्या नोकरींत असतांना बनें तो घोटाळा केला असून, " एन. सी. आणि मुकरजी " नांवाच्या पेढीच्या नोकरींत असतांना त्यानें तो केला नव्हता आणि याजकरितां त्या हामीपत्रांतील शर्ती मोडल्या आहेत असें होत नाहीं; सबब प्रतिवादींनीं केलेली हरकत मान्य केली पाहिजे व हा दावा रद्द केला पाहिजे. ( इं. ला. री. क. सी. व्हा. २८ पृ. ५९७; न्या. पु. ३६ क. दि. नि. पृ. २३ व २४ ).

गुमास्त्याच्या संबंधानें पाहिलें असतां आणि तिसऱ्या मनुष्यांच्या संबंधानें पाहिलें असतां, गुमास्त्याच्या अधिकाराची समाप्ति केव्हां होते.

२०८. गुमास्त्याचा अधिकार नाहींसा झाल्यास, गुमास्त्याचे संबंधानें पाहिलें असतां, त्या अधिकारची समाप्ति त्याला कळेपर्यंत ती झाली असें समजावयाचें नाहीं, अथवा तिसऱ्या मनुष्यांच्या संबंधानें पाहिलें असतां तीं समाप्ति त्यांजला कळेपर्यंत ती झाली असें समजावयाचें नाहीं.

### उदाहरणें.

( अ. ) अ हा आपला माल विकण्यास बला सांगतो आणि माल विकून जी किंमत येईल त्यांतून शेंकडा पांच टक्के दस्तुरी बला देण्याचें कबूल करितो. नंतर अ पत्र लिहून बचा अधिकार रद्द करितो. पत्र रवाना झाल्यावर परंतु तें बला पोंचण्यापूर्वीं ब तो माल १०० रुपयांस विकतो. तर ही विक्री अनें कबूल केली पाहिजे, आणि बला पांच रुपये दस्तुरी मिळाली पाहिजे.

( ब. ) अ मद्रासेहून बला पत्र लिहितो कीं, मुंबई येथें वखारींत कांहीं कापूस आहे तो आपल्यासाठीं ( असाठीं ) विकावा. मागाहून बचा विकण्याचा अधिकार अ रद्द करितो, आणि कापूस मद्रासेला पाठविण्याविषयीं लिहितो. बला दुसरें पत्र पोंचल्यावर सदर्हू कापूस विकण्याबद्दल तो कशीं करार करितो. कला पहिलें पत्र माहीत होतें, पण दुसरें पत्र माहीत नव्हतें. क, बला किंमत देतो,

आणि ती घेऊन ब पळून जातो. अ विरुद्ध अशासंबंधानें पाहिलें असतां कजवळून पैसा पोंचला असें समजलें पाहिजे.

( क. ) अ हा ब या आपल्या गुमास्त्याला कला कांहीं पैसा देण्याविषयीं हुकूम करितो. इतक्यांत अ मरून जातो, आणि अच्या मृत्युपत्राला ड हा प्रोबेट काढतो. अ मेल्यानंतर पण त्याच्या मरणाची बातमी बला कळण्यापूर्वी ब कला तो पैसा देतो. तर ड या मृत्युलेख चालविणाऱ्या विरुद्ध अशासंबंधानें पाहिलें असतां बजवळून पैसा पोंचला असें समजलें पाहिजे.

## विशेष समजुतीच्या टिंपा.

१. ता. ५ जानेवारी सन १९०१ ते ता. २५ आक्टोबर सन १९०३ पर्यंत वादीच्या दुकानाचा हाजी उस्मान बरोबर व्यवहार होता. हाजी उस्मानचा व्यवहार त्याचा गुमास्ता बघत होता. मार्च सन १९०३ च्या सुमारास हाजी उस्मान मयत झाला, ही गोष्ट वादीस माहीत नव्हती. ता. २ जून सन १९०३ रोजीं, हाजी उस्मानच्या गुमास्त्यानें वादीस एक पत्र लिहिलें. पत्रांत पुढील मजकूर होताः " पैसे येणें आहेत असें तुम्हीं म्हणतां; योग्य हिशोब घेतल्यावर जें येणें निघेल तें मला कबूल आहे. तुह्मीं कांहीं काळजी करूं नये. " ता. ३० मे सन १९०६ रोजीं, वादीनें हिशोबावरून येणें निघत असलेली रक्कम मिळण्याबद्दल हाजी उस्मानच्या मिळकतीच्या व्यवस्थापकावर दावा लावला.

कराराचा आक्ट ( सन १८७२ चा आक्ट ९ ) कलमें २०८ व २०९ प्रस्तुतच्या कज्जास लागू पडत आहेत. गुमास्त्याकडे असलेले अधिकार संपले असले तरी, मुख्य मयत झाला आहे ही गोष्ट माहीत नसल्यामुळें, व गुमास्त्याकडे असलेल्या हितसंबंधाचें रक्षण करण्याबद्दल आपल्या मयत मुख्याकरितां योग्य उपाय योजणें हें कराराचा आक्ट कलम २०९ अन्वयें गुमास्त्याचें कर्तव्य असल्यामुळें, गुमास्त्याचे अधिकार ता. २ जून सन १९०३ पूर्वी संपले नाहींत. ( इं. ला. रि. मुं. सी. व्हा. ३५ पृ. ३०२; न्या. पु. ४६ मुं. दि. नि. पृ. १६७ ).

२. एखादा दस्तऐवज करून दिला आहे ही गोष्ट कबूल करण्याचा एजंटाचा अधिकार, जर तो दस्तऐवज नोंदण्याचे अगोदर रद्द करण्यांत आला असेल, व तो अधिकार रद्द केल्याची गोष्ट, ज्या इसमास तो दस्तऐवज करून दिला त्या इसमास किंवा रजिस्टर करणारे अम्मलदारास कळली नसेल, तर, तो दस्तऐवज, जरी अधिकार रद्द केल्यानंतर एजंटानें नोंदविला असेल तरी, त्यामुळें तो दस्तऐवज अव्यवहारोपयोगी होत नाहीं. ( इं. ला. रि. क. सी. व्हा. ३० पृ. २६५; न्या. पु. ३८ क. दि. नि. पृ. ८ ).

**मुख्य मेल्यानें अथवा वेडा झाल्यानें अडत समाप्त झाल्यास गुमास्त्याचें कर्तव्य.**

२०९. जर मुख्य मेल्यानें अगर वेडा झाल्यानें अडत समाप्त होईल, तर जे नफ्यातोट्याचे संबंध गुमास्त्याचे हवालीं केलेले असतील त्यांच्या संरक्षणासाठीं व बचावासाठीं जें इलाज करणें योग्य असेल ते सर्व गुमास्त्यानें, मयत मुख्यांचे वारसांच्या तर्फे केलें पाहिजेत.

२१०. गुमास्त्याचा अधिकार समाप्त झाला म्हणजे त्यानें नेमलेल्या सर्व पोट

पोट गुमास्त्यांच्या अधिकाराची समाप्ति.

गुमास्त्यांचा अधिकार ( गुमास्त्याचा अधिकार समाप्त होण्याविषयीं जे नियम यांत सांगितले आहेत त्या नियमांस पात्र अशा रीतीनें ) त्यामुळें समाप्त होतो.

## गुमास्त्याचें मुख्याशीं कर्तव्य.

मुख्याचें काम चालवितांना गुमास्त्याचें कर्तव्य.

२११. गुमास्त्याला मुख्यानें हुकूम दिला असेल त्याप्रमाणें मुख्याचें काम गुमास्त्यानें चालविणें भाग आहे, अथवा जर तसा हुकूम नसेल; तर गुमास्ता ज्या ठिकाणीं तें काम चालवीत असेल त्या ठिकाणीं तसल्या प्रकारचें काम चालविण्याची जी चाल असेल त्या चालीप्रमाणें त्यानें चालविलें पाहिजे. जर गुमास्ता अन्यथा चालेल, आणि कांहीं तोटा झाला, तर तो त्यानें मुख्याला भरून दिला पाहिजे, आणि जर कांहीं फायदा होईल तर त्याबद्दल त्यानें हिशोब दिला पाहिजे.

### उदाहरणें.

( अ. ) अ हा बचा गुमास्ता आहे. तो जें काम चालवितो त्या कामाच्या संबंधानें अशी चाल आहे कीं, हातांत शिल्लक असलेला पैसा वेळोवेळीं व्याजानें लावावा, आणि अ हा पैसा तशा प्रकारें व्याजी लावीत नाहीं. तर तशा प्रकारें व्याजीं लावल्यानें जें व्याज नेहमीं येतें तें अनें बला भरून दिलें पाहिजे.

( ब. ) ब हा एक दलाल आहे. आणि तो करतो त्या कामाच्या संबंधानें उधार माल विकण्याची चाल नाहीं, असें असून तो अचा माल कला उधार विकतो त्या वेळीं कची पत मोठी होती. नंतर किंमत देण्यापूर्वीं क नादार होतो. तर बनें अचा तोटा भरून दिला पाहिजे.

गुमास्त्यानें चातुर्य आणि हुषारी खर्च केली पाहिजे.

२१२. गुमास्ता जें काम चालवीत असेल तशा प्रकारचें काम करीत असणाऱ्या मनुष्यांच्या अंगीं साधारणपणें जेवढें चातुर्य असतें तेवढ्या चातुर्यानें अडतीचें काम त्यानें चालविलें पाहिजे, मात्र त्याच्या अंगीं चातुर्य नसल्याविषयीं त्याच्या मुख्यास माहीत असेल तर ती गोष्ट निराळी; गुमास्त्यानें नेहमीं योग्य हुषारीनें चाललें पाहिजे; आणि त्याच्या अंगीं जेवढें चातुर्य असेल तेवढें त्यानें खर्च करीत असलें पाहिजे; आणि त्यानें स्वतः केलेल्या हयगयीचे, त्याच्या अडाणीपणाचे, अथवा गैरवागणुकीचे जे प्रत्यक्ष परिणाम त्याजबद्दल त्यानें आपल्या मुख्याला नुकसानी भरून दिली पाहिजे; परंतु त्याच्या हयगयीपासून, अडाणीपणापासून अथवा गैरवर्तणुकीपासून जो तोटा किंवा जी खराबी अप्रत्यक्ष रीतीनें किंवा पारंपर्यानें झाली असेल तिजबद्दल त्यानें नुकसानी भरून द्यावयाची नाहीं.

## उदाहरणें.

(अ.) अ या कलकत्त्यांतील सावकाराचा ब हा लंडन येथें गुमास्ता आहे. अला हुंडी करून पाठविण्याकरितां अबद्दल बजवळ कांहीं पैसा जमा झाला आहे. व तो पैसा फार वेळ ठेवून घेतो. आणि तो पैसा येऊन न पोंचल्यामुळें अ नादार होतो. तर ब हा त्या पैशाबद्दल, आणि तो ज्या दिवशीं पोंचता करणें योग्य होतें त्या दिवसांपासून नेहमींच्या दराप्रमाणें जें व्याज त्या व्याजाबद्दल, आणि त्या शिवाय जो दुसरा प्रत्यक्ष संबंधाचा तोटा—म्हणजे, उदाहरणार्थ, हुंडावळीच्या दरांत फेरफार झाल्यानें झाला तो—त्याजबद्दल, जबाबदार आहे; परंतु या शिवाय त्यानें कांहीं देणें नाहीं.

(ब.) अ हा माल विकण्याकरितां एक गुमास्ता आहे. त्याला उधार विकण्याचा अधिकार असल्यामुळें तो बला कांहीं माल उधार विकतो, परंतु ब पतवाला आहे किंवा नाहीं, याविषयीं योग्य आणि साधारण तपास करावयाचा तो तो करीत नाहीं. ती विक्री झाली त्या वेळीं ब नादार झाला होता. तर त्यामुळें कांहीं तोटा झाला असेल त्याबद्दल अनें आपल्या मुख्याची नुकसानी भरून दिली पाहिजे.

(क.) अ या विमेदलालास ब एक तारवावरील विमा उतरण्याचें काम करण्यास नेमतो. परंतु विमेचिठ्ठींत जीं साधारणपणें कलमें असतात तीं अ हा घालविण्यास वर्जितो. मागाहून त्या तारवाचा नाश होतो. तीं कलमें विमेचिठ्ठींत नसल्यामुळें विमा उतरणाऱ्यांकडून कांहींच पैसा मिळूं शकत नाहीं; तर अनें बचा तोटा भरून देणें भाग आहे.

(ड.) अ हा इंग्लंडांतील सावकार ब या आपल्या मुंबईंतील गुमास्त्यास (ब ती गुमास्तगिरी पतकरतो) अमूक एका तारवावरून १०० गठ्ठे कापूस आपणास (अला) पाठवावयाला सांगतो. बऱ्यानें कापूस पाठविला असता असें असून तो पाठवीत नाहीं. नंतर जहाज इंग्लंडाला सुखरूपपणें पोंचतें. जहाज पोंचल्यावर लवकरच कापसाचा भाव चढतो. तर जहाज येऊन पोहोंचलें त्या वेळीं शंभर गठ्ठे कापूस आला असता तर अला त्यामुळें जो फायदा झाला असता तितका बनें अला भरून दिला पाहिजे; परंतु त्या नंतर आणखी भाव चढल्यामुळें जो त्याचा फायदा झाला असता तो भरून द्यावयाचा नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

वादी हे धान्याचा व्यापार करीत असत, प्रतिवादी हा कराची येथें कमिशन एजंट होता. आपल्या करितां कांहीं धान्य खरेदी करण्याबद्दल वादीनें प्रतिवादीस सांगितलें. प्रतिवादीनें त्याप्रमाणें धान्य खरेदी केलें, व वादीनें त्याबद्दल प्रतिवादीकडे कांहीं रक्कम पाठविली. वादीच्या सांगण्याप्रमाणें विकत घेतलेल्या मालाची रिसीट व्ही. पी. नें पाठविण्यांत आली. कांहीं चुकीमुळें ती रिसीट

आली नाहीं. वादीनें आपणांस जी रक्कम द्यावयाची बाकी राहिली आहे ती दिल्याशिवाय रेलवे कंपनीनें वादीस माल देऊं नये, असें प्रतिवादीनें रेलवे अधिकाऱ्यांस कळविलें. वादीनें बाकी राहिलेली रक्कम प्रतिवादीच्या दिल्ली येथील गुमास्त्याकडे भरली. प्रतिवादीच्या संमत्तीशिवाय माल देण्याचें हथरस येथील रेलवे अधिकाऱ्यांनीं नाकारिलें, व यामुळें माल मिळण्यास उशीर झाला. मध्यंतरी, जे धान्य विकत घेतलें होतें त्याची किंमत कमी झाली, व त्यांत वादीचें नुकसान झालें. वादीनें नुकसान भरून मिळण्याकरितां हथरस येथें दावा लावला.

**ठरावः**—प्रतिवादीची हयगय व गैरवर्तन यामुळें जे प्रत्यक्ष नुकसान झालें तें भरून मिळण्याकरितां कराराचा आक्ट कलम २१२ अन्वयें प्रस्तुतचा दावा आणलेला आहे. दाव्याचें कारण कराची येथें घडलें असल्यामुळें, हथरस कोर्टांत दावा चालणार नाहीं. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ३४ पृ. ४९; न्या. पु. ४७ अ. दि. नि. पृ. ५ व ६).

गुमास्त्याचे हिशोब.

**२१३.** मुख्यानें हिशोब मागितल्यावर ते गुमास्त्यानें यथायोग्य दिले पाहिजेत.

गुमास्त्यानें आपल्या मुख्याला कळविण्याविषयीं त्याचें कर्तव्य.

**२१४.** अडचणीचे प्रसंग येतील तेव्हां गुमास्त्यानें आपल्या मुख्याला कळविण्यास आणि त्याचा हुकूम काय आहे तो जाणून घेण्यास जेवढी योग्य हुषारी असेल तेवढी सर्व खर्च केली पाहिजे.

जेव्हां गुमास्ता मुख्याची राजी न घेतां अडतीच्या कामी आपल्या स्वतः करितां लेवादेवी करील तेव्हां मुख्याचा हक्क.

**२१५.** जर गुमास्ता अडतीच्या कामांत आपल्या स्वतःबद्दल कांहीं व्यवहार करील आणि तसें करण्यास आपल्या मुख्याची राजी पूर्वीं न घेईल आणि त्या व्यवहाराविषयीं ज्या तात्विक गोष्टी खुद्द त्याला माहीत झाल्या असतील त्या सर्व पूर्वीं मुख्याला न कळवील, तर, गुमास्त्यानें कांहीं तात्विक गोष्ट आपल्या पासून लबाडीनें गुप्त ठेविली आहे, अथवा गुमास्त्याच्या लेवादेवी आपणांस गैरफायद्याच्या झाल्या आहेत असें जर दिसून येईल, तर गुमास्त्यानें जो व्यवहार केला असेल तो मुख्य नाकबूल करूं शकेल.

## उदाहरणें.

(अ.) अ, बला आपली (अची) इस्टेट विकावयाचा हुकूम देतो. ब ती इस्टेट कच्या नांवानें आपल्या स्वतःकरितां विकत घेतो. तर बनें ती इस्टेट आपल्याकरितां विकत घेतली असें अला समजल्यावर, अ हा जर असें दाखवूं शकेल कीं, बनें एकादी तात्विक गोष्ट लबाडीनें गुप्त ठेविली अथवा ती विक्री आपल्या गैरफायद्याची आहे, तर अ हा ती विक्री नाकबूल करूं शकेल.

(ब.) अ, बला आपली (अची) इस्टेट विकावयाचा हुकूम देतो. ती विकण्यापूर्वीं बनें तपासून पाहिली तेव्हां तींत एक खाण असल्याचें बला समजतें.

ती खाण अला माहीत नाहीं. ब, अला कळवितो कीं, ती इस्टेट आपण विकत घेण्यास इच्छितो, परंतु खाणीचा शोध लागला ती गोष्ट अपासून गुप्त ठेवितो. खाण असल्याविषयीं माहिती नसल्यामुळें, अ, बला विकत घेऊं देतो. तर इस्टेट विकत घेतेवेळीं खाणीविषयीं बला ठाऊक होते असा अला शोध लागल्यावर, त्याच्या मर्जीस येईल त्याप्रमाणें तो विक्री नाकबूल किंवा मान्य करूं शकेल.

## विशेष समजुतीची टीप.

**गुमास्त्यानें अन्यमिषानें केलेला करार.**—इंग्लंडांतील कायद्याप्रमाणें एखाद्या गुमास्त्यानें आपण स्वतः व्यवहार करीत आहों ही गोष्ट लपऊन ठेवून स्वतः मुख्यावरोवर करार केल्यास मुख्यास ही गोष्ट कळून आल्यानंतर करार रद्द करण्याचा अधिकार असतो. कपट झालें होतें किंवा नाहीं, अगर ह्या व्यवहार मुख्यास फायदेशीर होता किंवा नाहीं, या प्रश्नास कांहीं महत्व नसतें. कराराच्या आक्टाचें कलम २१५ प्रमाणें असा व्यवहार रद्द होण्यास गुमास्त्यानें महत्वाची गोष्ट छपऊन ठेवली असली पाहिजे अगर ह्या व्यवहार प्रत्यक्ष मुख्याच्या गैरफायद्याचा झाला असला पाहिजे. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४५ पृ. १००५; न्या. पु. ५७ म. दि. नि. पृ. ३५).

गुमास्त्यानें अडतीच्या कामांत आपल्या स्वतःसाठीं व्यवहार केल्यानें नफा होईल त्याजवर मुख्याचा हक्क.

२१६. अडतीच्या कामांत आपल्या मुख्यासाठीं व्यवहार करावा तसा न करितां जर गुमास्ता मुख्याला न कळतां स्वतः आपल्या करितां व्यवहार करील, तर त्या व्यवहारापासून जो नफा झाला असेल तो गुमास्त्यापासून आपणास मिळावा असें मागणें करण्याचा हक्क मुख्यास आहे.

## उदाहरणें.

अ आपल्या ब या गुमास्त्यास आपल्यासाठीं अमूक एक घर विकत घेण्याचा हुकूम करितो. ब, अला सांगतो कीं, तें विकत मिळत नाहीं, आणि तें घर ब आपल्या करितां विकत घेतो. तर बनें तें घर विकत घेतलें ही गोष्ट अला समजल्यावर अ हा बनें जितक्या किंमतीस तें विकत घेतलें तितक्या किंमतीस आपणास विकत द्यावें असें भाग पाडूं शकेल.

## विशेष समजुतीच्या टिपा.

गुमास्तेपणासंबंधींचा व्यवहार असून, गुमास्त्यानें सदर्हू व्यवहार आपल्या मुख्याकरितां न करितां व मुख्यास न कळतां आपल्या नांवावर केला असेल तर सदर्हू व्यवहाराचा फायदा गुमास्त्यापासून मागण्याचा हक्क, कराराचा आक्ट कलम २१६ वरून मुख्यास देण्यांत आला आहे सदर्हू हक्क वजावण्याची अथवा न वजावण्याची मोकळीक मुख्यास आहे.

एकाद्या इसमानें एकादा व्यवहार मान्य केला असल्यास त्यानें सदर्हू व्यवहाराबद्दलचे फायदे व बोजे दोन्ही उचलले पाहिजेत असा कायदा आहे. त्या इसमास व्यवहाराचा स्वीकार व धिःकार एकदम करितां येणार नाहीं. मुख्यानें जो व्यवहार मान्य केला असेल त्या व्यवहाराची निष्पत्ती म्हणून फायदे व तोटे दोन्ही व्यवहारांत सामील केले पाहिजेत.

एखाद्या मुख्यानें ठरलेल्या किंमतीस आपला माल विकण्याकरितां एखादा गुमास्ता नेमला असेल, व सदर्हू गुमास्ता मुख्याची संमत्ती न घेतां आपण स्वतः तो माल खरेदी करील, तर कराराचा आक्ट कलम २१५ मधील शर्तीप्रमाणें तो व्यवहार नाकबूल करण्याचा अथवा मान्य करण्याचा अधिकार मुख्यास आहे. मुख्यानें सदर्हू व्यवहार मान्य केल्यास, खरेदीच्या व्यवहारावद्दल जी रक्कम द्यावयाची असेल तेवढीच रक्कम गुमास्त्यास देण्याबद्दलची मुख्यावर पात्रता आहे; म्हणजे, विकणारा या नात्यानें जी रक्कम कराराअन्वयें खरेदीदारास द्यावयाची तेवढीच रक्कम द्यावयाची मुख्यावर पात्रता आहे; कारण, विकत देणाराचा व विकत घेणाराचा संबंध त्याजमध्यें आहे असें मान्य करण्यांत आलें आहे. मुख्य व गुमास्त्याचा संबंध व खरेदी देणार व खरेदी घेणार यांचा संबंध या दोन भिन्न संबंधाचें नियमन करण्याकरितां, गुमास्तेगिरीबद्दल झालेल्या करारांत सदर्हू रक्कम सामील केली असल्यास, गुमास्त्यास सदर्हू रक्कम मिळण्याचा हक्क पोंचत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३४ पृ. २९२; न्या. पु. ४५ मुं. दि. नि. पृ. १६९ व १७० ).

मुख्याकरितां आलेल्या रकमांतून पैसा ठेऊन घेण्याचा गुमास्त्याचा हक्क.

**२१७.** गुमास्त्यानें अडतीचें काम चालवितांना पैसा पदरचा खर्च केला अथवा त्याला योग्य कांहीं खर्च आला त्याबाबद जें त्याचें येणें असेल आणि गुमास्तेपणा केल्यावद्दल जी दस्तुरी त्याला द्यावयाची असेल, तितका पैसा, अडतीच्या कामांत मुख्यासाठीं आलेल्या कोणत्याही रकमांतून, गुमास्ता ठेऊन घेऊं शकेल.

मुख्याचा जमा झालेला पैका गुमास्त्यानें आपल्या मुख्यास दिला पाहिजे.

**२१८.** अशा रीतीनें रकमा वजा करावयाच्या त्या करून, मुख्याकरितां जमा झालेला बाकीचा सर्व पैसा गुमास्त्यानें आपल्या मुख्याला दिला पाहिजे.

## विशेष समजुतीची टीप.

सच्या मिळकतीचा रिसीव्हर या नात्यानें वादीनें ता. ११ जुलै सन १८९८ रोजीं प्र-
तिवादी याजवर रक्कम रुपये २८०८८१३८२ घेण्यासाठीं दावा केला. सन १८९४ चे जाने-
वारीपासून ता. ११ जुलै सन १८९८ पर्यंत प्रतिवादीकडे मंडाले येथील भाड्यानें असलेल्या घरा-
बद्दलच्या भाड्याची रक्कम आणि सचे एजंट या नात्यानें प्रतिवादीनें विकलेल्या मालाची किंमत
अशीं मिळून सदर्हू रक्कम प्रतिवादीकडे येणें होती. लेटर्सपेटंटचें कलम १२ अन्वयें तो दावा
करण्याबद्दल वादीनें कोर्टाची परवानगी घेतली होती. हा दावा घेण्याचा कोर्टास अधिकार नाहीं;
कारण, सदर्हू दाव्याचें कारण किंवा त्याचा कांहीं भाग कलकत्ता येथें उत्पन्न झालेला आहे असें
फिर्यादअर्जावरून दिसून येत नाहीं; किंवा कलकत्ता येथें दाव्याचें कारण उत्पन्न झालें आहे अशा-
बद्दल वादीस पुरावा देतां येत नाहीं, कारण तसें केल्यानें दाव्याचे कारणांत फरक केल्याप्रमाणें
होणार आहे आणि याजकरितां कोर्टाची नवीन परवानगी घ्यावी लागेल व तशी परवानगी या
दाव्यांत देतां येत नाहीं, अशी प्रतिवादीनें तक्रार केली.

ठरावः—हा दावा घेण्याचा कोर्टास अधिकार आहे आणि कलकत्ता येथें दाव्याचें कारण
उत्पन्न झालें आहे असें दाखविण्यासाठीं दाव्याचे चौकशीचे वेळेस पुरावा देण्याचा वादीस हक्क
आहे. तसा पुरावा घेतला असतां आणि जरूर पडल्यास, कलकत्ता येथें दाव्याचे कारणाचा
कांहीं भाग उत्पन्न झालेला आहे, असा मजकूर फिर्यादअर्जांत घालून फिर्यादअर्जी दुरुस्त केली
असतां दाव्याच्या मूळच्या कारणांत कांहीं फेरफार केला असें होत नाहीं. सदर्हू दावा कोर्टा-

समोर चौकशीकरितां निघेल त्यावेळेस, दाव्याचें कारण किंवा त्याचा कांहीं भाग कलकत्ता येथें उत्पन्न झालेला आहे असें दाखविलें असतां वस्त होईल.

प्रतिवादीनें आणखी अशीही तक्रार केली आहे कीं, सन १८९४ चे जुलै महिन्याचे अगोदरच्या भाड्यावद्दल वादीनें केलेल्या मागण्यास मुदतीची हरकत आली आहे आणि आम्हीं जी मालाची विक्री केली ती सन १८९४ चे जून महिन्याच्या अगोदर पुरी झाली असल्यामुळें त्या विक्रीच्या पैक्यावद्दल वादीनें केलेल्या मागण्यासही मुदतीची हरकत आली आहे.

त्याजवर वादीनें असा जवाव दिला कीं, ह्या दाव्याच्या पूर्वी ३ वर्षांचे आंत प्रतिवादीनें हिशेब आम्हांकडे पाठवून त्यांतील रकमा देण्याचें कवूल करून आम्हांकडे पत्रें पाठविलीं आहेत. त्या पत्रांतील त्याची कबुली, भाड्यावद्दलच्या दाव्याची मुदत सुरू राहण्यास पुरे आहे आणि त्यानें केलेली विक्री सन १८९४ च्या जून महिन्यांत जरी पुरी झाली होती तरी त्या मालाच्या किंमतीवद्दलचा हिशेब देईपर्यंत त्याचा एजंटपणा वंद झाला नव्हता व तसे हिशेब त्यानें अद्यापही दिले नाहींत.

**ठरावः**—तीन वर्षांच्या मागील भाड्यावद्दलच्या वादीच्या मागण्यास मुदतीची हरकत आली नाहीं. प्रतिवादीनें आपली पात्रता पत्रांत कवूल केली असल्यामुळें मुदतीची बचत झाली आहे; पक्षकारांचे दरम्यान हिशेब चालू आहेत असें कवूल करण्यांत आलें आहे व ते हिशेब घेण्याचा अजून वादीस हक्क आहे.

आणखी असाही ठराव झाला कीं, प्रतिवादी हा वादीस हिशेब देईपर्यंत वादीचा एजंट या नात्यानें हिशेब देण्यास पात्र आहे आणि याजकरितां मालाच्या विक्रीची किंमत घेण्यावद्दलच्या मागण्यास मुदतीची हरकत आली नाहीं. ( इं. ला. री. क. सी. व्हा. २६ पृ. ७१५; न्या. पु. ३४ क. दि. नि. पृ. २७ व २८ ).

गुमास्त्याची दस्तुरी केव्हां देणें होतें.

२१९. विशेष कांहीं करार नसेल, तर, गुमास्त्यानें कोणतेंही कृत्य केल्याबद्दल त्याला देणगी देणें ती तें कृत्य पूर्ण होईपर्यंत देण्यास योग्य होत नाहीं; परंतु गुमास्त्याजवळ विकण्याकरितां दिलेला सर्व माल विकला गेला नसला तरी, अथवा विक्री वस्तुतः पूर्ण झाली नसली ,तरी, विकलेल्या मालाबद्दल जो पैसा गुमास्त्याजवळ जमा झाला असेल तो पैसा ठेवून घेऊं शकेल.

ज्या कामांत गुमास्त्यानें गैर वर्तणूक केली असेल त्याजबद्दल त्याला दस्तुरी मागण्याचा हक्क नाहीं.

२२०. ज्या गुमास्त्यानें अडतीच्या कामांत गैर वर्तणूक केली असेल, त्याला कामाच्या ज्या भागाविषयीं त्यानें गैर वर्तणूक केली, त्याबाबद कांहीं दस्तुरी मागण्याचा हक्क नाहीं.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा कपासून एक लक्ष रुपये वसूल करण्याकरितां आणि ते चांगल्या तारणावर व्याजी लावण्याकरितां बला नेमतो, व तें एक लक्ष रुपये वसूल करितो आणि ९०,००० रुपये चांगल्या तारणावर देतो, परंतु १०,००० रुपये

अशा तारणावर देतो कीं, तें तारण वाईट आहे असें समजण्यास त्याला मार्ग होता. त्यामुळें अचे २,००० रुपये बुडतात. तर बला १,००,००० रुपये वसूल केल्याबद्दल आणि ९०,००० रुपये व्याजीं लावल्याबद्दल दस्तुरी दिली पाहिजे. परंतु १०,००० रुपये व्याजी लावल्याबद्दल त्याला कांहीं मिळणार नाहीं; त्यानेंच २,००० रुपये अचे भरून दिले पाहिजेत.

( ब. ) अ हा बला कपासून १,००० रुपये वसूल करण्याला नेमतो. बच्या गैर वर्तणुकीमुळें पैसा वसूल होत नाहीं. तर बनें केलेल्या कामाबद्दल त्याला कांहीं दस्तुरी देणें नाहीं, आणि त्यानें तोटा भरून दिला पाहिजे.

मुख्याच्या मालावर आणि कागदपत्रांवर गुमास्त्याचा लियन.

२२१. गुमास्त्याजवळ मुख्याचा माल, कागदपत्र, आणि दुसरी जंगम अथवा स्थावर जिंदगी आली असेल ती, दस्तुरीबद्दल, पदरचा खर्च केल्याबद्दल, आणि त्यांजविषयीं त्यानें खर्च केलेल्या मेहनतीबद्दल त्याला जें यावयाचें असेल तें त्याला दिलें जाईतोंपर्यंत अथवा त्याचा त्याला हिशेब मिळेपर्यंत, अन्यथा कांहीं करार नसेल, तर अटकावून ठेवण्याचा हक्क त्याला आहे.

### विशेष समजुतीची टीप.

चालू खर्चाकरितां पैसे अगाऊ देण्याचा करार केल्यावरून एखाद्या कंपनीनें एजंटाकडे ( गुमास्त्याकडे ) त्या कंपनीच्या मिळकतीचा कबजा असेल तर, कांहीं विरुद्ध प्रकारचा करार नसल्यास, त्यानें खर्च केलेल्या रकमाबद्दल त्या मिळकतीवर कराराचे आक्टाचें कलम १२१. वरून त्याचा हक्क राहील, आणि त्याच्या त्या तारणाचा कबजा काढून घेण्याचा, कंपनीच्या आक्टाचें कलम १४९ वरून कोर्टास अधिकार पोंचणार नाहीं. ( इं. ला. रि. म. सी. व्हा. ३१ पृ. १२३; न्या. पु. ४३ म. दि. नि. पृ. १२ ).

### मुख्याचें गुमास्त्याशीं कर्तव्य.

गुमास्त्यानें केलेल्या कायदेशीर कृत्यांच्या परिणामापासून त्याला तोटा होऊं नये असा बंदोबस्त ठेविला पाहिजे.

२२२. गुमास्त्याला दिलेला अधिकार गुमास्ता चालवीत असतांना त्यानें केलेलीं जीं कायदेशीर कृत्यें त्यातून कोणत्याही कृत्याच्या परिणामापासून गुमास्त्याला तोटा सोसावा लागू नये असें गुमास्त्याला नेमणाऱ्यानें केलें पाहिजे.

### उदाहरणें.

( अ. ) ब हा सिंगापूर येथें आहे आणि अ कलकत्ता येथें आहे. ब कांहीं माल कच्या स्वाधीन करून देण्याविषयीं अच्या हुकुमावरून कशीं करार करितो. अ बला पाठवावयाचा माल पाठवीत नाहीं, आणि करार मोडल्याबद्दल क बवर दावा आणितो. ब अला सदहू दाव्याविषयीं कळवितो आणि त्या दाव्याचा उत्तरपक्ष चालविण्याविषयीं अ हा बला अधिकार देतो. ब उत्तरपक्ष चालवितो, पण

बनें नुकसानी आणि खर्च भरून द्यावा असें ठरतें. आणि बला दुसरा खर्च लागतो. तर बनें भरून दिलेल्या नुकसानीबद्दल, खर्चाबद्दल, आणि बला आलेल्या खर्चाबद्दल अ बजवळ जबाबदार आहे.

( ब. ) ब हा कलकत्ता येथें एक दलाल आहे आणि अ हा तेथेंच एक सावकार आहे. अच्या हुकुमावरून ब करितां १० पिंपें तेल खरेदी घेण्याबद्दल ब हा कशीं करार करितो. मागाहून अ तें तेल घेत नाहीं म्हणतो, आणि क बवर दावा आणितो. ब त्याजविषयीं अला कळवितो, पण अ हा तो करार अगदींच नाकबूल करितो. ब दाव्याचा उत्तरपक्ष चालवितो. पण त्याला कची खराबी आणि खर्च भरून द्यावा लागतो, आणि स्वतः खर्च करावा लागतो. तर बनें भरून दिलेल्या खराबीबद्दल, खर्चाबद्दल आणि बला आलेल्या खर्चाबद्दल अ हा बजवळ जबाबदार आहे.

## विशेष समजुतीची टीप.

**एजंटाची नुकसानभरपाई.**—ई ॲण्ड को हे कमिशन एजंट्स होते. त्यांनीं प्रतिवादीबरोबर एक करार केला. या कराराप्रमाणें प्रतिवादींच्या करितां व प्रतिवादींच्या जोखमीवर कांहीं विशिष्ट माल खरेदी घेऊन जहाजांतून रवाना करण्याचें ई ॲण्ड कंपनीनें कबूल केलें होतें. ई ॲण्ड कोनें हा माल सी. आय. एफ. शर्तींच्या करारावर एका जर्मन जहाजांतून पाठऊन दिला. माल वाटेंत असतां लढाई सुरूं झाल्यामुळें ठरलेल्या वेळेपेक्षां बऱ्याच उशिरानें सदर माल ज्या स्थलीं जावयाचा होता त्या स्थलीं आला. प्रतिवादींनीं माल घेण्याचें नाकारिल्यामुळें ई ॲण्ड कोचे लिक्विडेटर वादी यानें सदहू माल विकला व करार मोडल्यामुळें नुकसानभरपाईबद्दल प्रतिवादींवर दावा लावला. प्रतिवादींनीं आपणांवर नुकसानभरपाईची जबाबदारी नाहीं अशी तक्रार केली.

**ठरावः**—ई ॲण्ड को ही प्रतिवादींचे कमिशन एजंट असल्यामुळें करारांतील विशेष शर्तीप्रमाणें व कराराच्या आक्टाचें कलम २२२ मध्यें गुमास्त्याच्या संबंधाचा जो सर्वसाधारण फायदा घालून दिला आहे त्याप्रमाणें करार मोडल्याबद्दल नुकसानभरपाई मिळण्याचा हक्क ई ॲण्ड कोस आहे. ( इं. ला. री. म. सीं. व्हा. ४१ पृ. १०६०; न्या. पु. ५३ म. दि. नि. पृ. ५८ ).

गुमास्त्यानें इमानानें केलेल्या कृत्यांच्या परिणामापासून त्याचा तोटा न व्हावा असें केलें पाहिजे.

**२२३.** जर एक मनुष्य कांहीं कृत्य करण्याकरितां दुसऱ्या मनुष्याला नेमील, आणि तो गुमास्ता तें कृत्य इमानानें करील, तर त्या कृत्याच्या परिणामापासून गुमास्त्याचा तोटा होऊं नये असें करण्याची जबाबदारी नेमणाऱ्यावर आहे. मग त्या कृत्यापासून तिसऱ्या मनुष्यांच्या हक्कास धक्का लागला म्हणून चिंता नाहीं.

## उदाहरणें.

( अ. ) अला हुकुमनामा मिळाला आहे आणि बच्या मालावर टांच आणण्याचा हक्क त्याला आहे. तो कांहीं माल बचा आहे असें कोर्टाच्या अम्मलदा-

शास सांगून त्याजकडून त्या मालाची जप्ती करवितो. कोर्टाचा अम्मलदार माल जप्त करितो आणि त्यामुळें मालाचा खरा मालक क हा त्यावर दावा आणितो. तर अचा हुकूम मानिल्यामुळें जी रक्कम कोर्टाच्या अम्मलदारानें कला देणें भाग पडलें त्याबद्दल कोर्टाच्या अम्मलदाराचा तोटा भरून देण्यास अ हा पात्र आहे.

( ब. ) ब हा अच्या ताब्यांत असलेला पण जो विकण्याचा हक्क अला नाहीं असा कांहीं माल, अच्या सांगण्यावरून विकतो. अला हक्क नाहीं हें बला ठाऊक नाहीं, आणि विक्रीनें आलेला पैसा ब अच्या हवालीं करितो. नंतर क हा त्या मालाचा खरा मालक, बवर दावा आणितो आणि मालाची किंमत आणि खर्च बकडून भरून घेतो. तर जें कांहीं कला देणें बला भाग पडलें आणि जो बला स्वतः खर्च आला त्याजबद्दल बचा तोटा भरून देण्यास अ पात्र आहे.

गुन्ह्याचें कृत्य करण्यास नेमलेल्या गुमास्त्याला नेमणारा तोट्याबद्दल जबाबदार नाहीं.

२२४. जें कृत्य करणें म्हणजे गुन्हा केला असें होतें असें कृत्य करण्याला जर एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याला नेमील, तर त्या कृत्याच्या परिणामापासून त्याला होणारा तोटा नेमणारा भरून देण्यास पात्र नाहीं, मग तसा तोटा भरून देण्याविषयीं स्पष्ट किंवा गर्भित वचन दिलेलें असलें म्हणून चिंता नाहीं.

## उदाहरणें.

( अ. ) अ हा कला मारण्याकरितां बला नेमतो, आणि त्या कृत्यापासून बला होणाऱ्या परिणामाची हमी देण्याचें कबूल करितो. त्यामुळें ब कला मारतो, आणि त्याबद्दल कला खराबी भरून देण्याचें बला भाग पडतें. तर ती बची नुकसानी भरून देण्यास अ हा पात्र नाहीं.

( ब. ) ब हा एक वर्तमानपत्राचा मालक, अच्या सांगण्यावरून, आपल्या वर्तमानपत्रांत अब्रू घेणारा असा मजकूर क विरुद्ध छापतो, आणि तो छापल्यामुळें बचा तोटा होईल, आणि त्या संबंधानें दावा होऊन जो कांहीं खर्च आणि जी कांहीं नुकसानी भरून देणें बला भाग पडेल तिजबद्दल बचा तोटा आपण भरून देईन अशी अ हा कबुलायत करितो. बवर क दावा आणितो, आणि खराबी भरून देणें बला भाग पडते, व त्यालाही स्वतःचा खर्च येतो. तर अनें जी हमी घेतली होती तिजवरून तो बला जबाबदार नाहीं.

मुख्याच्या हयगयीनें गुमास्त्याला झालेल्या हानीबद्दल नुकसानी भरून देणें.

२२५. मुख्याच्या हयगयीनें अथवा अडाणीपणानें गुमास्त्याची जी हानी होईल तिजबद्दल मुख्यानें त्याचें नुकसान भरून दिलें पाहिजे.

### उदाहरण.

अ हा बला एक घर बांधण्याला गवंड्याचे कामीं लावितो, आणि आपणच परांची उभारतो. परांची अडाणीपणानें उभारल्यामुळें बला दुखापत होते. तर अची बनें नुकसानी भरून दिली पाहिजे.

### तिसऱ्या मनुष्याशीं केलेल्या करारांवर अडतीचा परिणाम.

गुमास्त्यानें केलेले जे करार ते अमलांत आणणें आणि त्यांचें परिणाम.

२२६. जे करार गुमास्त्याच्या द्वारें केले असतील ते, आणि गुमास्त्यानें केलेल्या कृत्यांपासून निष्पन्न होणाऱ्या ज्या जबाबदाऱ्या त्या, ते करार आणि तीं कृत्यें मुख्यानें जर जातीनें केलीं असतीं तर ज्या रीतीनें अमलांत आणल्या गेल्या असत्या आणि त्यांचे कायद्यासंबंधीं जे परिणाम झाले असते, त्याच रीतीनें अमलांत आणतां येतील आणि त्यांचे कायद्यासंबंधीं तेच परिणाम होतील.

### उदाहरणें.

(अ.) अ हा बजवळून माल विकत घेतो. ब हा तो माल विकण्याकरितां गुमास्ता आहे, असें अला ठाऊक आहे, परंतु त्याचा मुख्य कोण हें अला ठाऊक नाहीं. तर मालाची किंमत अजवळून मागण्याचा हक्क आहे तो बच्या मुख्याला आहे. आणि मुख्यानें अवर किंमतीबद्दल दावा आणिल्यास, बकडून आपलें कर्ज यावयाचें आहे तें या किंमतींतून आपण वजा करून घेतों असें अनें म्हटलें तर तें चालणार नाहीं.

(ब.) अ हा बचा गुमास्ता आहे, आणि बच्या तर्फे पैसा घेण्याचा अधिकार त्याला आहे. बला द्यावयाची एक रक्कम कनें आणून दिली तीं अनें घेतली. तर सदहू रक्कम बला देण्याची जबाबदारी कवर होती तिजपासून तो मुक्त झाला.

जर गुमास्ता आपले अधिकाराचे बाहेर जाईल तर त्याचा मुख्य कोठपर्यंत जबाबदार समजावयाचा.

२२७. गुमास्त्याला जेवढें करावयाचा अधिकार असेल त्याहून जर तो जास्त करील, आणि केलेल्याचा त्यांच्या अधिकारांतील भाग त्याच्या अधिकारांत नसलेल्या भागापासून जर निराळा करावयाला येत आहे, तर त्यानें केलेल्याचा जितका भाग त्याच्या अधिकारांतला असेल तितकाच भाग, तो गुमास्ता आणि त्याचा मुख्य यांच्या मधील संबंधानें पाहिलें असतां बांधणारा असा होतो.

### उदाहरण.

अ हा एका जहाजाचा आणि त्यावरील बारदानाचा मालक आहे. तो तारबाचा ४,००० रुपये किंमतीवर विमा उतरवून घेण्याविषयीं बला अधिकार देतो.

व जहाजाबद्दल ४,००० रुपयांचा विमा उतरवितो, आणि त्याजवरील बारदानावर तेवढ्याच रकमेचा विमा उतरवितो. तर जहाजाच्या विम्याबद्दल प्रीमियम अनें दिली पाहिजे, परंतु बारदानाचे विम्याबद्दल द्यावयाला नको.

## विशेष समजुतीची टीप.

**नोकरांचे कृत्याबद्दल रेलवे कंपनीची जबाबदारी.**—वादीनें ता. ३० मे सन १९१७ रोजीं ईस्ट इंडियन रेलवे कंपनीच्या कानपूर येथील कलेक्टरगंज पार्सल कचेरीमध्यें चायनीज फटाकड्याच्या चार पेट्या प्यासेंजर गाडीनें स्वतःच्या नांवावर अलाहाबाद येथें पाठविण्याकरितां हजर केल्या. सदर माल प्यासेंजर गाडीनें पाठवितां येईल अगर नाहीं याजबद्दल कंपनीच्या पार्सल कचेरीमधील नोकरांत प्रथम थोडा वादविवाद झाला; परंतु अखेरीस हें पार्सल स्वीकारण्यांत आलें. माल पाठविणारानें पार्सलच्या दराप्रमाणें रेलवे भाडें दिलें व त्यांस रिसीट देण्यांत आली ती तो घेऊन गेला. माल पाठविणारा ऑफिसमधून गेल्यानंतर सदहू माल प्यासेंजर गाडीनें आपणांस पाठवितां येत नाहीं असें रेलवे कंपनीच्या नोकरांनीं ठरविलें व माल तेथेंच थांबवून ठेवला. वादीस ता. ५ जूनच्या शब्बारात उत्सवाकरितां हा माल जरूरीनें पाहिजे होता. माल न आल्यामुळें वादीनें रेलवे कंपनीच्या निरनिराळ्या अम्मलदारांस तारा केल्या व त्यांजबरोबर पत्रव्यवहार केला. सदहू माल प्यासेंजर गाडीनें पाठवितां येत नाहीं व तो कानपूरला पडून राहिला आहे असा वादीस अखेरीस कंपनीकडून जबाब मिळाला. अखेरीस ता. २३ जूनला मालगाडीनें हा माल पाठविण्यांत आला व तो ता. २८ ला अलाहाबादेस पोंचला. रेलवे भाड्याबद्दल रुपये १९८९ देऊन माल घेऊन जाण्याबद्दल वादीस कळविण्यांत आलें; परंतु, वादीनें कोणतीच गोष्ट करण्याचें नाकारल्यामुळें रेलवे कंपनीनें ता. २८ सप्टेंबर सन १९१७ रोजीं रुपये ३१ ला सदहू माल विकला. वादीनें रेलवे कंपनीवर मालाची किंमत, नुकसानी व या व्यवहारांतील इतर कांहीं बाबी मिळून एकंदर रुपये ९०५–५–० चा दावा लावला.

**ठरावः**—प्यासेंजर गाडीनें सदहू माल पाठविण्याचें कबूल करून स्वीकारण्यांत रेलवे कंपनीच्या कानपूर येथील नोकरांनीं आपल्या अधिकाराबाहेर वर्तन केलें असलें तरी, रेलवे कंपनी व वादी यांचे दरम्यान कायदेशीर रीतीनें पूर्ण असा करार झालेला आहे. सदहू माल फक्त मालगाडीनें पाठवितां येईल ही गोष्ट जेव्हां नजरेस आली तेव्हां शक्य तितक्या त्वरेनें मालगाडीनें सदर माल पाठविणें हें रेलवे कंपनीचें काम होतें. ता. ५ जूनला माल आपणांस पाहिजे आहे ही गोष्ट वादीनें रेलवे कंपनीस कळविली नसल्यामुळें ता. ५ जूनच्या पूर्वी माल वादीस न दिल्यामुळें विशेष नुकसानी भरून देण्याची जबाबदारी रेलवे कंपनीवर नाहीं.

**ठरावः**—कंपनीच्या गुमास्त्यांनीं चुकीनें अथवा बरोबर रीतीनें रुपये ३८८ भाडें घेऊन पाठविण्याकरितां माल स्वीकारला असल्यामुळें अधिक रुपये १६८१ ची मागणी करण्याचा व सदहू रक्कम न दिल्यामुळें माल अटकाऊन ठेवण्याचा रेलवे कंपनीस अधिकार नव्हता. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४३ पृ. ६२३; न्या. पु. ५६ अ. दि. नि. पृ. ४६ व ४७).

**२२८.** गुमास्त्याला जेवढें करावयाचा अधिकार असेल त्याहून जर तो ज्यास्त करील, आणि तो जें आपल्या अधिकाराच्या मर्यादेच्या पलीकडे करील तें अधिकाराच्या आंत असलेल्या पासून जर निराळे करितां येत नाहीं तर, तो व्यवहार मान्य करणें हें मुख्यास भाग नाहीं.

जर गुमास्त्यानें आपल्या अधिकाराबाहेर केलें तें निराळे करितां येत नसेल तर मुख्य जबाबदार नाहीं.

## उदाहरण.

अ आपल्यासाठीं ( असाठीं ) ५०० मेंढरें विकत घेण्याचा अधिकार बला देतो. ब ५०० मेंढरें विकत घेतो आणि २०० कोंकरेंही त्यांजबरोबर खरेदी करितो आणि दोन्हींला मिळून एक ठोक ६,००० रुपये किंमत देतो. तर हा सगळा व्यवहार अमान्य करण्याचा अधिकार अला आहे.

२२९. गुमास्त्याला जर कांहीं खबर दिली अथवा त्याला कांहीं माहिती मिळाली, आणि मनुष्याकरितां तो चालवीत असलेलें काम चाललें असतांना जर ती दिली असेल अथवा मिळाली असेल, तर ती मुख्याला दिली असती अथवा मुख्याला मिळाली असती आणि तिजपासून जे कायद्यासंबंधीं परिणाम झाले असते, तेच मुख्य आणि तिसरीं मनुष्यें यांच्या मधील संबंधानें पाहिलें असतां, तिजपासून होतील.

गुमास्त्याला खबर दिली असतां तिचे परिणाम.

## उदाहरणें.

( अ. ) बनें अला कजवळून कांहीं माल विकत घेण्याकरितां नेमिलें आहे. त्या मालाचा क हा दर्शनीं मात्र मालक आहे. आणि अ त्याप्रमाणें माल विकत घेतो. विक्रीविषयीं बोलाचाली चालली असतांना अला समजतें कीं, मालाचा खरोखर मालक ड हा आहे, परंतु बला ती गोष्ट ठाऊक नाहीं. तर कपासून बला कांहीं कर्ज यावयाचें आहे त्या ऐवजीं या मालाची किंमत वजा करून घेतो असें म्हणण्याचा हक्क बला नाहीं.

( ब. ) बनें अला कजवळून कांहीं माल विकत घेण्याकरितां नेमिलें आहे, त्या मालाचा क हा मालक असल्याविषयीं दिसत मात्र आहे. अची तशी नेमणूक होण्यापूर्वी अ हा कचा नोकर होता, आणि त्या वेळीं त्याला असें समजलें होतें कीं, मालाचा खरोखर मालक ड हा आहे, आणि ती गोष्ट बला ठाऊक नाहीं. तर बच्या गुमास्त्याला ती माहिती आहे तरी, कजवळून बला कांहीं यावयाचें आहे त्यांत या मालाची किंमत वजा करून घेतो असें ब म्हणूं शकेल.

२३०. तशाविषयीं कांहीं करार नसेल तर, गुमास्त्यानें आपल्या मुख्याच्या तर्फे केलेले करार गुमास्ता आपल्या स्वतः करितां अमलांत आणूं शकणार नाहीं, आणि त्या कराराची जबाबदारीही स्वतः त्याच्यावर नसतें.

गुमास्त्यानें मुख्यातर्फे केलेले करार गुमास्ता आपल्या स्वतः करितां अमलांत आणूं शकत नाहीं आणि तो त्याजवरून स्वतः बांधला जात नाहीं.

'तशाविषयीं कांहीं करार नसेल तर' असें सदरीं म्हटलें आहे तो करार खालीं लिहिलेल्या प्रसंगीं असतो असें ग्रहण केलें पाहिजे.

अन्यथा करार आहे असें केव्हां ग्रहण करावें.

(१) जेव्हां एकाद्या सावकाराकरितां कांहीं माल विकण्याबद्दल अथवा विकत घेण्याबद्दल गुमास्त्यानें करार केला आहे आणि तो सावकार देशांतरीं रहात आहे तेव्हां:

(२) जेव्हां गुमास्ता आपल्या मुख्याचें नांव सांगत नसेल तेव्हां:

(३) जेव्हां मुख्याचें नांव समजलें तरी त्यावर दावा आणतां येत नाहीं तेव्हां.

## विशेष समजुतीच्या टिपा.

एका घराचा कबजा घेण्यासाठीं आणि भाड्याची बाकी घेण्यासाठीं वादीनें प्रतिवादीवर दावा केला. लंडन येथें असलेल्या आंग्लो जुईस असोसिएशननें मुंबई येथें चालू ठेवलेल्या वेनीइझ-रायल स्कुलाकडे तें घर आहे व त्या स्कुलाचा मी आनररी सेक्रेटरी आहे व सेक्रेटरी या नात्यानें तें घर मी भाड्यानें घेतलें असून खाजगी रीतीनें तें मी भाड्यानें घेतलें नाहीं व त्या स्कुलाचें भाडें किंवा खर्च मी आपल्या स्वतःच्या पैशांतून कधीं केला नाहीं; सबब त्या भाड्याबद्दल जातीनें पात्र नाहीं, अशी प्रतिवादीनें तक्रार केली.

ठरावः—तें भाडें देण्यास प्रतिवादी पात्र आहे. प्रतिवादीनें आपले खेरीज दुसरे कोणा-करितां तें घर भाड्यानें घेतलं होते असें कोणत्याही गोष्टीवरून दिसून येत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २२ पृ. ७५४; न्या. पु. ३३ मुं. दि. नि. पृ. २५९).

२. कराराचा आक्ट कलम २३० (२) अन्वयें गुमास्त्यास करारावरून दावा लावतां येण्यास, ज्या मुख्याकरितां त्यानें करार केला असा गुमास्ता असला पाहिजे, मग असा मुख्य आहे असें कळविलें नसलें तरी हरकत नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. ३९ पृ. ८०२; न्या. पु. ४७ क. दि. नि. पृ. २२).

३. ठरावः—दलाल हा फक्त मध्यस्थ इसम असतो. तो विक्री करणारा गुमास्ता नसतो व त्याजवर कराराचा आक्ट कलम २३० (२) प्रमाणें पात्रता येत नाहीं. दलाल व खरेदी घेणारा यांचे दरम्यान जर कांहीं करार होत असेल तर तो नोकरीचा करार होय व ती नोकरी म्हणजे दुसऱ्याकरितां व्यवहार घडवून आणण्याची खटपट करणें ही होय, विकणें माल ही नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४२ पृ. १०५०; न्या. पु. ५० क. दि. नि. पृ. ३७ व ३८).

४. वादी यानें पी. आणि कंपनी यांस साखरेच्या किंमतीचे दर लिहून पाठविण्याबद्दल टे-लिग्राफ केला. (ज्या एका कंपनीची नोंदलेली कचेरी इंग्लंडांत होती, परंतु जी इंडियांत काम धंदा करीत असे, त्या कंपनीच्या गुमास्त्याचें काम पी. आणि कंपनी करीत असे.) नुसते दर लिहून पी. आणि कंपनीनें वादीस जवाब पाठविला. वादीनें ते दर कबूल केले आणि त्या कंपनी-कडे अनामत ठेवण्याकरितां रक्कम पाठविली. दुसरे दिवशीं पी. आणि कंपनी यांनीं विक्रीच्या शर्तींची यादी पोटीं ठेवून वादीस एक पत्र लिहिलें. त्या पत्रावर व यादीवर त्या कंपनीचें छापील नांव होतें व त्याचे खालीं गुमास्ते या नात्यानें पी. आणि कंपनी यांनीं सह्या केल्या होत्या. ती साखर स्वाधीन होण्यास उशीर लागल्यामुळें वादीनें ती अनामत ठेविलेली रक्कम आणि नुक-सानी घेण्यासाठीं पी. आणि कंपनी यांजवर हल्लींचा हा दावा केला. ज्यापेक्षां आम्हीं नुसते गुमास्ते आहों त्यापेक्षां हा दावा आमचे जातीवर चालत नाहीं, अशी तक्रार करून पी. आणि कंपनी यांनीं लेखी कैफियत दिली.

ठरावः—( १ ) जो करार तोडल्याबद्दल हल्लींचा हा दावा झाला आहे तो करार विक्रीच्या शर्तींच्या यादींत पद्धतशीर रीतीनें दाखल केलेला आहे.

( २ ) मुख्य कंपनी देशांतरी राहते आणि याजकरितां कराराच्या आक्टाचें कलम २३० वरून पाहतां, प्रतिवादी हे जरी त्या कंपनीचे गुमास्ते आहत तरी त्या करारावरून प्रतिवादी जातांनें नुकसानी देण्यास पात्र आहेत, असें अनुमान निघतें.

( ३ ) हे कायद्याचें अनुमान रद्द करितां येतें आणि देशांतरी राहणारा जो मुख्य त्यास त्या लेखी करारांत पक्षकार केलें असलें तर आणि त्याचे नांवानें तो करार केला असला तर सदरीं लिहिलेलें नुकसान रद्द होतें. ( इं. ला. री. म. सी. व्हा. २७ पृ. ३१५; न्या. पु. ३९ म. दि. नि. पृ. २६ व २७ ).

गुमास्त्यानें करार केला आणि तो गुमास्ता आहे असें उघड न झालें तर पक्षकारांचे हक्क.

२३१. जर कोणी गुमास्ता कोणा मनुष्याबरोबर कांहीं करार करील, आणि त्या मनुष्यास हा गुमास्ता आहे असें ठाऊक नसेल अथवा तसा संशय घेण्यास कारणही नसेल, तर तो करार पुरा झाला पाहिजे असें त्याचा मुख्य मागणें करूं शकेल; परंतु जर गुमास्ता हाच मुख्य असता तर त्या करारांतील दुसऱ्या पक्षकारास गुमास्त्याविरुद्ध अशा नात्यानें जे हक्क असते तेच हक्क त्या पक्षकारास मुख्याविरुद्ध अशा नात्यानें असतील.

करार होऊन जाण्यापूर्वी जर मुख्य प्रगट होईल, तर करारांतील दुसरा पक्षकार मी करार पुरा करीत नाहीं असें म्हणूं शकेल; मात्र त्याला असें दाखवितां आलें पाहिजे कीं, त्या करारामध्यें मुख्य कोण आहे हें जर आपणास समजलें असतें, अथवा गुमास्ता हा मुख्य नव्हे असें जर आपणास समजलें असतें, तर त्या करारास आपण पक्षकार झालों नसतों.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. मुख्याचें नांव उघड न करितां गुमास्त्यानें करार केला असतां त्या बाबतींत मुख्याचे हक्क काय असतात व तिऱ्हाईत इसमाचें हक्क काय असतात अशाबद्दल कराराच्या आक्टाचें कलम २३१ यांत ठराव केलेले आहेत. सामान्य स्वरूपाचा ठराव पहिल्या रकमेंत केलेला आहे आणि तो गुमास्ता जर मुख्य असता तर त्याचे विरुद्ध जे हक्क त्या तिऱ्हाईत इसमास प्राप्त झाले असते ते हक्क उघड न केलेल्या मुख्याविरुद्ध त्या तिऱ्हाईत इसमास प्राप्त होतात, असा नियम ठरविलेला आहे. तो करार पुरा होण्यापूर्वी जर मुख्यानें आपणास प्रगट केलें तर, त्या बाबतींतील हक्काबाबद दुसरे रकमेंत ठराव केलेला आहे. दुसरे रकमेचा निर्बंध पहिल्या रकमेवरून होतो असें मानून ती दुसरी रकम वाचली पाहिजे.

कराराच्या आक्टाचें कलम २३१ यांत, स्वतःस प्रगट करितो—अशा अर्थाचे जे शब्द आहेत त्यांचा अर्थ तंतोतंत रीतीनें केला पाहिजे.

ज. ब्याचलरः—मुख्यानें आपणास प्रगट केलें तर त्या बाबतींत, करार मोडण्याचा जो तिऱ्हाईत इसमास हक्क दिलेला आहे तो हक्क, मुख्याला प्रगट करण्याचें कृत्य कोणी तिऱ्हाईत इसमानें केलें एवढ्यामुळें किंवा ती बातमी त्याला इतर मार्गांनीं कळली एवढ्यामुळें, नाकारण्यांत

मेळे नये, असें आग्रहपूर्वक ह्मणण्यांत आलेलें आहे; परंतु ती तक्रार माझ्या मनास समाधानकारक वाटत नाहीं. त्या तिऱ्हाईत इसमाचा आत्मवत विश्वास अथवा खात्री कोणत्याही प्रकारची असली तथापि, एथवर गुप्त असलेला मुख्य उघड स्थितींत येऊन करारापासून होणाऱ्या फायद्यावर आपला हक्क सांगेपर्यंत करार चुकविण्याचा त्या तिऱ्हाईत इसमास हक्क प्राप्त होत नाहीं, असें म्हणतां येईल; आणि करारावर तो मुख्य ह्मणविणारा इसम हक्क सांगतो किंवा नाहीं, अशाविषयीं त्यास अवाहन करणें त्या तिऱ्हाईत इसमास भाग पडलें तथापि त्याचें त्यांत विशेष नुकसान होण्यासारखें नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३२ पृ. ३५६; न्या. पु. ४३ मुं. दि. नि. पृ. १४५ व १४६).

२. **गुमास्ता नात्यानें करार केल्याचें शाबीत करण्याचा प्रयत्न.**—प्रतिवादीनें स्वतः एका करारावर सही करून दिली होती. या करारावरून लावलेल्या दाव्यांत आपण सदहू करार गुमास्ता या नात्यानें करून दिलेला आहे व कराराचें वेळीं मुख्याचें नांव जाहीर करण्यांत आलें होतें असें दर्शविणारा पुरावा दाखल करण्याचा प्रयत्न प्रतिवादीतर्फे करण्यांत आला.

**ठरावः**—करार करून देणाऱ्या इसमावर येणारी जबाबदारी नष्ट करण्याकरितां असा पुरावा ग्राह्य होत नाहीं; कारण, या पुराव्यामुळें लेखावरून जो करार झाल्याचें शाबीत होत आहे त्यापेक्षां अन्य करार सदर कराराचे जागीं आणून ठेवल्याप्रमाणें होईल. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४५ पृ. १२४२; न्या. पु. ५६ मुं. दि. नि. पृ. ९८).

*गुमास्ता असून तो मुख्य आहे अशा समजुतीनें त्याजबरोबर केलेल्या कराराची पूर्तता.*

**२३२.** जर एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याशीं करार करील आणि तो दुसरा मनुष्य गुमास्ता आहे असें त्याला ठाऊक नसेल अथवा तसा संशय घेण्यास त्याला योग्य कारण नसेल, तर, करार पुरा झाला पाहिजे असें मुख्य मागणें करूं लागल्यास, त्या कराराची पूर्तता होणें ती, तो गुमास्ता आणि त्या करारांतील जो दुसरा पक्षकार यांच्यामध्यें असणारे जे हक्क आणि ज्या जबाबदाऱ्या त्यांस पात्र अशीच मात्र होईल.

## उदाहरण.

अ यानें बचें ५०० रुपये द्यावयाचे आहेत. अ हा बला १,००० रुपये किंमतीचे तांदूळ विकतो. या व्यवहारात अ हा कचा गुमास्ता म्हणून काम करीत आहे. परंतु तसें असल्या विषयीं बला माहिती नाहीं व तसा संशय घेण्यास त्याला योग्य कारण नाहीं, तर बनें तांदूळ घ्यावें, परंतु अनें त्याचे (बचें) जें कर्ज द्यावयाचें तें त्या किंमतींतून बनें वजा करूं नये असें क हा बला भाग पाडूं शकणार नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

प्रतिवादी हा धोलरा येथील राहणारा असून त्यानें सुंदरजी केशवजी याच्या पेढीस मुंबई येथें आपली गुमास्तेगिरी करण्याचें काम सांगितलें होतें. त्याजवरून त्या गुमास्त्यांनीं प्रतिवादीबरोबर हिशेब सुरू केला म्हणजे, आपले येथें त्याचें खातें सुरू केलें. सुंदरजी केशवजी हा जो माल प्रतिवादीकरितां खरेदी करी त्या मालाची किंमत प्रतिवादीचे नांवें लिहीत असे आणि त्याज-

करितां जो माल विकी त्याची किंमत व प्रतिवादीकडून ज्या हुंड्या वगैरे येत त्या प्रतिवादीच्या नांवें जमा करीत असे. प्रतिवादीकडून लिहून आल्यावरून सुंदरजी केशवजी यानें ता. २३ मार्च सन १८७९ रोजीं वादीपासून २०,००० नारळ व ता. २४ मार्च सन १८७९ रोजीं १०,१६० नारळ आणि ता. २७ मार्च सन १८७९ रोजीं २६,६२६ नारळ, याप्रमाणें खरेदी केले. याप्रमाणें प्रत्येक खरेदी झाली त्यावेळस, नारळ स्वाधीन झाले म्हणजे किंमत द्यावयाची याप्रमाणें सुंदरजी केशवजी यानें करार केला होता. सुंदरजी यानें हे करार केले त्यावेळेस तो मुख्य म्हणून करार करीत नसून प्रतिवादीचा गुमास्ता म्हणून करार करीत आहे असें वादी यास माहीत नव्हतें, किंवा असें मानण्याचें कांहींएक कारणही नव्हतें. त्यापैकीं पहिल्या दोन खरेदींचे नारळ ३०,१६० 'लक्ष्मीप्रसाद' नांवाचे जहाजावरून ता. २७ व २८ मार्च सन १८७९ रोजीं आणि तिसऱ्या खरेदीचे नारळ २६,६२६ 'लालसाडी' नांवाच्या जहाजावरून ता. २९ मार्च सन १८७९ रोजीं धोलरा येथें रवाना झाले. ते सर्व नारळ प्रतिवादी यास पोंचले व प्रतिवादी यानें सुंदरजी याजकडे हुंडी पाठविली. त्या हुंडींतून त्या सर्व नारळांची किंमत वजा जातां प्रतिवादी याचे सुंदरजी याजकडे रुपये १,७२७ शिल्लक राहिले. प्रतिवादी यानें त्या हुंड्या प्रामाणिकपणानें केल्या व त्या सर्व सुंदरजी यास मिळाल्या. वादी यानें त्या नारळाची किंमत सुंदरजीच्या नांवें लिहिली; कारण, या व्यवहारांत सुंदरजी खेरीज दुसरा कोणी मनुष्य मुख्य आहे, असें वादी यास माहीत नव्हतें. या नारळाच्या व्यवहारांत प्रतिवादी हा मुख्य आहे असें वादी यास ता. ४ एप्रिल रोजीं कळून आलें म्हणून वादी यानें प्रतिवादीवर हा दावा आणिला. प्रतिवादी यानें अशी तक्रार केली कीं, खरेदी करण्याचे कामांत आमची पत तारण लावून देण्याचा सुंदरजी यास मी कधींही अधिकार दिला नव्हता, व हा दावा होण्याचे अगोदरच सदर्हू नारळांच्या किंमतीचा पैसा सुंदरजी केशवजी यास मी प्रामाणिकपणानें दिला आहे; सबब वादीच्या या दाव्याबद्दल वादीस मी जबाबदार नाहीं.

त्या कामांत ठराव झाला तोः—वादी यास प्रतिवादीकडून सदर्हू रक्कम मिळण्याचा हक्क आहे; कारण, गुप्त मुख्यानें आपल्या गुमास्त्यास प्रामाणिकपणानें फेड केली असतां, गुमास्त्यानें केलेल्या कराराबद्दल मुख्य जबाबदार होत नाहीं, किंवा त्याचे दरम्यानचे हिशेबांत बदल झाला नसल्यास तो गुप्त मुख्य जबाबदार होत नाहीं, असा जो इंग्लिश कायद्याचा नियम आहे, तो इंडियाच्या कराराच्या आक्टांत मान्य केलेला नाहीं.

इंडियाच्या कराराच्या आक्टाचें कलम २३२ हें, कलम २३१ चा पारिग्राफ १ भाग पहिला याची यत्ता ठरवितें, असें समजून वाचलें पाहिजे. गुमास्त्यानें केलेला करार अमलांत आणण्याचा सर्वसाधारण अधिकार मुख्यास कलम २३१ पारिग्राफ १ वरून मिळालेला आहे. परंतु तो करार पुरा होणें तो, तो गुमास्ता आणि त्या करारांतील जो दुसरा पक्षकार यांचेमध्यें असणारे जे हक्क आणि ज्या जबाबदाऱ्या त्यांस पात्र असाच मात्र होईल.

परंतु कलम २३१ चा पारिग्राफ १ याच्या शेवटच्या भागावरून, तो गुमास्ताच जर मुख्य असता, तर त्या करारांतील दुसऱ्या पक्षकारांस गुमास्त्याविरुद्ध अशा नात्यानें जे हक्क असते तेच हक्क त्या पक्षकारांस मुख्याविरुद्ध दिलेले आहेत.

गुमास्त्यानें केलेला करार अमलांत आणण्याच्या मुख्याचे हक्काचे संबंधानें इंग्लिश कायद्याची जी मर्यादा आहे तीच इंडियाच्या कराराच्या आक्टाचें कलम २३२ यांत मान्य केलेली आहे. ती अशी कीं, "जर एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याशीं करार करील आणि तो दुसरा मनुष्य गुमास्ता आहे असें त्याला ठाऊक नसेल अथवा तसा संशय घेण्यास त्याला योग्य कारण नसेल, तर करार

पुरा झाला पाहिजे असें मुख्य मागणें करूं लागल्यास त्या कराराची पूर्तता होणें तों तो गुमास्ता आणि त्या करारांतील जो दुसरा पक्षकार यांचेमध्यें असणारे जे हक्क आणि ज्या जबाबदाऱ्या त्यांस पात्र असीच मात्र होईल."

कलम २३४ वरून, करारांतील दुसऱ्या पक्षकाराच्या हक्काची मर्यादा ठरविली आहे. सबब वादी यास प्रतिवादी जबाबदार आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४ पृ. ४४७; न्या. पु. १६ मुं. दि. नि. पृ. १ ).

जेव्हां गुमास्ता स्वतः जबाबदार असेल तेव्हां त्याच्याशीं व्यवहार करणाऱ्या मनुष्याचा हक्क.

२३३. जेव्हां गुमास्ता स्वतः जबाबदार असतो, तेव्हां त्याजबरोबर व्यवहार करणारा मनुष्य खुद्द त्याला अथवा त्याच्या मुख्याला अथवा दोघांलाही जबाबदार करूं शकेल.

## उदाहरण.

अ बला शंभर गठ्ठे कापूस विकण्याचा करार त्याजबरोबर करितो, आणि अला मागाहून समजतें कीं, ब हा त्या व्यवहारांत कचा गुमास्ता होता, तर अ हा बवर किंवा कवर, अथवा दोघांहीवर त्या कापसाच्या किंमतीबद्दल दावा आणूं शकेल.

## विशेष समजुतीची टीप.

न्यूफ्लेमिंग स्पिनिंग आणि विव्हिंग कंपनीच्या नियमावरून नरसी केशवजी शेट यांस त्या कंपनीचा सेक्रेटरी, खजीनदार व एजंट नेमण्यांत आलें होतें व कंपनीच्या नांवानें कर्जरोखे लिहून देऊन आणि दुसऱ्या इतर रीतीनें दस्तऐवज करून देऊन व कंपनीची मिळकत गहाण लावून देऊन कंपनीच्या नांवानें कर्जें काढण्याचाही त्यास अधिकार दिलेला होता. केशवजी नाईक हा आणखी चार कंपन्यांचा सेक्रेटरी, खजीनदार व एजंटही होता.

न्यूफ्लेमिंग स्पिनिंग आणि विव्हिंग कंपनीच्या डायरेक्टरांनीं ता. ३१ आक्टोबर सन १८७८ रोजीं पुढें लिहिल्याप्रमाणें एक ठराव केला होताः

" जे शेअर विकले गेलेले नाहींत ते शेअर्स नरसी केशवजी यांचे नांवावर चढवावे व कंपनीकरितां कर्जाऊ पैका काढणें तो सदहू शेअर्स बाजवी व्याजानें गहाण ठेऊन नरसी केशवजी यानें काढावा."

त्याप्रमाणें नरसी केशवजी यानें एक दस्तऐवज लिहून देऊन परमानंददास यजपासून ता. ११ नवंबर सन १८७८ रोजीं १,००,५०० रुपये घेतले. त्या पैक्याची त्यानें परमानंददास यास पावती दिली आणि सदहू कंपनीचे ३३५ शेअर्स तारणादाखल त्याच्या स्वाधीन केले; मुदतींत पैका परत आला नाहीं म्हणून त्यानें त्या कंपनीवर दावा केला.

तो दावा त्यानें पहिल्यानें नरसी केशवजी याजवर केला होता, परंतु सदहू रक्कम न्यूफ्लेमिंग स्पिनिंग आणि विव्हिंग कंपनीच्या वह्यांत परमानंददास याचे नांवें जमा असल्यावरून त्या दाव्यांतून नरसी केशवजी सुटला म्हणून परमानंददास यानें त्या कंपनीवर दावा केला. त्यांत ठराव झाला तोः

ठरावः—त्या कंपनीकरितां कर्ज काढण्याचा अधिकार नरसी केशवजी यास देण्याचा त्या

कंपनीच्या नियमांवरून डायरेक्टरास अधिकार होता आणि त्यांनीं तसें केलें होतें व तसें त्यांस करितां यावें म्हणून त्यांनीं बाकी राहिलेले शेअर्स त्याचे नांवावर करून दिले होते.

परमानंददास यानें ज्या वेळेस सदहू रक्कम नरसी केशवजी यास दिली त्या वेळेस ती रक्कम ज्या चार कंपन्यांचा तो सेक्रेटरी, खजीनदार आणि एजंट होता त्या चार कंपन्याकरितां नरसी केशवजी हा घेत आहे असें परमानंददास यास वाटलें होतें. आणि सदहू रक्कम कोणत्या कंपनीकरितां घेतली आहे हें नरसी केशवजी यानें त्यास सांगितलें नव्हतें आणि ह्मणून उघड न-झालेल्या मुख्याकरितां परमानंददास यानें ती रक्कम नरसी केशवजी यास दिली होती.

उघड न झालेल्या मुख्याचे जबाबदारीच्या संबंधानें कराराचे आक्टांत मुख्यत्वेंकरून कलमें २३०, २३३ व २३४ हीं आहेत. ह्यांपैकीं हल्लींचे कज्जास कोणतें कलम बरोबर लागू पडतें ह्याचा विचार करून पाहतां, कलम २३३ हें हल्लींचे कज्जास बरोबर लागू पडतें असें दिसतें.

सबब सदहू रक्कम न्यूफ्लेमिंग स्पिनिंग आणि विव्हिंग कंपनी यांचे करितां नरसी केशवजी यानें घेतली होती असें जेव्हां परमानंददास यास कळलें तेव्हां त्या कंपनीपासून व्याज सुद्धां ती रक्कम घेण्यासाठीं दावा करण्याचा परमानंददास यास हक्क प्राप्त झाला हें उघड आहे. सबब वादीतर्फे निकाल केला पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ६ पृ. ३२६; न्या. पु. १७ मुं. दि. नि. पृ. २०३ ).

केवळ मुख्यच अथवा केवळ गुमास्ताच जबाबदार धरला जाईल अशा समजुतीनें गुमास्त्यास अथवा मुख्यास चालावयास लावण्याचा परिणाम.

२३४. जर कोणी मनुष्यानें एखाद्या गुमास्त्याबरोबर करार केला आहे आणि तो मनुष्य केवळ मुख्यालाच जबाबदार धरिलें जाईल असें समजून चालविण्याविषयीं त्या गुमास्त्याचें मन वळवील, अथवा केवळ गुमास्त्याला जबाबदार धरिलें जाईल असें समजून चालण्याविषयीं मुख्याचें मन वळवील, तर मागाहून तो अनुक्रमानें गुमास्त्यास अथवा मुख्यास जबाबदार धरूं शकणार नाहीं.

आपल्याला गुमास्ता असे उगीच म्हणविणाऱ्या मनुष्याची जबाबदारी.

२३५. जर कोणी मनुष्य आपण दुसऱ्या कोणाचा गुमास्ता आहे व त्यानें आपणास अधिकार दिला आहे असें खोटें समजावून, त्यामुळें आपणास गुमास्ता समजून आपणाबरोबर व्यवहार करण्यास, तिसऱ्या मनुष्याचें मन वळवील, आणि ज्यानें आपणास गुमास्ता नेमिलें आहे असें तो म्हणत असेल तो मनुष्य त्याचीं कृत्यें बहाल न करील, तर त्या दुसऱ्या मनुष्याला त्याजबरोबर व्यवहार केल्यानें कांहीं तोटा अथवा खराबी झाली असेल तिजबद्दल त्याला नुकसानी भरून देण्यास तो मनुष्य पात्र होईल.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. वादीनें, रुपालिवा हीस, तिचा अल्पवयी मुलगा रनमल संगजी याची पालन करणारी या नात्यानें कांहीं पैक्याची रक्कम कर्जाऊ दिली होती; व ती रक्कम वसूल करण्याकरितां त्या अल्पवयी मुलाच्या वतीनें त्याची पालन करणारी रुपालिवा हिजवर वादीनें दावा केला. त्या दाव्यांत दोन्हीं पक्षकारांच्या कबुलीनें एक हुकुमनामा करण्यांत आला, व त्या हुकुमनाम्यांत वादीस येणें

झालेली रक्कम त्यानें अल्पवयी मुलाच्या इस्टेटींतून वसूल करून घ्यावी असें ठरविलें होतें. रनमल संगजी वयांत आल्यावर त्यानें सदहूं हुकुमनामा रद्द करविला व त्यामुळें वादीनें वसूल केलेली रक्कम त्यास परत देण भाग पडलें. त्यानंतर खात्री चुकल्याबद्दल म्हणून नुकसानीचे ऐवजीं सदर रक्कम वसूल करण्यासाठीं वादीनें रुपालिबावर दावा केला, व त्यांत वास्तविक आपणास अधिकार नसून वादीतर्फे कर्ज काढण्याचा आपल्यास अधिकार होता व त्या कर्जाबद्दल अल्पवयीची इस्टेट बांधली जाण्याजोगी आहे असें रुपालिबा हिनें मला खोटें समजाविलें होतें असें वादीनें कथन केलें होतें.

**ठरावः**—खात्री चुकल्यामुळें ज्यावरून दावा करितां येईल अशी एखादी गैरसमजाविशी करण्यांत आलेली नाहीं. सबब वादीस नुकसानीची रक्कम मिळण्याचा हक्क पोंचत नाहीं.

हा दावा कराराचा आक्ट कलम २३५ खालीं येतो असें धरून चालल्यास व एखादी गैरसमजाविशी करण्यांत आली होती असेंही गृहीत धरून चालल्यास, ती गैरसमजाविशी, प्रतिवादीनें मी आपल्या मुलाचा गुमास्ता आहे असें जें खोटें समजाविलें त्यावांचून, दुसरी असूं शकणार नाहीं. परंतु तो मुलगा अल्पवयी होता हें ज्या अर्थी, वादीस ठाऊक होतें त्या अर्थी, अल्पवयी मुलास गुमास्ता नेमतां येत नाहीं असें असल्या कारणानें, प्रतिवादीस तिच्या अल्पवयी मुलानें योग्य अधिकारानें गुमास्ता नेमिलें होतें हें जे प्रतिवादीनें समजाविलें तें चुकीचें होतें ही गोष्ट वादीस कळावयास पाहिजे होती, आणि ह्मणून ज्यावरून दावा करितां येईल अशा तऱ्हेची एखादी खात्री अशा गैरसमजावीशींतून उत्पन्न होते असें ह्मणतां येत नाहीं.

अल्पवयी मुलाची इस्टेट ( कर्जाबद्दल ) पात्र करण्यास आपणास अधिकार आहे असें जें रुपालिबा हिनें समजाविलें तें कबूल केलें तरी तें कायद्याचे मुद्याबद्दल होतें आणि म्हणून त्यावरून दावा चालूं शकत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २४ पृ. १६६; न्या. पु. ३५ मुं. दि. नि. पृ. १२१ व १२२ ).

२. ज्या इसमाचा माल होता त्या इसमानें सदर माल विकण्यास आपणांस अधिकार दिला आहे असें सांगून प्रतिवादीनें सदर माल विकण्याचा करार वादीबरोबर केला होता. परंतु असा माल विकण्याचा अधिकार प्रतिवादीस केव्हांही नव्हता; करार मोडल्यामुळें वादीनें प्रतिवादीवर लावलेला दावा हा अपकृत्यावरून अगर करारापेक्षां दुसऱ्या एखाद्या भिन्न गोष्टीवरून लावलेला नसून सदर दावा करारामुळें व करारावरूनच लावलेला असतो. अशा दाव्यास मुदतीच्या आक्टाचें ( सन १८७७ चा आक्ट १५ ) आर्टिकल ११५ लागू पडतें, आर्टिकल ३६ अगर १२० लागू पडत नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३८ पृ. २७५; न्या. पु. ५० म. दि. नि. पृ. २४ व २५ ).

३. **ठरावः**—एखादा इसम गुमास्ता नसून आपण गुमास्ता आहों असें सांगेल तर त्याबाबतींत कराराचा आक्ट कलम २३५ जसें लागू पडतें तसें गुमास्ता आपल्यास जे अधिकार नाहींत ते आहेत असें सांगेल तर तेथें कलम २३५ लागू पडतें. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३४ पृ. १६८; न्या. पु. ४७ अ. दि. नि. पृ. १५ ).

**२३६.** कोणी मनुष्य गुमास्ता आहे अशा समजुतीनें त्याजबरोबर कांहीं करार झाला असेल, आणि तो मनुष्य त्या कराराच्या संबंधानें वस्तुतः गुमास्ता नसतां आपल्या स्वतःसाठींच पक्षकार झालेला असेल, तर करार पुरा करावा असें मागणें करण्याचा त्याला हक्क नाहीं.

जो आपण गुमास्ता आहे असें खोटें सांगून करारांतील पक्षकार होईल त्याला करार पुरा करून घेण्याचा हक्क नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. बांबूची खरेदी व विक्री करण्याकरितां प्रतिवादीचे दलाल ह्मणून आह्मीं काम करीत असतों, असें प्रतिवादीबरोबर झालेल्या करारावरून वादी म्हणत असत; परंतु प्रतिवादीस माहीत नसतां व त्याची संमत्ती घेतल्यावांचून मुख्य म्हणूनच वादीनें स्वतः खरोखर आपण होऊन धंदा केला होता.

कराराच्या आक्टाचें कलम २३६ वरून पाहतां त्या धंद्यांतील नुकसानीबद्दल करार तोडल्याचे कारणावरून प्रतिवादीपासून नुकसान मागण्याचा वादीस हक्क पोंचत नाहीं. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३४ पृ. ६२८; न्या. पु. ४२ क. दि. नि. पृ. २३ ).

२. एक इसम मुख्य आहे असें सांगून त्याचें नांव न कळवितां एकानें गुमास्ता या नात्यानें करार केला होता, परंतु वास्तविक मुख्य इसम कोणी नव्हता; व गुमास्ता स्वतः करतां करार करीत होता.

ठरावः—अशा परिस्थितींत कराराच्या आक्टाचें कलम २३६ अन्वयें गुमास्त्यास करारावरून दावा आणण्यास हरकत येते. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३९ पृ. ८०२; न्या. पु. ४७ क. दि. नि. पृ. २२ ).

गुमास्त्यानें अधिकाराशिवाय केलेलीं कृत्यें साधिकार आहेत अशी समजूत मुख्यानें उत्पन्न केली तर त्या मुख्याची जबाबदारी.

२३७. जर कोणी गुमास्त्यानें अधिकाराशिवाय आपल्या मुख्याच्या तर्फे कांहीं कृत्यें केलीं असतील अथवा तिसऱ्या मनुष्यापाशीं जबाबदाऱ्या उत्पन्न करून घेतल्या असतील, आणि तशीं कृत्यें करणें आणि तशा जबाबदाऱ्या आंगावर घेणें हें त्या गुमास्त्याला दिलेल्या अधिकाराच्या मर्यादेच्या आंत आहे असें मानण्यास मुख्यानें आपल्या शब्दांनीं अथवा वर्तणुकीनें तशा तिसऱ्या मनुष्यांचीं मनें वळविलीं असतील, तर तशा कृत्यांनीं अथवा जबाबदाऱ्यांनीं तो मुख्य बांधला जाईल.

### उदाहरणें.

( अ. ) अ हा विकण्याकरितां कांहीं माल बकडे पाठवितो आणि अमुक एक किंमतीखालीं तो विकूं नये असा हुकूम देतो. बला काय हुकूम झाला आहे तें कला माहीत नसल्यामुळें फर्माविलेल्या किंमतीपेक्षां कमी किंमतीला तो माल खरेदी घेण्याविषयीं क हा बबरोबर करार करितो. तर अ त्या करारानें बांधला गेला असें समजलें पाहिजे.

( ब. ) अ हा कांहीं व्यवहार्य दस्तऐवजांच्या पाठीवर नांव भरावयाचें ठेवून शेरा लिहून ते बच्या हवालीं करितो. अजवळून गुप्त हुकूम असलेला अमान्य करून ब हा ते दस्तऐवज कला विकतो. तर ती विक्री कायदेशीर समजली पाहिजे.

## विशेष समजुतीची टीप.

एका एकत्र हिंदु कुटुंबाची पेढी ही एका जाइंट स्टाक कंपनीची गुमास्ता या नात्यानें काम करीत असे. सदर गुमास्त्यानें हुंड्या लिहून देऊन बरीच रक्कम कर्जाऊ काढली. एकत्र कुटुंबाच्या पेढीच्या व्यवस्थापकानें कंपनीकरितां सदर हुंड्या लिहून दिल्या होत्या. सदर हुंड्यावर फक्त व्यवस्थापकाच्या सह्या असून हुंड्यांवर ज्या इसमाच्या सह्या आहेत त्यानें स्वतःकरितां सह्या केल्या नसून गुमास्ता या नात्यानें सह्या केल्या असें हुंड्यांवरून दाखविण्यास कांहीं साधन नव्हतें.

कंपनीची कायदेशीर आर्टिकल्स आफ असोसिएशन नव्हती. मेमारँडम आफ असोसिएशनवरून अगर इंडियन कंपनीज आक्ट टेबल ए ( सन १८८२ ) प्रमाणें गुमास्त्यास कर्ज काढण्याचा अधिकार दिलेला नव्हता. तथापि ज्यांस आर्टिकल्स आफ असोसियशन असे म्हणण्यांत येत होतें अशीं आर्टिकल्स आफ असोसिएशन असून तीच खरीं व कायद्याप्रमाणें मान्य केलेलीं कंपनीचीं आर्टिकल्स आफ असोसिएशन आहेत असें कंपनी मानीत होती व हींच आर्टिकल्स आफ असोसिएशन लोकांत प्रसिद्ध केलीं होतीं, सदर आर्टिकल्स आफ असोसिएशन नोंदलीं नसल्यामुळें बेकायदेशीर होतीं. या आर्टिकल्सप्रमाणें कंपनीच्या गुमास्त्यास कर्ज काढण्याचा अधिकार दिलेला होता.

ठरावः—गुमास्त्या पेढीच्या व्यवस्थापकानें केलेली सही पुरेशी आहे. कंपनीचीं आर्टिकल्स आफ असोसिएशन बेकायदेशीर असलीं तरी प्रस्तुतच्या दाव्याच्या परिस्थितींत योग्य क्रमानें हुंड्या जे इसम धारण करीत आहेत अशा इसमांच्या विरुद्ध आर्टिकल्स आफ असोसिएशन बेकायदेशीर आहेत अशी तक्रार करण्यास कंपनीस प्रतिबंध झाला आहे. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. ३६ पृ. ४१६; न्या. पु. ४९ अ. दि. नि. पृ. ३७ व ३८ ).

गुमास्त्यानें गैरसमजाविशी केली अथवा कपट केलें तर त्यांचा कबुलायतीवर परिणाम.

**२३८.** जर गुमास्ते आपल्या मुख्यासाठीं काम करीत असतांना गैरसमजाविशी करतील अथवा कपटें करतील, तर त्या गुमास्त्यांनीं केलेल्या कबुलायतीवर त्या गैरसमजाविशीचा आणि कपटांचा परिणाम होणें तो, त्या गैरसमजाविशी अथवा तीं कपटें मुख्यांनीं केलीं असतीं तर जो झाला असता तोच परिणाम होईल; परंतु गुमास्त्यांच्या अधिकाराच्या आंत मोडत नाहीं अशा बाबतींत जर गुमास्त्यांनीं गैरसमजाविशी केल्या अथवा कपटें केलीं तर तीं त्यांच्या मुख्यांच्या आंगावर येणार नाहींत.

### उदाहरणें.

( अ. ) अ हा कांहीं माल विकण्यासाठीं बचा गुमास्ता आहे. तो जी गैरसमजाविशी करावयाला बनें अधिकार दिला नव्हता तशी गैरसमजाविशी करून तो माल विकत घेण्याविषयीं कचें मन वळवितो. तर हा करार, कच्या इच्छेस येईल तर, ब आणि क यांच्या मधील संबंधानें पाहिलें असतां, निरर्थक करण्याजोगा असा आहे.

( ब. ) अ हा बच्या जहाजाचा कप्तान आहे. तो बिल्स आफ लेडिंग त्या बिल्स आफ लेडिंगांत सांगितलेला माल तारवावर घेतला दाखल होण्यापूर्वीं

गावर सही करितो. तर ब आणि ज्यांनीं माल पाठविण्याचें ढोंग केलें तो, यांज-मधील संबंधानें पाहिलें असतां, ती बिल्स आफ लेडिंग निरर्थक समजलीं पाहिजेत.

### विशेष समजुतीचा टीप.

**गुमास्त्याचे कपटाबद्दल मुख्यावर जबाबदारी.**—गुमास्ता हा आपल्या अधिकारांत वर्तन करीत असेल तर, त्याच्या कपटाबद्दल मुख्यावर जबाबदारी राहील; मग सदर कपट गुमास्त्यानें आपल्या फायद्याकरितां केलेलें असो अगर मुख्याच्या फायद्याकरितां केलेलें असो. (इं. ला. रि. क. सी. व्हा. ५० पृ. २५८; न्या. पु. ५८ क दि. नि. पृ. ८).

---

## बाब ११ वी.

### भागीदारीविषयीं.

२३९. कोणी मनुष्यांनीं आपली जिंदगी, मेहनत, अथवा आपलें चातुर्य कांहीं उद्योगांत एकत्र मिळविण्याची आणि त्यापासून होणारा नफा आपणांमध्यें वांटून घेण्याची कबुलायत केली, तर त्या मनुष्यांमध्यें जो संबंध असतो त्याचें नांव भागीदारी.

भागीदारीचें लक्षण.

ज्या मनुष्यांनीं एकमेकांशीं भागीदारी आरंभिली असेल त्या सर्वांस मिळून मंडळी हें नांव दिलें आहे.

'मंडळी' यांचे लक्षण.

### उदाहरणें.

(अ.) अ आणि ब हे १०० गठ्ठे कापूस विकत घेतात आणि तो दोन्हीं असामींच्या मिळून नफ्यासाठीं कबूल करितात. तर त्या कापसाच्या संबंधानें अ आणि ब हे भागीदार होत.

(ब.) अ आणि ब हे १०० गठ्ठे कापूस विकत घेतात आणि तो आपणामध्यें वांटून घेण्याचें कबूल करितात, तर अ आणि ब हे भागीदार होत नाहींत.

(क.) ब हा सोनार आहे. त्याजबरोबर अ अशी कबुलायत करितो कीं, अनें सोनें विकत घेऊन बला आणून द्यावें, आणि बनें त्याचें दागिनें करावे आणि ते विकून त्यापासून नफा किंवा तोटा होईल तो त्यांनीं वांटून घ्यावा. तर अ आणि ब हे भागीदार होत.

(ड.) अ आणि ब हे सुनारागिरीचें काम एकत्र करण्याचें कबूल करितात, परंतु अशी कबुलायत करितात कीं, अनें नफा सगळा आपण घ्यावा, आणि बला नुसता पगार द्यावा. तर अ आणि ब हे भागीदार होत नाहींत.

(ई.) अ आणि ब हे एका तारवाचे संयुक्त मालक आहेत. इतक्यानें ते भागीदार होतात असें नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. रेस्पांडेंट हे मारिशस येथें व्यापार करीत असून त्यांचीं मुंबईमध्यें स्वतंत्र दुकानें होतीं. रेस्पांडेंटांनीं पिवळ्या साखरेचा व्यापार एक वर्षपर्यंत भागींत करण्याचा करार केला. सदर करारप्रमाणें पिवळी साखर मारिशसहून हांगकांगला जाहजांतून पाठवावयाची असून तेथें सदर साखरेची विक्री अपेलेंटानें कमिशन घेऊन करावयाची होती. अपेलेंट हा एक मुंबईचा व्यापारी असून त्याचें हांगकांग येथें आडतीचें दुकान होतें. भागींत झालेला नफा दोघा रेस्पांडेंटांनीं सारखा वांटून घ्यावयाचा होता. दोघां रेस्पांडेंटांनीं मिळून मारिशस येथें माल जहाजावर चढवावयाचा होता तो असा कीं, प्रत्येक रेस्पांडेंटानें एकंदर मालापैकीं निम्मा चढवावयाचा होता. प्रत्येक रेस्पांडेंटानें जो माल चढविला असेल त्याबद्दल त्यानें स्वतः आपल्या निम्या हिश्शापुरत्या हुंड्या द्यावयाच्या असून प्रत्येकानें पाठविलेल्या मालाच्या विक्रीचा हिशोब अपेलेंटानें प्रत्येक रेस्पांडेंटास द्यावयाचा होता. रेस्पांडेंटांनीं दिलेल्या हुंड्या मारिशस येथील ब्यांकांनीं न स्वीकारिल्यास सदर ब्यांकांकडून पतीवर हुंड्या स्वीकारावयाची व्यवस्था करण्याचें अपेलेंटानें कबूल केलें असून ही कबुली अपेलेंटानें करारपत्रावर देऊन त्यावर आपली सही केली होती; करारांतील शर्तीप्रमाणें साखरेचा माल चढविण्यांत आला; परंतु प्रत्येक रेस्पांडेंटानें चढविलेल्या मालाबद्दलच्या हुंड्या प्रथम मारिशस येथील ब्यांकांवर न देतां त्या मुंबईस अपेलेंटावर काढण्यांत आल्या व त्या अपेलेंटानें स्वीकारिल्या. चढविलेल्या मालांत अखेर नुकसान झालें. पहिल्या रेस्पांडेंटानें काढलेल्या हुंड्या जेव्हां विकल्या तेव्हां त्यानें त्या हुंड्यांबद्दलची रक्कम दिली; परंतु दुसरा रेस्पांडेंट नादार झाला असल्यामुळें त्यानें हुंड्यांबद्दलची रक्कम दिली नाहीं याचा परिणाम असा झाला कीं, अपेलेंटानें दुसऱ्या रेस्पांडेंटाच्या हुंड्या स्वीकारिल्या असल्यामुळें त्यास त्या हुंड्यांबद्दल रक्कम द्यावी लागली. हुंड्यांबद्दल दिलेल्या रकमेबद्दल अपेलेंटानें रेस्पांडेंट व आफिशियल असायनीवर दावा लावला. या दाव्यांत फक्त रेस्पांडेंट नं. १ नें अशी तक्रार केली कीं, आपण दिलेल्या सर्व हुंड्यांची रक्कम आपण दिली आहे व रेस्पांडेंट नं. २ नें काढलेल्या हुंड्यांची रक्कम देण्याची पात्रता आपणांवर नाहीं. हिंदुस्थानांतील अपील कोर्टानें केलेला निकाल रद्द करून पुढील ठराव करण्यांत आलाः—

**प्रिव्हिकौन्सिलचा ठरावः**—प्रस्तुतच्या कज्जास कराराचा आक्ट (सन १८७२ चा आक्ट ९) लागू पडत आहे. सदर आक्टाचें कलम २३९ मधील अर्थाप्रमाणें रेस्पांडेंटांमध्यें भागीदारी उत्पन्न झाली आहे परंतु सदर भागीदारी मर्यादित स्वरूपाची असल्यामुळें ज्या कर्जाच्या दस्तऐवजाबद्दल एखाद्या भागीदारावर सकृद्दर्शनीं पात्रता येत नाहीं अशा दस्तऐवजाबद्दल सदर भागीदारावर पात्रता आणण्यास सदर भागीदारानें ज्या गोष्टी केल्या त्या भागीदारीकरितां केल्या होत्या व भागीदारीच्या कामाकरितां ज्या गोष्टी स्वाभाविकपणें कराव्या लागल्या असत्या अशा गोष्टींत सदर गोष्टींचा अंतर्भाव होत आहे असें दाखविलें पाहिजे.

करारांतील शर्तीप्रमाणें साखर खरेदी करणें हें कृत्य भागीदारीकरितां केलेलें कृत्य होत आहे; व जो इसम साखर खरेदी करील अगर साखर खरेदी करण्याकरितां रक्कम देईल त्यानें भागीदारीस माल दिला अगर रक्कम दिल्याप्रमाणें होत आहे. रेस्पांडेंटांपैकीं कोणीही साखर घेईल व मारिशसमध्यें साखर पुन्हां विकण्यासंबंधानें करारांत असलेल्या शर्तीप्रमाणें साखरेची पुन्हां विक्री करील तर सदर व्यवहारामध्यें झालेल्या फायद्यापैकीं दुसऱ्या रेस्पांडेंटाचा हिस्सा आपण त्यास देणार नाहीं असें त्यास म्हणतां येणार नाहीं. माल जहाजावर चढविला त्या वेळीं भागीच्या व्यापारास सुरवात झाली नसून साखर ज्या वेळीं घेतली त्या वेळीं भागीच्या व्यापारास

सुरवात झाली. अपेलेंटास भागीच्या करारांतील सर्व शर्ती माहीत असल्यामुळें आपल्या पतीचा उपयोग करूं दिल्यामुळें आपण साखर खरेदीच्या कामांत भागीदारीस मदत करीत आहों ही गोष्ट त्यास माहीत असली पाहिजे. करारांत नमूद केलेल्या रीतीप्रमाणेंच अपेलेंटानें आपल्या पतीचा उपयोग रेस्पांडेंटांस करूं दिला नसला तरी रेस्पांडेंटांनीं अपेलेंटाच्या पतीचा उपयोग करून घेतला आहे ही गोष्ट हुंड्यावरूनच स्पष्ट होत आहे. हुंडी स्वीकारण्यास हुंडी देणाराचें मुळींच देणें नसतां त्यानें हुंडी स्वीकारिल्यानंतर हुंडी देणारानें हुंडीची रक्कम न दिल्यास आपण हुंडी स्वीकारणाराच्या पतीचा उपयोग केला नाहीं असें हुंडी देणाराचें ह्मणणें व्यर्थ आहे. शिवाय "खरेदी केलेल्या सर्व साखरेबद्दल अपेलेंटानें स्वीकारिलेल्या हुंड्या देण्यांत आल्या" असें रेस्पांडेंट नं. १ आपल्या उलट-तपासणींत ह्मणतो. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३९ पृ. २६१; न्या. पु. ५० मुं. दि. नि. पृ. ११० व १११).

२. '**भागीदारी मंडळी' याचा अर्थ.**—भागिदारी मंडळी ही एक व्यक्ती नसून जे इसम भागीदार असतात त्या सर्वांचे सामुदायिक नांव असतें व यामुळें ही भागीदारी मंडळी दुसऱ्या दुकानांत भागीदार होऊं शकत नाहीं. (इं. ला. री. क. सी. व्हा. ५० पृ. ५४९; न्या. पु. ५८ क. दि. नि. पृ. १४).

३. **भागीदारी मोडण्याबद्दलचा दावा.**—बोटीच्या सह-मालकांनीं बोटींचा उपयोग भाडें करण्याकडे केला असेल तर बोटीच्या भाड्याच्या उत्पन्नांत सदरहू सह-मालक हे भागीदार होतात; व वांदी हे नुसते सह-मालक असल्यामुळें भागीदारानें ठेवलेल्या बोटीची विक्री करण्याबद्दलचा हुकुमनामा मिळण्याचा अधिकार सदरहू वादीस नसला तरी ही भागीदारी मोडण्याकरितां आणलेला दावा चालतो. (इं. ला. री. म. सी. व्हा. ४१ पृ. ९३९; न्या. पु. ५३ म. दि. नि. पृ. ५३).

कर्ज देणारानें नफ्याच्या अंशाकरितां तें दिलें असेल तर त्यावरून तो भागीदार बनत नाहीं.

**२४०.** कोणी मनुष्य कांहीं व्यापार किंवा काम करूं लागला किंवा करूं लागणार आहे आणि तशा मनुष्याला कर्ज देऊन जर असा करार केला कीं, कर्ज देणारास नफ्याच्या मानाप्रमाणें कमजास्त होणाऱ्या दरानें व्याज मिळावें किंवा त्याला नफ्याचा कांहीं भाग मिळावा, तर कर्ज दिल्यामुळेंच कर्ज देणारा भागीदार बनत नाहीं, किंवा भागीदाराप्रमाणें जबाबदार होत नाहीं.

## विशेष समजुतीची टीप.

कोणी मनुष्यानें सरकारांतून रस्ते तयार करण्याचा मक्ता घेतला असेल व त्या मक्त्यास लागणारा पैका त्यास व्याजानें देण्याचा दुसरा कोणी मनुष्य त्याजबरोबर करार करील व तो मक्ता घेणारा आपल्या होणाऱ्या फायद्यापैकीं निम्मे फायदा सावकारास देण्याचें कबूल करील तर तो करार कलम २३९ यांत सांगितलेला सरकतीचा करार होत नाहीं; कलम २४० यांत सांगितलेल्या स्वरूपाचा तो करार होता. (इं. ला. री. अ. सी. व्हा. ४ पृ. ७४; न्या. पु. १८ अ. दि नि. पृ. ८).

भागिदारी सोडून जाणाऱ्या भागिदारानें अथवा मयत भागिदाराच्या

**२४१.** अन्याय होण्याविषयीं कांहीं करार नसेल तर, भागिदारी सोडून जाणाऱ्या भागिदारानें अथवा एखाद्या मयत भागिदाराच्या वारसानें कांहीं जिंदगी भागिदारी-

च्या उद्योगांत वापरली जाण्यासाठीं राहूं दिली असेल तर, ती वर गेलेल्या शेवटील कलमाच्या अर्थाअन्वयें कर्ज होय असें समजलें पाहिजे.

धारच्यानें जिंदगी उद्योगांत वापरण्यासाठीं राहूं दिली असेल तर.

२४२. कोणी मनुष्य कांहीं व्यापार अथवा काम चालवीत असेल, आणि त्यानें आपल्या नोकरास अगर गुमास्त्यास पगार देणें तो त्या व्यापारांतील किंवा कामांतील नफ्याच्या भागरूपानें देण्याचा करार केला असेल, तर तितक्याच गोष्टीनें तो नोकर अथवा गुमास्ता त्यांतील भागीदार अशा नात्यानें जबाबदार होणार नाहीं, अथवा त्याला भागिदाराचे हक्कही येणार नाहींत.

नोकरास अथवा गुमास्त्यास नफ्याच्या भागरूपानें पगार दिला तर ते भागीदार होत नाहींत.

२४३. कोणा व्यापाऱ्याचा एखादा भागीदार मयत होऊन, त्या व्यापाऱ्याला त्याच्या उद्योगांत नफा होत असेल त्यांतून मयत भागिदाराच्या विधवेस अगर मुलास कांहीं परिमाणानें वर्षासन पोहोंचत असेल तर वर्षासन पोहोंचतें इतक्याच कारणानें ती विधवा अगर तें मूल त्या व्यापाऱ्याचा भागीदार होतें असें समजूं नये, अथवा ज्या जबाबदाऱ्या त्या व्यापाऱ्याच्या अंगावर असतील त्यांसही तीं पात्र होणार नाहींत.

मयत भागीदाराच्या विधवेस अगर मुलास नफ्यांतून वर्षासन मिळत असलें म्हणून तीं भागीदार होत नाहींत.

२४४. कोणी मनुष्यानें कांहीं उद्योगाची गुड् विल्* विकली असेल, आणि ती विकल्याचे मोबदल्याबद्दल, त्या उद्योगापासून होणाऱ्या नफ्याचा कांहीं भाग वर्षासनानें अथवा दुसऱ्या रीतीनें, त्याला पोंचत असेल, तर, तो पोंचत आहे इतक्याच कारणानें, तो उद्योग चालविणाऱ्या मनुष्याचा तो भागीदार होतो असें समजूं नये, अथवा उद्योग चालविणाऱ्याच्या जबाबदाऱ्यांस पात्र होईल असें समजूं नये.

गुड् विल् विकणाऱ्या मनुष्यास नफ्या पैकीं कांहीं अंश पोंचत असला म्हणून तो भागीदार होत नाहीं.

२४५. जर कोणी मनुष्यानें कांहीं शब्द बोलल्यानें अथवा लिहिल्यानें, अथवा आपल्या वर्तणुकीच्या योगानें, दुसऱ्याच्या मनांत अशी समजूत उत्पन्न केली असेल कीं, तो कोणत्या एक विशेष मंडळीचा भागीदार आहे, तर तो त्या दुसऱ्या मनुष्याजवळ त्या मंडळीचा भागीदार अशा नात्यानें जबाबदार होईल.

आपण भागीदार आहे अशी कोणी मनुष्य दुसऱ्याची समजूत करून देईल तर त्याची जबाबदारी.

२४६. जर कोणी मनुष्य आपण भागीदार आहे असें समजावून दिलें जाण्यास आपली राजी देईल, आणि तसें जें समजाविलें त्याजवर विश्वास ठेऊन तिसरे मनुष्य त्या

कोणी मनुष्य आपण भागीदार आहे अशी दुसऱ्यानें समजूत करून

* 'गुड् विल्' या शब्दांचे अर्थाकरितां मागील कलम २७ अपवाद १ ला याजवरील टीप पहा.

दिली जाण्यास आपली संमत्ती देईल तर त्याची जबाबदारी.

भागीदारीच्या पतीवर देवघेव करतील, तर तो मनुष्य त्या तिसऱ्या मनुष्याजवळ भागीदार या नात्यानें जबाबदार होईल.

**२४७.** कोणा मनुष्यास जे कायदे लागू असतील त्याप्रमाणें तो वयांत आलेला * असें होत नसेल, तर भागीदारीपासून होणारे लाभ त्याला उपभोगूं देण्यास अडचण नाहीं; पण मंडळीची कोणतीही जबाबदारी असली तर तिला तो जातीनें पात्र होणार नाहीं, परंतु मंडळीच्या जिंदगींत जो त्या अल्पवयस्काचा हिस्सा असेल तो मंडळीच्या जबाबदाऱ्यांबद्दल पात्र होईल.

भागीदार अल्पवयस्क असेल तर तो स्वतः जबाबदार नाहीं, परंतु त्याच्या हिश्शावर जबाबदारी आहे.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. सदर दुकानच्या धनकोस अज्ञानाच्या सदर दुकानांत असलेल्या हितसंबंधाविरुद्ध काम चालवितां येईल. अज्ञानाच्या जातीविरुद्ध काम चालविण्याचा सदर धनकोस अधिकार नाहीं (पहाः—कराराचा आक्ट, कलम २४७). (इं. ला. री. क. सी. व्हा. ४२ पृ. २२५; न्या. पु. ५० क. दि. नि. पृ. ७).

२. **भागीदारीच्या मिळकतीमधील अज्ञानाचा हिस्सा याचा अर्थ.**—कराराच्या आक्टाचें कलम २३९ मध्यें 'पेढी' या शब्दाची जी व्याख्या दिली आहे ती व्याख्या व अज्ञानास करार करण्याचा अधिकार नाहीं यांजकडे लक्ष देतां कलम २४७ मध्यें 'भागीदाराच्या मिळकतीमधील अज्ञानाचा हिस्सा' हे जे शब्द आहेत त्यांचा अर्थ भागीदारीचें देणें देऊन टाकल्यानंतर भागीदारीची जी मिळकत राहील त्या मिळकतीमध्यें अंशभागी होण्याचा अज्ञानाचा हक्क इतकाच त्या शब्दांचा अर्थ होतो. (इं. ला. री. क. सी. व्हा. ४९ पृ. ५६०; न्या. पु. ५७ क. दि. नि. पृ. १२).

३. **'भागीदारीचा फायदा ज्यांस देण्यांत आला आहे' यांचा अर्थ.**—नाटुकोटाई चेट्टी जातीचा एक हिंदू इसम होता. त्यानें आपला अविभक्त मुलगा अज्ञान असतांना एक धंदा सुरूं केला. मुलगा सज्ञान झाल्यावर तो धंदा तसाच चालूं राहिला. मुलगा भागीदार असेल तर आपण भागीदार नाहीं अशी जाहीर नोटीस मुलानें सज्ञान झाल्यावर दिली नव्हती. मुलगा आपल्या अज्ञानपणांत धंद्याच्या कामीं बापास मदत करीत होता व सज्ञान झाल्यावर बराचसा व्यवहार तो पहात होता असें पुराव्यांत शाबीत झालें होतें. व्यापाराच्या कामांत जें देणें झालें होतें त्यासंबंधांत बाप व मुलगा या दोघांसही नादार ठरविण्यांत आलें. नादार ठरविण्याबद्दल केलेला हुकूम रद्द करण्याकरितां मुलानें अर्ज केला. आपणांस नादार ठरवितां येत नाहीं असें त्याचें म्हणणें होतें.

**ठरावः**—सदरहू व्यापार हा बाप व मुलगा यांच्या एकत्र कुटुंबाचा व्यापार आहे असें समजण्यांत यावें.

**ठरावः**—(ज. सदाशिव अय्यर यांचे विरुद्ध मत होतें):—एकत्र कुटुंबांतील कांहीं इसम अज्ञान असतांना कुटुंबाचा जो व्यापार होता त्या व्यापाराच्या करितां सदर इसम अज्ञान

* मनुष्य वयांत केव्हां येतो हे समजण्याकरितां मागील कलम ११ वरील टिपा ५ व ६ पहा.

असतांना जें देणें झालें होतें तें देणें जातीनें देऊन टाकण्याची जबाबदारी अगर त्या देण्याबद्दल नादार ठरवून घेण्याची पात्रता सदहू इसम सज्ञान झाल्यावर त्याचेवर कराराच्या आक्टाचीं कलमें २४७ व २४८ यांमधील ठरावांअन्वयें अगर दुसऱ्या कोणत्याही कायद्याप्रमाणें अवश्यमेव येतेंच असें नाहीं.

कलम २४७ मध्यें ‘ भागीदारीचा फायदा ज्यांस देण्यांत आला आहे ’ असे शब्द आहेत त्यांचा अर्थ काय याबद्दल ठरावांत विचार करण्यांत आला. एकत्र कुटुंबाच्या व्यापारांत अज्ञान मदत करीत होता येवढ्यामुळें सदर कलमांतील अर्थाप्रमाणें त्यास भागीदारीचा फायदा देण्यांत आला होता असें होत नाहीं. ( इं. ला. रि. म. सी. व्हा. ४१ पृ. ८२४; न्या. पु. ५३ म. दि. नि. पृ. ४९ ).

४. **अज्ञान भागीदारावरील जबाबदारी.**—भागीमधील अज्ञान भागीदारास नादार ठरविण्याबद्दलचा हुकूम करतां येत नाहीं. भागीच्या सावकारास अज्ञानाच्या जातीविरुद्ध आपलें येणें वसूल करतां येत नाहीं. भागीदारीच्या मिळकतीमध्यें अज्ञानाचे जे हितसंबंध असतात त्यामधूनच सावकारास आपलें येणें वसूल करण्याचा हक्क असतो. ( इं. ला. रि. अ. सी. व्हा. ४२ पृ. ५१५; न्या. पु. ५५ अ. दि. नि. पृ. ३२ ).

अल्पवयस्क भागीदार वयांत आला म्हणजे त्याची जबाबदारी.

**२४८.** जर कोणी मनुष्य वयांत आलेला नसून, भागीदारीपासून होणारे लाभ त्याला उपभोगूं दिले असतील, तर तो वयांत आल्यावर, त्याला उपभोगूं दिल्या वेळापासून त्या भागीदारीवर ज्या जबाबदाऱ्या आल्या असतील, त्या सर्वांबद्दल तो पात्र होतो; मात्र या भागीदारीचा मीं त्याग केला आहे अशी प्रसिद्ध खबर जर तो योग्य काळाच्या आंत देईल तर मात्र होणार नाहीं.

भागीदारीच्या कर्जाबद्दल भागीदाराची जबाबदारी.

**२४९.** भागीदारीच्या उद्योगाचा नेहमींचा क्रम चालला असतांना भागीदारीनें अगर भागीदारीच्या तर्फे, कोणी मनुष्य भागीदार असेपर्यंत, काढलेलीं जीं कर्जें आणि प्राप्त करून घेतलेल्या ज्या जबाबदाऱ्या त्या सर्व कर्जांबद्दल व त्या सर्व जबाबदाऱ्यांबद्दल तसा प्रत्येक भागीदार पात्र असतो; परंतु कोणा मनुष्यास विद्यमान मंडळीचा भागीदार करण्यापूर्वी जें कांहीं केलें असेल त्याजबद्दल, तो मनुष्य, भागीदार झाल्यानें, मंडळीच्या धनकोस जबाबदार होत नाहीं.

सहभागिदाराच्या हयगयीबद्दल अथवा कपटाबद्दल भागीदारावर तिसऱ्या मनुष्याजवळ जबाबदारी.

**२५०.** मंडळीचें काम चालविण्यांत कोणी भागीदारानें हयगय अथवा कपट केलें आणि त्यापासून तिसऱ्या मनुष्यांचा तोटा अथवा खराबी झाली तर त्याबद्दल त्यांची नुकसानी भरून देण्यास प्रत्येक भागीदार पात्र आहे.

सहभागिदारांस जबाबदारी बांधण्याचा भागिदारास अधिकार.

**२५१.** कोणताही भागीदार ज्या भागिदारीचा सभासद आहे त्या भागिदारीसारख्या भागिदारीचा उद्योग चालविण्याला अवश्य, अथवा चालवितांना नेहमीं करितात असें कोणतेंही कृत्य कोणत्याही भागीदारानें केलें तर तें कृत्य करण्यास त्याला

त्याच्या सहभागिदारांनीं यथायोग्य गुमास्ता नेमिलें असतें आणि तें कृत्य त्यानें केलें असतें तर तेणेंकरून त्याचे सहभागीदार जेवढें बांधलें गेले असते, तेवढेच त्या कृत्यानें ते बांधले जातील.

अपवाद.—जर भागिदारांमध्यें अशी कबुलायत झाली असेल कीं, त्यांतून कोणा एखाद्या सत्तेला कांहीं मर्यादा असावी तर तशा कबुलायती विरुद्ध कोणतेंही कृत्य झाल्यास, ज्या मनुष्यांस त्या कबुलायतीविषयीं माहिती असेल त्यांच्या संबधानें त्या कृत्यानें मंडळी बांधली जाणार नाहीं.

## उदाहरणें.

( अ. ) अ आणि ब भागीदारीनें व्यापार करितात. अ हा इंग्लंडमध्यें राहतो. ब हा हिंदुस्थानांत राहतो. अ हा आपल्या मंडळीच्या नांवानें कांहीं हुंडी करितो. या हुंडीविषयीं बला कांहीं समजाविलें नाहीं, आणि त्या हुंडीच्या व्यवहारांत बचा कांहीं संबंधही नाहीं. तर तिजविषयीं ती मंडळी जबाबदार आहे, मात्र ती हुंडी कोणत्या प्रसंगाच्या संबंधानें केली हें ती ज्याच्या हातीं आहे त्याला ठाऊक नव्हतें असें असलें पाहिजे.

( ब. ) अ हा सालिसिटर आणि अटर्नी यांच्या मंडळीपैकीं एक आहे. तो आपल्या मंडळीच्या नांवानें एक हुंडी अधिकार नसतांना करितो. तर त्या हुंडीविषयीं दुसरे भागीदार जबाबदार नाहींत.

( क. ) अ आणि ब भागीदारीनें एक पेढी घालितात. मंडळीच्या नांवानें अजवळ कांहीं पैसा जमा झाला आहे. तो जमा झाल्याविषयीं अ बला कळवीत नाहीं आणि मागाहून अ हा तो पैसा आपल्या उपयोगाला लावितो तर त्या पैशाबद्दल भागीदारी जबाबदार आहे.

( ड. ) अ आणि ब हे भागीदार आहेत. अ हा बला ठकविण्याच्या उद्देशानें एका दुकानांत जाऊन आपल्या मंडळीच्या तर्फे कांहीं पदार्थ विकत घेतो. हे पदार्थ त्याच्या भागीदारीचा उद्योग नेहमींप्रमाणें चालला असतां त्यांत वापरण्याजोगे असे आहेत. ते पदार्थ अ हा खुद्द आपल्या उपयोगास लावितो. अनें पदार्थ विकणारा बरोबर संगनमत केलेलें नाहीं. तर त्या पदार्थांच्या किंमतीबद्दल मंडळी जबाबदार आहे.

## विशेष समजुतीची टीप.

**भागीदारापैकीं एकानें प्रो. नोट देऊन कर्ज काढणें.**—मार्च सन १९२० मध्यें प्र. नं. १ व २ यांनीं तांब्यापितळेचीं भांडीं खरेदी घेणें व विकणें या धंद्याची भागी सुरूं केली. ता. २३ मे सन १९२० रोजीं प्र. नं. १ नें वादीपासून रु. ६००० भागीच्या व्यवहाराकरितां कर्जाऊ काढले. या रकमेकरितां प्र. नं. १ नें दुकानच्या नांवानें वादीस प्रामिसरी नोटी लिहून दिल्या

होत्या. ता. २८ मेला भागीदारी संपली. एप्रिल सन १९२३ मध्यें वादीनें प्रामिसरी नोटांवरून दोन्हीं प्रतिवादीवर दावे लावले.

**ठरावः**—भागीदारी व्यापारासंबंधानें असल्यामुळें भागीदारीकरितां रक्कम कर्जाऊ काढण्याचा अधिकार आक्षिप्त रीतीनें प्र. नं. १ ला होता; व यामुळें दाव्यांतील कर्जास प्र. नं. २ हा जबाबदार आहे. ( इं. ला. रि. मुं. सी. व्हा. ४८ पृ. १७६; न्या. पु. ५९ मुं. दि. नि. पृ. ११ ).

ज्याजवरून भागीदारांचे हक्क आणि त्याच्या जबाबदाऱ्या ठरविल्या आहेत असा करार बातल करणें.

**२५२.** जर भागीदारांनीं करार करून त्याच्या योगानें आपले हक्क आणि आपल्या जबाबदाऱ्या हीं, आपणांमध्यें अशा संबंधानें नियमित केलीं असतील आणि ठरविलीं असतील तर तो करार बातल करणें झाल्यास अथवा फिरविणें झाल्यास, तो त्या सर्वांच्या राजीनें मात्र बातल करितां अथवा फिरवितां येईल, आणि ती राजी स्पष्टपणें दिलेली असली पाहिजे, अथवा व्यवहार करण्याच्या एकसारख्या अशा कांहींएक क्रमापासून गर्भित समजली पाहिजे.

## उदाहरण.

अ, ब आणि क हे भागीदारी करण्याच्या उद्देशानें लेखी असा करार करितात कीं, भागीदारीच्या उद्योगापासून होणारा निवळ नफा आपणामध्यें सारखा वांटून घ्यावा. नंतर त्या भागिदारीचा उद्योग ते फार वर्षें चालवितात आणि अला निवळ नफ्या पैकीं निम्मे नफा मिळत जातो, आणि राहिलेल्या निम्मेचे ब आणि क हे सारखे भाग करून घेतात. सर्वांस ही व्यवस्था माहीत आहे आणि सर्वांनीं ती मान्य केली आहे. तर या व्यवहारक्रमाच्या योगानें नफ्याच्या वांटणीविषयीं कबुलायतींत असलेले ठराव बातल झाले.

अन्यथा करार नसल्यास, भागीदारांचे परस्पराशीं संबंध ठरविण्याविषयींचे नियम.

**२५३.** अन्यथा असण्याविषयीं कांहीं करार नसेल तर, भागीदाराचे जे एकमेकाशीं संबंध ते खालीं लिहिलेल्या नियमांवरून ठरविले आहेत, असें समजावें:—

( १. ) प्रथमतः भागीदारीच्या पुंजीत आणलेली, अथवा भागीदारीच्या पैशानें विकत घेतलेली, अथवा भागीदारीच्या उद्योगासाठीं मिळावलेली जी जिंदगी त्या सर्व जिंदगीचे सर्व भागीदार हे संयुक्त मालक होत. तशा सर्व जिंदगीला भागीदारीची जिंदगी असें नांव दिलें आहे. प्रत्येक भागीदारीचा भागीदारीच्या जिंदगींत हिस्सा असणें तो त्यानें प्रथमतः जी वर्गणी दिली असेल तिची किंमत, अधिक अगर उगा नफ्याचा अगर तोट्याचा त्याचा हिस्सा, हा होय:

( २. ) भागीदारीच्या उद्योगापासून जो नफा होईल, तो सर्व भागीदारांस

सारखा वांटून घेण्याचा हक्क आहे, आणि भागीदारीला बसलेला तोटा सर्व भागीदारांनीं सारख्या हिश्शानें भरला पाहिजे:

( ३. ) प्रत्येक भागीदारीला भागीदारीचा उद्योग चालविण्याचे कामीं काम करण्यासाठीं हात घालण्याचा हक्क आहे:

( ४. ) भागीदारीचा उद्योग हुषारीनें लक्ष देऊन करणें हें प्रत्येक भागीदाराचें काम आहे, आणि तें काम चालविण्याबद्दल कांहींच दस्तुरी मागण्याचा हक्क भागीदाराला नाहीं:

( ५. ) जर भागीदारीच्या उद्योगासंबंधीं साधारण बाबतींत तक्रार उत्पन्न होईल, तर भागीदारांतून बहुतांचें मत जसें असेल त्याप्रमाणें निर्णय झाला पाहिजे; परंतु सर्व भागीदारांची राजी मिळाल्याखेरीज भागीदारीच्या उद्योगाचें स्वरूप पालटतां येणार नाहीं.

( ६. ) सर्व भागीदारांच्या राजी खेरीज कोणत्याही मनुष्यास मंडळींत नवा भागीदार आणतां येणार नाहीं.

( ७. ) जर कोणत्याही तरी कारणामुळें भागीदारांचा कोणताही सभासद सभासद असण्याचा बंद होईल तर, बाकीच्या सभासदांमधील तशा संबंधानें, भागीदारी मोडली असें समजावें.

( ८. ) भागीदारी कांहीं एका नेमलेल्या मुदतींपर्यंत म्हणून आरंभिली नसेल तर, कोणत्याही भागीदारास पाहिजे त्या वेळीं भागीदारी सोडून निघून जातां येईल:

( ९. ) जर भागीदारी अमूक मुदतीपर्यंत म्हणून आरंभिली असेल तर, सर्व भागीदारांच्या राजी खेरीज ती मुदत चालू असेपर्यंत कोणत्याही भागीदारास भागीदारी सोडून निघून जातां येणार नाहीं; आणि कोर्टाच्या हुकुमाखेरीज कोणत्याही भागीदाराला बाकीचे भागीदार कोणत्याही कारणासाठीं झाले तरी काढून लावूं शकणार नाहींत:

( १०. ) भागीदाऱ्या कांहीं मुदतींपर्यंत म्हणून आरंभिल्या असोत अथवा नसोत, परंतु कोणताही भागीदार मेला तर त्या मोडतात.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. इंग्लंडांत एक भागीदार नादार झाल्यावर कोर्टाच्या हुकुमाशिवाय भागीदारी मोडते; परंतु हिंदुस्थानांत असें होत नाहीं. पहाः कराराचा आक्ट; कलमें २५३ व २६४. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ४२ पृ. २२५; न्या. पु. ५० क. दि. नि. पृ. ७ ).

२. एक भागीदार मयत झाल्यानंतर कराराचा आक्ट कलम २५३ रक्कम १० प्रमाणें ती भा-

गिदारी मोडते व कलम २६३ प्रमाणें भागीदारीचें काम आटपून बंद करण्याकरितां जरूर असलेले भागीदारांचे हक्क व जबाबदाऱ्या कायम राहतात.

हयात असलेल्या भागीदाराचें भागीदारीचें काम आटपून बंद करणें हें कर्तव्य आहे. मयत भागीदाराचा मुखत्यार व हयात भागीदार या दोघांमध्यें, हयात भागीदारावर भागीदारीचें काम आटपून बंद करण्याची जबाबदारी असल्यामुळें, हयात भागीदाराला भागीदारीचें काम चालविण्याचा, कर्ज काढण्याचा व भागीदारीचें येणें विकण्याचा हक्क आहे. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३२ पृ. ४६२; न्या. पु. ४४ म. दि. नि. पृ. ३५ व ३६ ).

कोर्टानें भागीदारी केव्हां मोडून टाकावी.

**२५४.** कोणी भागीदारानें दावा केला तर खालीं लिहिलेल्या प्रसंगीं कोर्ट भागीदारी मोडून टाकूं शकेल:—

( १. ) जेव्हां कोणी भागीदार वेडा होईल, तेव्हां:

( २. ) जेव्हां दावा करणाऱ्याशिवाय दुसरा भागीदार नादार रिणकोविषयींच्या कोणत्याही कायद्या अन्वयें नादार असा ठरविला गेला असेल, तेव्हां:

( ३. ) जेव्हां दावा करणाऱ्या भागीदाराशिवाय दुसऱ्या कोणत्याही भागीदारानें असें कोणतेंही कृत्य केलें असेल कीं, जेणेंकरून त्या भागीदाराचा नफ्यातोट्याचा सर्व संबंध कायद्यावरून दुसऱ्या मनुष्याला गेला आहे, तेव्हां:

( ४. ) जेव्हां कोणताही भागीदार भागीदारीच्या करारांतील आपला पक्ष पुरा करण्यास नालायक होतो तेव्हां:

( ५. ) जेव्हां दावा करणाऱ्या भागीदाराशिवाय दुसरा कोणताही भागीदार भागीदारीच्या बाबतींत अथवा आपल्या भागीदाराशीं फार वाईट अशा गैर चालीनें चालला असेल, तेव्हां:

( ६. ) जेव्हां भागीदारीचा उद्योग चालविणें तर तोटा करून घेतल्याशिवाय चालवितां येत नाहीं, तेव्हां.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. भागीदारीच्या व्यवहाराची व्यवस्था पाहण्याबद्दल तुम्हांस तुमचे ताहयातीपर्यंत या कामांत जी विक्री होईल त्या विक्रीवर तुम्हांस कमिशन देत जाऊं, असा बाकीच्या सोबती भागीदारांनी एका भागीदाराशीं करार केला असतां, त्यांत तशा प्रकारचा स्पष्ट ठराव नसल्यास, आतां हा भागीदारीचा व्यवहार नुकसानी झाल्यावांचून चालणार नाहीं, असें त्या सोबती भागीदारांस वाटल्यास ती भागीदारी तोडून टाकण्याचा त्यांचा हक्क सदहूं करारावरून नाहींसा होतो, असा त्या कराराचा गर्भित अर्थ होत नाहीं, किंवा अशा कारणावरून त्यांनीं ती भागीदारी मोडून टाकली असतां व्यवस्था पाहणारे भागीदारास त्याचे ताहयतीपर्यंत कमिशन देण्याची जबाबदारी त्या

सोंपती भागीदारांवर रहावी, असाही त्या कराराचा अर्थ होत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ९ पृ. ४६८; न्या. पु. १२ मुं. दि. नि. पृ. ७९).

२. **भागीदारी मोडण्याच्या हक्काचा उगम.**—प्रतिवादी ही एक कंत्राटाचा धंदा करणारी मंडळी होती. त्यांनीं मुंबईमधील न्यू अलेक्झांड्रा गोदी बांधून देण्याचें काम कंत्राटानें घेतलें होतें व या कामाकरितां त्यांस ग्रनाइट व इतर जातीचा बराच दगड लागत होता. याकरितां त्यांनीं वादी बरोबर ( सध्यांचे अपेलंट ) त्यांस जरूर असलेला दगड खाणीमधून काढणें व पुरवणें यांजकरितां भागीदारी केली. भागीदारींच्या करारापैकीं रकम ४ प्रमाणें " गोदीचें काम पुरें करण्याकरितां जरूर लागणारा ग्रनाइट व इतर प्रकारचा दगड यांचा पुरवठा पुरा होईपर्यंत खाणींतून दगड काढण्याचें काम चालू रहावें व भागीदारी चालूं रहावी व नंतर भागीदारी मोडून आटोपण्यांत यावी " असें ठरलें होतें. भागीदारी चालविण्यांत फक्त तोटाच आहे असें नंतर वादीस आढळून आल्यामुळें ग्रनाइट व इतर जातीचा दगड यांचा पुरवठा पूर्ण होण्यापूर्वीं वादीनें भागीदारी मोडण्याकरितां व भागीचा हिशोब घेण्याकरितां दावा लावला. वादीस सध्यां दावा लावतां येत नाहीं अशी प्रतिवादींची तक्रार होती. हायकोर्टानें आपल्या अपेलेट अधिकारांत अव्वल कोर्टांतील जज्जानें या मुद्यासंबंधानें केलेला निर्णय रद्द केला होता. हायकोर्टानें आपल्या अपेलेट अधिकारांत केलेला निर्णय रद्द करून पुढील ठराव करण्यांत आला:

**ठरावः**—भागीदारीच्या करारांत रकम ४ मध्यें कांहींही करार करण्यांत आला असला तरीं प्रस्तुतच्या कज्जाच्या परिस्थितींत व वादीनें जीं कारणें कथन केलीं आहेत त्यांचेमुळें कराराच्या आक्टाचें ( सन १८७२ चा आक्ट ९ ) कलम २५४ पोटकलम ६ मधील ठरावाप्रमाणें भागीदारी मोडून घेण्याचा वादीस हक्क आहे. ज्यायोगें प्रस्तुतच्या दाव्यासारख्या दाव्यास हरकत येईल अशी कोणतीही गोष्ट कराराच्या आक्टाचें कलम २५२ मधील ठरावांत नाहीं. भागीदारी मोडण्याबद्दलचा हुकुमनामा करून घेण्याचा कोणत्याही भागीदारास जो हक्क असतो त्याचा उगम भागीदारांच्या दरम्यान झालेल्या करारांत नसून, भागीदारींच्या करारांत भागीदारांचे हक्क व जबाबदाऱ्या काय आहेत यांचे नियमन व खुलासा करणाऱ्या कोणत्याही शर्ती असल्या तरी, न्यायतत्वांच्या मुद्यावर कोर्टाकडून संरक्षण करून घेण्याचा प्रत्येक इसमास जो नैसर्गिक हक्क असतो त्या हक्कांत भागीदारी मोडून घेण्याबद्दलचा हुकुमनामा करून घेण्याचा भागीदारास जो हक्क असतो त्याचा उगम आहे. भागीदारी मोडण्याबद्दलचा हुकुमनामा करण्यांत वादीस अनुकूल अशा रीतीनें अव्वल कोर्टानें जी मुखत्यारी चालविली आहे ती मुखत्यारी चालविण्याचा अधिकार आक्टाप्रमाणें कोर्टास देण्यांत आलेला आहे; त्याबद्दल संशय येण्याचें अगर मुखत्यारी ज्या रीतीनें चालविण्यांत आली आहे त्यांत हात घालण्याचें कांहीं कारण नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. ४२ पृ. ३८०; न्या. पु. ५३ मुं. दि. नि. पृ. ३१ व ३२ ).

उद्योग मना झाल्यास भागिदारी मोडते.

२५५. जर कोणत्याही भागीदारींचा उद्योग कायद्यानें मना होईल तर ती भागीदारी कसेंही असलें तरी मोडली असें समजावें.

ज्या मुदतीकरितां भागीदारी आरंभिली ती मुदत संपल्यावर भागीदारी

२५६. जर कांहीं भागीदारी अमूक एक मुदतीकरितां म्हणून आरंभिली असून मुदत संपून गेल्यावर ती चालूं ठेविली, तर अन्यथा होण्याविषयीं कांहीं कबुलायत नसल्यास, भागीदारांचे हक्क आणि त्यांच्या जबाबदाऱ्या मुदत संपतेवेळीं जशा होत्या तशाच

चालू ठेविल्यास भागीदारीचे हक्क आणि त्यांच्या जबाबदाऱ्या.

कायम राहतील, मात्र ते हक्क आणि त्या जबाबदाऱ्या कोणत्याही भागीदाराच्या इच्छेस आल्यावर मोडेल अशी जी भागीदारी त्या भागीदारीस जितपत लागू करितां येतील तितक्याच पुरते ते हक्क आणि त्या जबाबदाऱ्या कायम राहतील.

भागीदारांची साधारण कर्तव्यें.

२५७. भागीदारांनीं भागीदारीचा उद्योग सर्वसाधारण फायदा जितका होईल तितका जास्त होई अशा रीतीनें चालविला पाहिजे; त्यांनीं एकमेकांशीं अन्यायानें आणि विश्वासूक रीतीनें वागलें पाहिजे; आणि भागीदारीविषयीं सर्व बाबतींत कोणत्याही भागीदारास अथवा त्याच्या कायदेशीर वारच्यांस खरें हिशोब आणि पूर्ण माहिती दिली पाहिजे.

भागीदारी संबंधी कामापासून झालेल्या लाभाबद्दल हिशोब मंडळीस देणें.

२५८. भागीदारावर ज्याचा संबंध आहे अशा कोणत्याही व्यवहारापासून जो कांहीं लाभ होईल त्या लाभाबद्दल भागीदारानें आपल्या मंडळीस हिशोब दिला पाहिजे.

## उदाहरणें.

(अ.) अ, ब आणि क हे भागीदारीनें व्यापार करितात. क हा, अ आणि ब यांस नकळत, ज्यांत भागीदारीचा उद्योग चालत आहे तें घर केवळ खुद्द आपणास लाभ व्हावा म्हणून भाड्यानें मिळवितो. तर अ आणि ब यांची इच्छा असेल तर, तें घर भाड्यानें घेतल्यापासून जो लाभ होणार त्याचा भाग मागण्याचा हक्क त्यांस आहे.

(ब.) अ, ब आणि क हे मिळून भागीदारीनें सावकारीचा उद्योग करितात आणि त्यांचा व्यापार मुंबई आणि लंडन यांमध्यें आहे. ड या लंडनांतील सावकाराकडे ते आपला माल पाठवितात. डजवळ माल पाठवावा म्हणून क आपलें वजन खर्च करितो. त्याचा मोबदला म्हणून डजवळ माल पाठविल्याबद्दल डला जी दस्तुरी मिळते, तिजपैकीं कांहीं भाग ड हा गुप्त रीतीनें कला देतो. तर अशा रीतीनें कला जो पैसा मिळाला त्याचा हिशोब त्यानें मंडळीस दिला पाहिजे.

भागीदारानें प्रतिस्पर्धी उद्योग चालविल्यास त्याबद्दल मंडळीजवळ त्याची जबाबदारी.

२५९. जर कोणी भागीदार बाकीच्या भागीदारांस, नकळत आणि त्यांच्या राजी खेरीज मंडळीच्या उद्योगाशीं चढाचढी करणारा अथवा त्या उद्योगाच्या आडवा येणारा असा कोणताही उद्योग चालवील, तर त्या उद्योगांत मिळविलेल्या सर्व नफ्याबद्दलचा हिशोब त्यानें मंडळीस दिला पाहिजे, आणि त्या उद्योगामुळें मंडळीस कांहीं तोटा झाला असेल त्याजबद्दल त्यानें तिचें नुकसान भरून दिलें पाहिजे,

मंडळींत फेरफार झाल्यानें अखंड जिम्मा रद्द होते.

२६०. एकाद्या मंडळीच्या व्यवहाराबद्दल कोणत्याही मंडळीस अथवा तिसऱ्या मनुष्यास अखंड जिम्मा दिली असेल, तर ज्या मंडळीला अथवा ज्या मंडळीच्या व्यवहाराबद्दल ती जिम्मा दिली होती त्या मंडळीच्या घटनेंत कांहीं फेरफार झाल्यास तेणेंकरून ती जिम्मा, अन्यथा होण्याविषयीं कबुलायत नसल्यास, भविष्यकाळाच्या व्यवहाराविषयीं रद्द झाली असें समजावें.

कोणी भागीदार मेल्यानंतर जबाबदारी उत्पन्न झाली तर त्या मयताची इस्टेट तिजविषयीं पात्र नाहीं.

२६१. कोणी भागीदार मयत झाला असेल, तर त्याच्या मरणानंतर मंडळीच्या आंगावर कांहीं जबाबदारी आल्यास, स्पष्ट कबुलायत नसेल तर, त्या जबाबदारीविषयीं त्याची इस्टेट पात्र होणार नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. कित्येक भागीदारांपैकीं एक भागीदार, सर्व भागीदार मिळून ठरविलेल्या व्यवस्थेप्रमाणें, भागीदारीच्या धंद्याची एकटाच वहिवाट करीत असेल, तर व्यापार करण्यास लागणारा पैसा उसनवार घेण्याचा त्यास अधिकार असतो आणि तसा त्यास अधिकार असल्यामुळें भागीदारीची जायदाद गहाण टाकण्याचाही त्यास अधिकार पोंचतो.

पेढीची स्थावर मिळकत गहाण टाकण्याचा एकट्या भागीदारास अधिकार पोंचत नाहीं असें जें इंग्लिश कायद्याचें मूलतत्व आहे तें हिंदुस्थानांत लागू पडत नाहीं.

भागीदारीच्या नियमावरून जो अधिकार मिळालेला असतो तो चालविण्यास एका भागिदारास दुसरा एकटा भागीदार हरकत करूं शकत नाहीं.

जेव्हां भागीदारीचा धंदा चालविण्याकरितां पैका कर्जाऊ घेण्याचा किंवा भागीदारीची मिळकत गहाण टाकण्याचा एखाद्या भागीदारास अधिकार असतो तेव्हां पूर्वीचें कर्ज फेडण्यासाठीं भागीदारीची मिळकत गहाण टाकण्याचाही त्यास अधिकार पोंचतो.

भागीदारीची मिळकत गहाण टाकण्यांत आली आहे ती, भागीदारीच्या धनकोंस फसविण्याचे उद्देशानें किंवा त्याची फेड करण्याचें लांवणीवर टाकण्याचे उद्देशानें गहाण टाकण्यांत आली आहे अशी तक्रार करावयाची ती धनकोंनीं केली पाहिजे आणि तशा कारणावरून तशी हरकत घेण्याचा दुसरे कोणास अधिकार पोहोचत नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३१ पृ. २०६; न्या. पु. ४३ म. दि. नि. पृ. १७ व १८ ).

२. **मयत भागीदाराच्या इस्टेटीवरील पात्रता.**—मयत भागीदार ह्यात असतांना दोघा भागीदारांनीं जो माल मागविला होता परंतु जो माल मयत भागीदार ह्यात असतांना आला नव्हता अशा मालाबद्दलचीं लेडिंगचीं बिलें घेऊन माल ताब्यांत घेण्याकरितां ह्यात असलेल्या भागीदारानें काढलेल्या कर्जाबद्दल मयत भागिदाराची मिळकत सावकारास जबाबदार होत नाहीं.

कराराच्या आक्टाचें कलम २६३ मधील ठरावामुळें कलम २६१ मधील स्पष्ट ठराव मर्यादित होत नाहींत.

अशा कर्जाचे संबंधानें हयात असलेल्या भागीदारावर जातीनें व त्यांच्या हातांत असलेल्या भागीदारीच्या मिळकतीविरुद्ध हुकुमनामा मिळण्याचा सावकारास हक्क असतो. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४२ पृ. १५; न्या. पु. ५४ म. दि. नि. पृ. २ व ३ ).

भागीदाराची कर्जें आणि स्वतःची कर्जें फेडणें.

२६२. जर कांहीं संयुक्त कर्जें मंडळीनें द्यावयाची असतील, आणि एकाद्या भागीदारानेंही स्वतः द्यावयाचीं कांहीं कर्जें असतील तर भागीदारीची जिंदगी प्रथमतः, मंडळीनें द्यावयाचीं कर्जें फेडण्याच्या कामीं योजिली पाहिजे आणि नंतर कांहीं फाजील राहील, तर तें प्रत्येक भागीदारानें स्वतः द्यावयाचें कर्ज फेडण्याकडे लावावें, अथवा तें फाजील त्याला द्यावें. कोणत्याही भागीदाराची स्वतःची जिंदगी त्यानें स्वतः द्यावयाची कर्जें फेडण्याला प्रथमतः योजावी, आणि जर कांहीं फाजील उरेल तर तें मग मंडळीचीं कर्जें फेडण्याकडे योजावें.

भागीदारी मोडल्यावर भागीदाराचे हक्क आणि त्यांच्या जबाबदाऱ्या ही कायम राहणें.

२६३. भागीदारी मोडली गेल्यावर भागीदारांचे हक्क आणि त्यांच्या जबाबदाऱ्या हीं भागीदारीचा उद्योग आटपून बंद करण्याला अवश्य अशा सर्व बाबतींत कायम राहतात.

भागीदारी मोडल्याबद्दल खबर.

२६४. कांहीं मंडळीची भागीदारी मोडली आणि त्याजबद्दल सर्व लोकांस कळण्याकरितां खबर दिलेली नसेल, तर त्या मंडळीशीं व्यवहार ठेवणारे जे मनुष्य असतील, त्यांना भागीदारी मोडल्याविषयीं स्वतः समजलें नसलें तर, त्या मोडण्यापासून त्यांच्यावर कोणताही विकार होणार नाहीं.

## विशेष समजुतीच्या टिपा.

भागीदारीशीं ज्यांचा संबंध नसतो अशा इसमांस मात्र कराराच्या आक्टाचें कलम २६४ चा फायदा मिळतो. ( न्या. पु. ३६ मुं. दि. नि. पृ. ३८१ ).

मोडल्यावर किंवा समाप्त झाल्यानंतर कोर्टानें काम आटपून बंद करणें.

२६५. जेव्हां भागीदारी मोडण्याविषयीं दावा करण्याचा हक्क एकाद्या भागीदारास असेल तेव्हां, किंवा जेव्हां भागीदारी समाप्त झाली असेल तेव्हां, अन्यथा होण्याविषयीं कोणताही करार नसेल तर, भागीदारीचा उद्योग आटपून बंद करण्याचा, तिचीं कर्जें फेडण्याची तजवीज करण्याचा आणि राहिलेलें फाजील भागीदारांच्या हिश्शाप्रमाणें त्याला अनुक्रमें वांटून देण्याचा कोर्टास अधिकार आहे. ( सन १८८६ चा आक्ट ४ था कलम १ ).

## विशेष समजुतीच्या टिपा.

१. सन १८७२ चा आक्ट ९ कलम २६५ चे आधारें भागीदारी समाप्त झाल्यावर मंडळीचा उद्योग आटपून टाकण्यासाठीं झालेला अर्ज हा, त्यास कांहीं नांव ठेविलें असलें तरी फिर्यादअर्जी

होते आणि याजकरितां तितक्या किंमतीच्या व्यवहाराचा हिशेब घेण्यासाठीं केलेल्या फिर्यादअर्जास जितका स्टांप लागतो तितकाच स्टांप त्या अर्जास लाविला पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ७ पृ. ५३५; न्या. पु. १९ मुं. दि. नि. पृ. ४७ ).

२. भागीदारी होती, अशाविषयीं सन १८७२ चा आक्ट ९ कलम २६५ वरून होतें आणि ती भागीदारी आटपून टाकण्याचा अधिकार जिल्हे कोर्टास त्या कलमावरून येतो, परंतु भागीदारीच्या आस्तित्वाविषयींच ज्यावेळेस तंटा असतो त्यावेळेस कज्जांतील नेहमींच्या कोर्टाचा अधिकार त्या कलमावरून काढून घेतला नाहीं. नेहमींच्या साधारण कज्जासारखाच या तंट्याचा निकाल केला पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ८ पृ. ४९४; न्या. पु. १९ मुं दि. नि. पृ. २६३ ).

३. **भागीदारी मोडल्यानंतर त्यापैकीं एकादी रक्कम मागाहून वसूल झाल्यास तिची विल्हेवाट.**—भागीदारी मोडून भागीचे हिशोबही पुरे करण्यांत आले म्हणजे भागीदाराचे परस्पर हक्क व जबाबदाऱ्या याही संपतात. भागीदाराचें एखादें येणें चुकून राहिलें असेल अगर तें महत्वाचें नाहीं असें समजून सोडून देण्यांत आलें असेल व नंतर ते वसूल झालें असेल तर अशा येण्याची रक्कम सर्व भागीदारांत त्यांच्या हिश्शाप्रमाणें वांटून दिली पाहिजे. परंतु हिशोब झाला नसल्यास अशा येण्याबाबद आपली दाद लावून घेण्याचा भागीदाराचा योग्य मार्ग म्हणजे भागीदारीचा हिशोब घेण्याचा दावा लावणें हाच असतो. हिशोब घेण्याबद्दलच्या दाव्यास मुदतीची हरकत येत असेल, तर भागीदारास ज्या भागीदारानें येणें रक्कम वसूल केली आहे अशा दुसऱ्या भागीदारावर सदर्हू रकमेपैकीं आपल्या हिश्शाची रक्कम मिळण्याकरितां दावा लावतां येत नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ४५ पृ. ३७८; न्या. पु. ५७ म. दि. नि. पृ. १५ व १६ ).

**२६६.** नियमित जबाबदारीच्या भागीदाऱ्या, इन्कार्पोरेटेड भागीदाऱ्या आणि जाइन्ट स्टॉक कंपन्या अशा प्रकारच्या ज्या विशेष भागीदाऱ्या त्यांजविषयीं कोणत्याही विवक्षित काळीं इंडियामध्यें चालू असेल त्या कायद्यावरून त्यांजबद्दल नियमन समजावें.

नियमित जबाबदारीच्या भागीदाऱ्या इन्कार्पोरेटेड भागीदाऱ्या आणि जाईन्ट स्टॉक कंपन्या.

ह्या कलमांत ज्या इन्कार्पोरेटेड भागीदाऱ्या आणि जाइंट स्टाक कंपन्या वगैरे सांगितल्या आहेत त्यांच्यासंबंधानें आज चालूं असलेला सन १९१३ चा आक्ट ७ वा ( हिंदुस्थानचा कंपन्याबाबद आक्ट ) पहा.

---

# परिशिष्ट.

( सन १९१४ चा आक्टं १० परिशिष्ट २ रें वरून रद्द ).

( खरें भाषांतर ).

शंकर पांडुरंग पंडित.

( डिस्ट्रिक्ट डेप्युटी कलेक्टर आणि माजिस्ट्रेट, खानदेश ).

करसेटजी रस्तमजी ठाणावाला.

( कल्याणचे सबार्डिनेट जज्ज जि. ठाणा ).

# अपेंडिक्स.

( कराराचे आक्टावरील सर्वसाधारण निवाडे ).

१. युरोपांतील किंवा इजिप्तांतील सुताच्या केलेल्या धोत्रांच्या दरमहा २२५ जोड्याप्रमाणें एक वर्षपर्यंत वादीस पुरविण्याचा प्रतिवादी यानें ता. २ नोवेंबर सन १८९४ रोजीं करार केला. त्या सुतावर सरकारनें शेंकडा ५ टक्के प्रमाणें सन १८९५ चे जानेवारी महिन्यांत जकात बसविली. सदहू करारांतील किंमती खेरीज ती जकातीची रक्कम वादीनें दिल्यावांचून वादीस कराराप्रमाणें माल पुरविण्यांत येणार नाहीं असें प्रतिवादीनें वादीस कळविलें.

**ठरावः**—त्या सुतावर जकातीबद्दल प्रतिवादीनें जी रक्कम भरली असेल तितकी रक्कम वादीपाशीं जास्त मागण्याचा प्रतिवादीस, सन १८९४ चा आक्ट ८ कलम १० वरून हक्क पोंचतो; म्हणजे जकातीबद्दल त्यानें स्वतः जितकी रक्कम भरली असेल तितकी रक्कम करारांतील किंमतींत सामील करण्याचा प्रतिवादीस हक्क आहे. ज्या सुताबद्दल प्रतिवादीनें जकात भरली होती त्या सुताचे खरोखर ते धोतरजोडे आहेत किंवा नाहींत असा प्रश्न आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २१ पृ. ६२८; न्या. पु. ३२ मुं. दि. नि. पृ. २९५ ).

२. कलकत्या शेजारी प्रतिवादी याची जी गिरणी होती त्या गिरणीस यंत्रें पुरविण्याबद्दल वादींनीं सन १८९२ चे डिसेंबर महिन्यांत प्रतिवादीबरोबर करार केला. त्या कराराप्रमाणें पैसे देण्यास प्रतिवादी असमर्थ असल्यामुळें त्यांनीं ता. १० आगष्ट सन १८९४ रोजीं वादींस दुसरा एक पुरवणी करार लिहून दिला. त्या करारावरून त्या गिरणींतील शेअर गहाण लावून देण्याबद्दल वादींस गहाणखत लिहून द्यावयाचें होतें. त्या करारावर वादींतर्फें जे. मार्शल यानें मुंबई येथें सही केली. तें गहाणखत वादींनीं तयार केलें व तें प्रतिवादींच्या मुंबई येथील सालिसीटरांनीं पसंत केलें. ते दस्तऐवज तयार करण्याचे संबंधानें सालिसीटरांकडून खर्चाबद्दल आलेले बिलाचा पैसा वादींनीं मुंबई येथें भरला. त्या दस्तऐवजांतील रक्कम घेण्यासाठीं वादींनीं सन १८९४ सालचे करारावरून दावा केला.

आम्ही मुंबईस रहात नाहीं व तेथें कामधंदा करीत नाहीं व मुंबई येथें दाव्याचें कारण मुळींच उत्पन्न झालें नाहीं. सबब हा दावा घेण्याचा या कोर्टास अधिकार नाहीं अशी प्रतिवादींनीं तक्रार केली. सन १८९२ सालच्या करारनाम्यांतील शर्तीअन्वयें वादींनीं वागणूक केली नाहीं, सबब या दाव्यांत वादीचे मागण्यांतून आमचे नुकसानीची रक्कम वजा करून घेण्याचा आह्मांस हक्क आहे, असेंही प्रतिवादींचें ह्मणणें होतें.

**ठरावः**—हा दावा घेण्याचा कोर्टास अधिकार आहे. सन १८९४ सालचे आगष्ट महिन्यांतील करारनाम्यावर वादींतर्फें वादींच्या एजंटानें मुंबई येथें सही केली होती आणि याजकरितां या कोर्टाच्या अधिकारांत या दाव्याचे कारणाचा कांहीं भाग घडून आलेला आहे. शिवाय त्या करारनाम्याअन्वयें जी फेड करावयाची ती मुंबई येथें करण्याचा उद्देश होता असें दिसतें; कारण वादींचा एजंट आणि सालिसीटर असे मुंबई येथेंच रहात आहेत.

आणखी असाही ठराव करण्यांत आला कीं, सन १८९२ सालच्या कराराप्रमाणें वादी न

वागल्यामुळें त्यांजपासून नुकसानीबद्दलचें मागणें करण्यास प्रतिवादींस या दाव्यांत परवानगी देतां येत नाहीं. वजावाट करण्याबद्दलचें जें प्रतिवादींचें मागणें आहे तें, सन १८८२ चा आक्ट १४ कलम १११ खालीं येत नाहीं. कारण वजावाटीची रक्कम कायम ठरलेली नाहीं आणि अशी गोष्ट आहे याजकरितां या दाव्यांत नुकसानीच्या रकमेची चौकशी व्हावी असें प्रतिवादीस हक्कानें ह्मणतां येत नाहीं. शिवाय त्या रकमेची चौकशी करण्यास फार उशीर लागेल आणि वादी यांस हल्लीं जें कायदेशीर रीतीनें मिळण्याचा हक्क आहे तें मिळण्याचे त्यांस थांबून धरण्यास कांहीं कारण आहे असें दिसत नाहीं. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २१ पृ. १२६; न्या. पु. ३२ मुं. दि. नि. पृ. ७२ व ७३).

३. कांहीं मिळकतीची विक्री करण्यासाठीं प्रतिवादींनीं वादीस दलाल नेमिलें. वादीस दलाल नेमल्याबद्दल प्रतिवादींनीं ता. ३ जानेवारी सन १८९५ रोजीं वादीस जें पत्र लिहिलें होतें त्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर होताः—"विक्रीचे पैसे आमचे हातीं आल्यावर दलालीची रक्कम देण्यांत देईल व हा व्यवहार आजपासून १५ दिवसांचे आंत पुरा झाला पाहिजे, हें आपल्यास माहीत आहेच." वादीनें पेस्तमजी पाटील नांवाचा एक गृहस्थ व त्याचा भाऊ यांजबरोबर बोलणें केलें व त्यांनीं ती मिळकत खरेदी करण्याचें कबूल केलें, परंतु खरेदीचा पैका चार किंवा पांच महिन्यांचे आंत आह्मी देऊं अशी त्यांनीं शर्त केली. प्रतिवादींनीं ता. १ फेब्रुवारी सन १८९५ रोजीं वादीचे मार्फत त्या खरेदीदारांबरोबर खरेदीचा तो करार केला आणि बयाण्याबद्दल खरेदीदारांनीं रक्कम रुपये १०,००० ताबडतोब द्यावे व बाकीचे रक्कम रुपये २७,००० चार महिन्यांत द्यावे असें ठरलें होतें. तथापि बयाण्याबद्दलची १०,००० रुपयांची रक्कम देण्यास ते खरेदीदार असमर्थ झाल्यामुळें तो करार पुरा करण्यासाठीं तारण म्हणून मुंबई ब्यांकेचे ३ शेअर त्या खरेदीदारांनीं प्रतिवादींचे स्वाधीन केले. पुढें थोडेच दिवसांनीं त्या खरेदीदारांपैकीं एक खरेदीदार मयत झाला. तेव्हां तो करार अमलांत आणण्याचा विचार प्रतिवादींनीं सोडून दिला आणि एक वर्ष झाल्यानंतर मुंबई ब्यांकेच्या त्या ३ शेअरांपैकीं २ शेअर प्रतिवादींनीं खरेदीदारांच्या कुटुंबास परत दिले आणि १ शेअर त्या व्यवहाराचे कामांत झालेल्या खर्चाकरितां प्रतिवादींनीं विकून टाकला. वादीनें एकंदर खरेदीच्या पैक्याच्या रकमेवरील दलालीबद्दल रुपये १५०० घेण्याकरितां प्रतिवादींवर दावा केला.

ठरावः—कज्जांतील अहवालांवरून पाहतां, रुपये १,५०० घेण्याचा वादीस हक्क पोंचत नाहीं. दलालीची रक्कम कोणते वेळेस द्यावयाची याजबद्दल पूर्वी ठराव झालेला नव्हता. प्रतिवादी यांस खरोखर जितके शेअर मिळाले होते त्या शेअरांच्या किंमतीवर शेंकडा ५ टक्के प्रमाणें दलाली घेण्याचा मात्र वादीस हक्क आहे. ज्या कामाकरितां वादीस दलाल नेमण्यांत आलें होतें त्या कामाचे संबंधानें दार खरेदीदार पाहून देणें हें वादीचें काम होतें. (इं. ला. री. मुं. सी. व्हा. २२ पृ. ५४०; न्या. पु. ३३ मुं. दि. नि. पृ. १८४ व १८५).

४. वादी हे मुंबई येथील दोन गिरण्यांचे एजंट आहेत. प्रतिवादी हे, आपल्या एजंटाच्या मार्फत मुंबई येथें कोळशाचा धंदा करणाऱ्या एका कंपनीचे मालक आहेत.

प्रतिवादी यांनीं ता. १९ आगष्ट सन १८९७ रोजीं वादी यांस जी एक पत्राचे रूपानें सही करून यादी पाठविली होती त्या यादींतील पहिल्या दोन कलमांत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर होताः—

"खालीं सही करणारांनीं आज रोजीं ता. १ सप्टेंबर सन १८९७ पासून ता. ३१ आ-

गष्ट सन १८९८ पर्यंतच्या १२ महिन्यांच्या मुदतीबद्दल, मेसर्स होमीवाडीया आणि कंपनी याजबरोबर करार केला आहे.

" तुम्हांस लागेल तसतसा वेळोवेळीं बंगालकोल कंपनीचा कोळसा पुरविण्याचें आम्हीं कबूल केलें आहे; तुह्मांस कोळशाची जरूर लागेल तसतशी तुम्ही आह्मांस योग्य नोटीस देत जावी. सदहू सालांत तुम्ही जो कांहीं कोळसा मागाल त्याचें प्रमाण, आमच्या संमत्तीवांचून दरमहा ३५० टनाहून जास्त होऊं नये. "

ता. १६ जुलई सन १८९८ पर्यंत वादींनीं १७५२ टन कोळशाबद्दल मागणें केलें व प्रतिवादींनीं १५५२ टन कोळसा वादीस दिला. सदहू तारखेस आणखी ५०० टन कोळशाबद्दल मागणें केलें आणि १८ जुलै रोजीं वादींनीं आणखी १५०० टन कोळसा पाठविण्याबद्दल प्रतिवादींस लिहिलें. आगष्ट महिन्यांत ५०० टन कोळसा तुम्हांस देऊं परंतु १५०० टन कोळसा आम्हीं देणार नाहीं, असा प्रतिवादींनीं वादींस जबाब दिला. ता. ३१ आगष्ट सन १८९८ रोजीं किंवा त्याचे अगोदर बाकी राहिलेला २६४८ टन कोळसा तुम्हीं आह्मांस पुरविला पाहिजे अशाबद्दल वादींनीं ता. २२ जुलै सन १८९८ रोजीं प्रतिवादींस नोटीस दिली.

पुढें प्रतिवादींनीं २०० टन व ५०० टन कोळसा वादींस दिला व १९४८ टन कोळसा त्यांनीं वादींस दिला नाहीं. बाकी राहिलेला कोळसा प्रतिवादींनीं न दिल्यामुळें झालेल्या नुकसानीबद्दल रक्कम रुपये ६६००४।३८५ प्रतिवादीपासून घेण्यासाठीं वादींनीं दावा केला.

ता. १९ आगष्ट सन १८९७ रोजची यादी ही एकादा करार होत नाहीं; परंतु कोळसा पुरविण्याची नुसती कबुली होते आणि वादींनीं वरचेवर कोळसा पाठविण्याबद्दल केलेलें मागणें हें त्यांत मागितलेल्या कोळशाचे संबंधानें, प्रतिवादींची कबुली वादींनीं मान्य केली होती असें होतें. प्रतिवादींची कबुली आणि वादींनीं वरचेवर केलेलें मागणें यावरून करारांची एक मालिकाच होते. वादींच्या ज्या मागण्या प्रतिवादींनीं मान्य केल्या नाहींत असें वादींचें म्हणणें आहे त्या मागण्या, प्रतिवादींनीं आपली कबुली रद्द करून परत घेतल्यानंतरच्या आहेत.

आणखी असाही ठराव झाला कीं, प्रतिवादींच्या संमत्तिवांचून कोणत्याही एका महिन्यांत ३५० टनांहून जास्त कोळसा मिळण्याचा वादींस हक्क नव्हता.

आणखी असेंही ठरलें कीं, २६४८ टन कोळसा पुरविण्याबद्दल वादींनीं प्रतिवादी यांस ता. २२ जुलै सन १८९८ रोजीं जी नोटीस दिली होती ती, ता. १९ आगष्ट सन १८९७ रोजच्या यादीच्या अर्थाप्रमाणें योग्य नोटीस नव्हती. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २४ पृ. ९७; न्या. पु. ३५ मुं. दि. नि. पृ. ६८ व ६९ ).

५. अन्नवस्त्राकरितां देणग्या किंवा करार स्पष्ट रीतीनें केले असतील आणि ते किती दिवस चालावयाचे याची यत्ता ठरविली नसेल तर पक्षकारांच्या कुलावरून किंवा इतर अहवालावरून ते करार सदोदीत चालविण्याचे उद्देशानें केले होते असें दाखवितां येईल; परंतु त्या करारांतील देणग्या देणाराच्या किंवा घेणाराच्या ताह्यातीपर्यंत चालावयाच्या आहेत असें प्रथमदर्शनीं समजण्यांत येईल.

वादी हा, खोजा ज्ञातींतील एका कुटुंबांतील एक इसम होता. तो आपला आजा पिरु, आपला बाप नेनसी आणि दोघे चुलते कासम व फजल यांच्याशीं मिळून धंदा करीत होता. त्या धंद्यांत वादीचा दोन आण्याचा हिस्सा होता. त्याजकडे जी कित्येक कामें होतीं त्यांत प्रतिवादीच्या दुकानाचे मक्तेदार व दलाल ह्मणूनही तें काम करीत असत. त्यांची ती सरकत मोड-

त्याबद्दल ता. ३० जुलै सन १८९४ रोजीं एक दस्तऐवज करण्यांत आला. सर्व भागीदारांचे हिस्से रुजू झाले आहेत असें समजावें आणि प्रत्येकानें एकमेकास जबाबदारींतून मुक्त करावें अशी त्या करारनाम्यांत ( दस्तऐवजांत ) शर्त होती. प्रत्येक भागीदाराकडे त्या पेढीचें किती येणें आहे किंवा देणें आहे तें, आणि प्रत्येकानें कोणत्या शर्तीनें आपलें अंग काढून घ्यावें व मुक्त व्हावें त्या शर्ती याजबद्दल त्या करारनाम्यांत उल्लेख केला होता. वादी यास त्या पेढीचें देणें होतें, आणि वादीवरील मागणी सोडून द्यावी व वादीनें बाकीच्या सर्व भागीदारांस त्यांच्याकडून यावयाच्या रकमांबद्दल सोडचिठ्ठी द्यावी, असाही त्या करारनाम्यांत ठराव होता. बाकीच्या भागीदारांनीं त्या दस्तऐवजावर सह्या केल्या परंतु आपल्या अन्नवस्त्राबद्दल त्यांत कांहींएक ठराव केला नसून बापाचे व आपलें वांकडे असतां त्याजवर अवलंबून राहण्याविषयीं त्यांत लिहिलें असल्यामुळें त्या दस्तऐवजांतील शर्ती आपल्यास प्रतिकूल आहेत असें कारणावरून वादीनें त्या दस्तऐवजावर सही करण्यास हरकत घेतली. ही भागीदारी मोडण्याचे कामांत प्रतिवादीचा कांहीं हितसंबंध असल्यामुळें त्या दस्तऐवजावर सही करण्याचें वादीनें कबूल करावें म्हणून प्रतिवादींनीं ता० ४ आगष्ट सन १८९४ रोजीं पुढें लिहिल्याप्रमाणें वादीस एक पत्र लिहून दिलें:—"पिरु, नेनसी, कासम, फजल आणि तुह्मी स्वतः यांचे दरम्यानची भागीदारी तोडण्याबद्दलच्या करारावर आमचे सांगण्यावरून तुह्मीं सही केली असल्यामुळें नेनसी करितां दर महिन्याचे पहिल्या तारखेस रुपये ५०० तुह्मांस देण्याचें आम्हीं या पत्रावरून कबूल केलें आहे, आणि तुमचा बाप नेनसी हा तुमचे अन्नवस्त्राकरितां तुम्हांस दरमहाचें दरमहा रुपये ५०० देण्याची व्यवस्था करीपर्यंत दरमहा आह्मी तुह्मांस रुपये ५०० देत जाऊं." नंतर वादीनें त्या दस्तऐवजावर सही केली. वादीचे अन्नवस्त्राबद्दल कांहींएक व्यवस्था न करितां नेनसी हा सन १८९८ चे मार्च महिन्यांत मयत झाला.

नेनसी मयत झाल्याबरोबर, दरमहा रुपये ५०० वादीस देण्याबद्दलची प्रतिवादींची पाकती बंद झाली. त्या पत्रांतील कराराच्या भाषेवरून नेनसीच्या हयातीपर्यंत त्या कराराचा फायदा वादीस मिळावयाचा होता असें उघड रीतीनें दिसून येतें आणि पक्षकारांच्या स्थितीवरून किंवा कज्जांतील अहवालावरून त्या कराराचा दुसरे रीतीनें अर्थ करितां येत नाहीं. सबब हायकोर्टाचा फैसला कायम ठेविला पाहिजे. ( इं. ल. रि. मुं. सी. व्हा. २५ पृ. ५६६; न्या. पु. ३६ मुं. दि. नि. पृ. ३६१ व ३६२ ).

६. कोणताही माल रेलवेनें कसा पाठवावयाचा त्याजबद्दलची काम चालविण्याची रीति एका रेलवे कंपनीच्या नियमांत ठरविली होती. त्या नियमास अनुसरून कांहीं माल त्रिचनापल्ली येथून बागलकोट येथें रवाना करण्यांत आला. होटगी ( प्रतिवादीच्या रेलवेवरील स्टेशन ) येथील गुडस् क्लार्क आणि स्टेशन मास्तर या यास, सदरहू माल बागलकोट येथून होटगी येथें तसाच पुढें पाठविण्याविषयीं वादीनें विनंती केली होती, आणि या कारणासाठीं वादीनें रेलवे रिसीट व लेखी अर्ज त्याचेजवळ दिला होता; परंतु कंपनी नेहमीं अशा कारणासाठीं ज्या नमुन्याचा उपयोग करीत असे त्या नमुन्याचा तो अर्ज नव्हता. त्या अर्जास अनुसरून असें, तो माल पुढें होटगी येथें पाठविण्याविषयीं बागलकोट येथील स्टेशन मास्तरास रेलवेतर्फे टेलिग्राम दिला. त्या स्टेशनमास्तरानें तो माल टेलिग्रामप्रमाणें न पाठवितां बागलकोट स्टेशनवरच देऊन टाकला. होटगी येथें माल न दिल्याकारणानें झालेली नुकसानी भरून घेण्यासाठीं वादीनें रेलवे कंपनीवर दावा केला.

ठराव:—वादीचा माल बागलकोट येथून होटगी येथें नेण्याचा प्रतिवादी कंपनीनें वादीशीं करार केलेला नव्हता होटगी येथील स्टेशनमास्तर आणि वादीचे सांगण्याप्रमाणें एक सव्हीस

टेलिग्राफ बागलकोट येथें पाठविला एवढ्यावरून, कंपनीनें वादीशीं करार केला असें होत नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २७ पृ. १२६; न्या. पु. ३८ मुं. दि. नि. पृ. ६० ).

७. करार ( मक्ता ) तोडल्यामुळें नुकसानी घेण्यासाठीं झालेल्या दाव्यांत त्या कराराप्रमाणें वागण्याचें जसें वादीस भाग नाहीं तसेंच त्यीं कराराप्रमाणें वागण्याचें आपल्यास भाग नाहीं असें शाबीत करण्याचा प्रतिवादीस अधिकार आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २७ पृ. ६१८; न्या. पु. ३८ मुं. दि. नि. पृ. २७४ ).

८. एखाद्या अल्पवयी मनुष्यानें एखादा करार केला असेल म्हणजे त्यानें गहाणखत वगैरे लिहून दिलें असेल तर तें निरर्थक होतें आणि त्या गहाणाच्या तारणावरून ज्या सावकारानें त्या अल्पवयी मनुष्यास पैसे दिले असतील त्या सावकारास, तें गहाण निरर्थक आहे असें ठरून हुकुमनामा झाल्यावर, ते पैसे परत मागण्याचा हक्क पोंचत नाहीं, असा फैसला, मोहोरी बिबी वि० धर्मोदास ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३० पृ. ५३९ ) यांत झाला आहे. तथापि, सन १८७७ चा आक्ट १ ( विशेष न्यायाचा ) कलम ४१ वरून पाहतां, एखाद्या विशेष कज्जांतील हकीकतीस अनुसरून एखादा दस्तऐवज रद्द करण्याचा ठराव करते वेळीं वाजवी असेल तो नुकसानीचा मोबदला तूं दुसरे पक्षकारास दे असें, ज्या पक्षकाराचे तर्फे ठराव केला असेल त्या पक्षकारास फर्माविण्याचा अधिकार कोर्टास आहे, असा सिद्धांत ठरविण्यास संदरीं लिहिलेल्या कज्जांत फैसलाही एक आधार आहे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २८ पृ. १८१; न्या. पु. ३९ मुं. दि. नि. पृ. १२५ ).

९. एका बजावणीच्या कामांत हुकुमनाम्याचे फेडीबद्दल पक्षकारांनीं एक करार केला. तो करार एका खात्याचे स्वरूपाचा होता. पुढें वादीनें त्या खात्यावरून एक दावा केला आणि दाव्यांतील रकमेवर व्याजाबद्दल मागणें केलें. ज्या खात्यावरून दावा झाला आहे तें खातें अमलांत आणण्याजोगें आहे किंवा नाहीं, असा त्या दाव्यांत प्रश्न उत्पन्न झाला.

फक्त मुद्दाम रकमेबद्दलचा दावा देववून ठराव करण्यांत आला तो:—व्याज देण्याबद्दल पक्षकारांनीं करार केला असेल तर, तो करार त्या खात्यांतील कराराचा एक भाग असला पाहिजे किंवा तो करार पृथक असला पाहिजे. तो करार, खात्यांतील कराराचा जर एक भाग असेल तर, सन १८७२ चा पुराव्याचा आक्ट १ कलम ९२ वरून त्या कराराबद्दलचा पुरावा ग्राह्य होणार नाहीं. तो पृथक करार असेल तर, त्याजवरून, खात्यांतील करार रद्द होणार नाहीं, कारण, तोंडचा पृथक करार एकीकडे ठेऊन पाहिलें तर, सन १८८२ चा आक्ट १४ ( सि. प्रो. कोड ) कलम २५७ अ वरून त्या खात्यांतील कराराबद्दल हरकत घेतां येण्याजोगी नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २८ पृ. ३१०; न्या. पु. ३९ मुं. दि. नि. पृ. २१० ).

१०. एक चाळ आणि खुली जागा यांपैकीं ५०० चौरस यार्ड जमीन वादीस विकत देण्याबद्दल पहिल्या प्रतिवादीचा बाप आणि दुसऱ्या प्रतिवादीचा नवरा यानें लिहून दिलेला करार विशेष रीतीनें अमलांत आणण्यासाठीं वादीनें दावा केला. तो करार ता. २९ जून सन १९०१ रोजचा होता व तो दावा ता. ३० नोवेंबर सन १९०३ रोजीं करण्यांत आला होता. मूळच्या खरेदी देणाराच्या धनकोंनी मिळविलेल्या पैशाच्या हुकुमनाम्याच्या बजावणींत कोर्टमार्फत विक्री झाली ते वेळेस तिसऱ्या प्रतिवादीनें ती सर्व मिळकत खरेदी घेतली होती.

ठरावः—कोर्टमार्फत विक्री होते ते वेळेस एखादे खरेदीदारानें त्यास पूर्वींच्या व्यवहारांची माहिती नसून मिळकत खरेदी घेतली असेल तरीसुद्धां, त्या विक्रीच्या वेळेस हुकुमनाम्यांतील रिणकोचे जे हक्क, ... त्या मिळकतींत असतील आणि ज्यांवा त्या रिणकोस

इमानानें निकाल लावितां येण्याजोगा असेल, ते हक्क, दावा व संबंध मात्र त्या खरेदीदाराकडे जातात. सोभागचंद वि० भाईचंद ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ६ पृ. १९३ ) यांतील फैसल्यास अनुसरून सदहूं ठराव करण्यांत आला.

आणखी असाही ठराव झाला कीं, वादीचे हक्कास पात्र राहून प्रतिवादींनें ती मिळकत खरेदी केली आहे आणि वादीनें आपला तो हक्क गमाविला नसल्यामुळें तो करारनामा पुरा करून देण्याचें प्रतिवादीस भाग पाडण्याचा वादीस हक्क आहे. वादीनें आपला दावा आणण्यास विना-कारण उशीर लाविला आहे अशी तिसऱ्या प्रतिवादीनें तक्रार केली नाहीं किंवा त्यासंबंधानें त्यानें एखादा विशेष मुद्दाही काढला नाहीं. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. २९ पृ. २३४; न्या. पु. ४० मुं. दि. नि. पृ. १६५ ).

११. करार मोडल्यामुळें झालेलें नुकसान भरून घेण्यासाठीं केलेल्या दाव्यांत, प्रतिवादीनें इतर प्रतिवादींकडून करार मोडविला एवढेंच शाबीत करून चालणार नाहीं, तर करार होता अशाविषयीं माहिती असून प्रतिवादीनें तो मोडविला, असें वादीनें शाबीत केलें पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३० पृ. ५९८; न्या. पु. ४१ मुं. दि. नि. पृ. २६१ ).

१२. भाडें घेण्याबद्दल केलेल्या दाव्यांत वादीला यश मिळण्याचेपूर्वी, वादी व प्रतिवादी यांचे दरम्यान करारावरून अथवा इतर रीतीनें जमीनदार आणि कूळ असें नातें उत्पन्न झालें होतें ही गोष्ट वादीनें शाबीत केली पाहिजे. ( इं. ला. री. मुं. सी. व्हा. ३१ पृ. १५९; न्या. पु. ४२ मुं. दि. नि. पृ. १०९ ).

१३. एखाद्या अल्पवयी मनुष्याने तर्फें कायदेशीर रीतीनें एकादा करार करण्यांत आला असेल आणि त्या करारांतील उभय पक्षकारांकडून मोबदला दिल्याबद्दल परस्पर करार झाला असेल तर तो करार विशेष रीतीनें अमलांत आणतां येईल.

अशा बाबतींत एकादा सर्वसाधारण नियम घालून ठेवणें फार कठीण आहे; परंतु प्रत्येक करारांतील विशेष अहवालावरून त्या गोष्टीचा निर्णय केला पाहिजे. ( इं. ला. री. क. सी. व्हा. ३४ पृ. १६३; न्या. पु. ४२ क. दि. नि. पृ. ८ ).

१४. संसाराच्या कामांत अवश्य लागणाऱ्या वस्तु बायकोनें नवऱ्याच्या पतीवर दुसऱ्या पासुन घेण्याबद्दल तिला तिच्या नवऱ्याचा गर्भित अधिकार मिळालेला असतो असें जें अनुमान आहे तें, तसा तिला अधिकार नव्हता असें दाखविणारी हकीगत शाबीत केली असतां, रद्द होण्याजोगें असतें.

माझे पतीवर दुसरे कोणापासून कांहींएक जिन्नस घेऊं नये अशी नवऱ्यानें स्पष्ट रीतीनें बायकोस मनाई केली असेल तर सदहूं प्रकारचें अनुमान करितां येणार नाहीं. ( इं. ला. री. म. सी. व्हा. ३० पृ. ५४३; न्या. पु. ४२ म. दि. नि. पृ. ४७ व ४८ ).

१५. प्रतिवादी पुत्राशीं वादीचा विवाह झाला ( ते वेळेस वादी अल्पवयी होती ); त्या विवाहाचे तारखेपासून दरमहा बिन शर्तीनें वादीस ५०० रुपये देण्याबद्दल प्रतिवादीनें वादीचे बापाशीं करार केला; आणि ती नेमणूक, त्या करारनाम्यांत दाखल केलेल्या स्थावर मिळकतीवरील बोजा आहे असें समजावें असें प्रतिवादींनीं लिहून दिलें. वादी हिनें आपल्या फिर्यादअर्जीत लिहिलेल्या कारणावरून आपल्या नवऱ्यापाशीं राहण्याचे कांहीं दिवसांनीं तिनें नाकबूल केलें होतें. नवऱ्यापाशीं राहण्याचे तिनें नाकबूल केल्यावर तिची ती नेमणूक बंद करण्यांत

आली. तेव्हां त्या कराराचे आधारानें नेमणुकीबद्दलची बाकी रुपये १५००० घेण्यासाठीं वादीनें दावा केला.

ठराव:—वादी ही त्या करारांतील जरी एक पक्षकार नव्हती तरी त्या कराराचे आधारें दावा करण्याचा तिला हक्क आहे; आणि त्या करारनाम्याचा अर्थ करून पाहतां, वादी हिनें अमुक रीतीनें वर्तन करावें अशाबद्दल त्या करारनाम्यांत कांहींएक अट नसल्यामुळें, तिनें आपले नवऱ्यापाशीं राहण्याचें नाकबूल केलें येवढ्यावरून दावा करण्यास तिला प्रतिबंध आलेला नाहीं. ( इं. ला. री. अ. सी. व्हा. २९ पृ. १५१; न्या. पु. ४२ अ दि. नि. पृ. ९ ).



